## जगद्गुरू श्रीमद्

# आद्य शंकराचार्य

लेखक:अविनाश महादेव नगरकर



जगद्गुरू श्रीमद् आद्य शंकराचार्य
लेखक : **अविनाश महादेव नगरकर**
nagarkaram@yahoo.com
12 kilbaaha Close,
Dannimora
Auckland 2013, Australia
फोन नंबर .00649 2715555

प्रकाशक :**ई साहित्य प्रतिष्ठान**
www.esahity.com
esahity@gmail.com

प्रकाशन :१९ जुलै २०१६ (गुरूपौर्णिमा)

## ||श्रीगुरु:शरणं||

संपूर्ण जगदेव नंदनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमा: गाङ्गंवारि
समस्तवारिनिवहा: पुण्या समस्ता:क्रिया: |
वाच: संस्कृतप्राकृत: श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी
सर्वावास्थितिरस्य वस्तूविषया दृष्टे परब्रह्मणि ||



हे परब्रह्मरुपी सद्गुरो, आपल्यासाठी संपूर्ण विश्व म्हणजे एक नंदनवनच आहे. सर्व वृक्ष आपणास कल्पवृक्षच आहेत. सर्व जलाशय गंगा आहेत व आपल्या सर्व क्रिया अत्यंत पवित्र आहेत. आपली वाणी संस्कृत असो कीं प्राकृत ती मला वेदासम शिरोधार्य आहे. सर्व भूमी आपल्यासाठी वाराणसीच आहे. कारण आपण सदैव ब्रह्मभावात असता.

**अनंत कोटी ब्रह्मांडनायक भगवान योगीराज सद्गुरू वामनरावजी गुळवणी महाराजांचे वर्णन श्रीमत् आद्य शंकराचार्यांच्या या सुयोग्य शब्दांखेरीज करताच येत नाही. त्यांनी घडवलेली हि कलाकृती त्यांच्याच चरणी सादर समर्पण .**

||श्रीगुरु:शरणं||

## लेखकाचे मनोगत

श्रीमत् आद्य शंकराचार्य यांच्या उदात्त व उत्तुंग व्यक्तिमत्वाचे रेखाटन शब्दांच्या मर्यादे पलीकडले आहे. त्यातही माझ्या सारख्या अप्रबुध्दाला ते अशक्यच आहे. तथापि सद्गुरुकृपा व प्रेरणा हा एकमेव आधार या लेखनास कारणीभूत झाला आहे. सद्गुरूंचे सतत मार्गदर्शन व विविध संदर्भग्रंथ उपलब्ध करून देण्याची कृपा ह्या भांडवलावरच हा ग्रंथ तयार झाला आहे.

इतिहास म्हणून हा ग्रंथ लिहिलेला नाही. आचार्यांच्या उदात्त सामुहिक सहजीवनाची, तत्त्वांची ओळख काही अंशाने तरी व्हावी व वाचकाने आचार्यांच्या प्रेरणेने ईश्वराभिमुख व्हावे या हेतूने हे लेखन झाले आहे.

संस्कृत संवाद निर्दोष होण्यासाठी थोरल्या बंधूंनी मार्गदर्शन केले आहे. लिखाण जसे जसे पूर्ण होईल तसे तसे त्याचे श्रवण करून थोरल्या बंधूंनी लवकरात लवकर लेखन व्हावे असा आग्रह धरल्यामुळेच लेखनास गती मिळाली. मी त्यांचा ऋणी आहे.

जनता जनार्दन हे दुर्वांकुर अव्हेरणार नाही याची खात्री आहे. माऊलीच्याच शब्दात सांगायचे तर,

परी गीता ईश्वर भोळा | ले व्यासोक्तिकुसुममाला |
तरी माझिया दुर्वादला | ना न म्हणे कीं || ज्ञानेश्वरी १८-१७११ ||

गुरुदेवाङ्कित
अविनाश महादेव नगरकर

||श्रीगुरू:शरणं||

## वंदना प्रकाशनाचे प्रकाशक प्राध्यापक अनंत वि. कुलकर्णी यांचे मनोगत

भारतभूमीत ज्या ज्या वेळी बुध्दिमत्तेच्या बळावर धूर्त माणसे सामान्य आणि अज्ञानांचा बुद्धिभेद करून त्यांना पाखंडी बनवितात, समाजाच्या नैतिक मुल्यांवर आघात करतात त्या त्या वेळी कपटी आणि धूर्तांशी वादविवाद करून आणि बुद्धीवादात त्यांना हरवून वठणीवर आणण्यासाठी अलौकिक बुद्धिमत्तेच्या विभूती जन्मास येतात.

अशीच स्थिती आचार्यांच्या वेळी उद्भवली होती. वैदिकधर्माला एका प्रकारची अवकळाच आली होती. बौध्द आणि जैन भिक्षूंनी वैदिकधर्माला फार मोठ्या संकटात टाकले होते. सर्व बाजूंनी वैदिकधर्म व वैदिक संस्कृती यावर निधर्मियांनी जोराचा हल्ला चढविला. तेंव्हा वैदिक धर्म भारतातून नाहीसा होतो कीं काय? अशी भीती वैदिक धर्माभिमान्यांना वाटू लागली होती, आचार्यांनी बौध्द व जैन त्याच प्रमाणे शैव, शाक्त, कापालिक, उग्रवैभव, नीलकंठ, भट्भास्कर, तांत्रिक इत्यादी वेद विरुध्द मतांचे जोरदार खंडण करून समन्वयवादाची मोठ्या कुशलतेने मांडणी केली. अद्वैताचा पुरस्कार करून वेदांचे प्रामाण्य व ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करून वैदिक धर्माची विस्कळीत झालेली घडी नीटनेटकी केली. स्वत:च्या आचरणानेच ज्वलंत वैराग्य दाखवून भक्तिमार्गाची व ज्ञानमार्गाची उज्वल परंपरा स्थापन केली. देशाला आणि समाजाला अनेक महासंकटातून आणि अधोगतीतून मुक्त केले. श्रीमत् शंकराचार्यांच्या बद्दल म्हणूनच म्हटले आहे कीं,

**"अगर न होते श्री शंकर तो रहते सभी बौध्द बनकर"**

महाराष्ट्रातील साधू-संतांनी आचार्यांचेच तत्त्वज्ञान उचलून धरले. परिणामी भक्तिमार्गाला द्वैतवादच स्वीकारला पाहिजे याला छेद जाऊन अद्वैतवादाची पताका सर्व देशभर फडकू लागली. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, रामदास आदी अनेक संतांनी आचार्यांच्या अद्वैत मतांचा व अद्वैतान्तर्गत भक्तितत्त्वाचा पुरस्कार केला. आणि ज्ञानोत्तर "भक्ति" रुढ केली. अगदी अलीकडच्या काळात स्वामी रामतीर्थ, स्वामी रामकृष्ण स्वामी विवेकानंद, रमण महर्षी आदींनी हे तत्त्वज्ञान सुदूर अन्य देशातही नेऊन पोहोचविले.

वेद हे समस्त ज्ञानाची खाण आहे असे श्री शंकराचार्यांचे ठाम मत आहे. श्रीशंकराचार्यांची थोरवी हीच कीं त्यांनी सर्व शास्त्रे अभ्यासिली आणि त्याबरोबर सर्वांनाच मुक्तीचा मार्ग मोकळा करून दिला. आचार्यांच्या काळी समाजाची जी अधोगती झाली होती तशीच ती आजही अनुभूत होते आहे. सर्वत्र अनीती, सामाजिक भ्रष्टाचार, अंधश्रद्धावाद्यांची अंधश्रद्धा (अंधश्रद्धा निर्मूलन?) चळवळ, राजकारणाच्या नावाखाली पुढाऱ्यांचा स्वैराचार, परस्परांबद्दल निर्माण झालेला अविश्वास बोकाळला आहे. अशा परिस्थितीत आजही श्रीशंकराचार्यासारख्या विद्वान ज्ञानयोगी, धर्मसंस्थापकांच्या चरित्राकडे वळण्याची अत्यंत आवश्यकता निर्माण झालेली आहे.

या सर्व पार्श्वभूमीवर श्री. अविनाश नगरकर यांनी श्रीमद् आद्य शंकराचार्य यांच्या चरित्राचा घेतलेला वेध हा काळानुरूप व लोकाभिमुख दृष्टिकोनाचा परिचय देतो. आचार्यांच्या उदात्त सामुहिक जीवनाची, तत्त्वांची ओळख व्हावी असे मनोगत त्यांनी व्यक्त केले आहे ते सार्थच आहे.

श्री नगरकर हे बहु आयामी व्यक्तिमत्व आहे. सद्गुरूंवरच्या निष्ठेनी सर्व काही साध्य होते अशी त्यांची श्रद्धा आहे. भारतीय परंपरेतील सद्गुरूंचे स्थान त्यांनी जाणले आहे. अध्यात्मिक विचारांचा वारसा हा या कुटुंबाचा विशेष आहे. वडील व आजोबांकडूनच तो मिळाला असल्याचे ते मानतात. सर्वात महत्वाचे म्हणजे सन १९६७ मध्ये त्याना प्राप्त झालेला योगिराज प. पू. वामनरावजी गुळवणी महाराज, पुणे यांचा अनुग्रह. त्यांच्या मार्गदर्शनानुसार केलेल्या साधनेचे व अध्ययनाचे फळ म्हणजे त्यांचे आजचे यश असे ते ठामपणे सांगतात. सन १९८४ नंतर त्यांच्या सामाजिक कार्याचे धुमारे फुटू लागले. अनेक सामाजिक, सांस्कृतिक व धार्मिक संस्थांचे ते अध्यक्ष म्हणून जबाबदारी पार पाडतात. ज्ञानेश्वरीवर अधिकारवाणीने प्रवचन करणे हा त्यांचा हातखंडा आहे. श्रीमत् आद्य शंकराचार्य ह्या पुस्तकातील भाषा सौष्ठव व कथाभागाची अलगदपणे उलगडणारी घडी वाचकांचे मन भारून टाकेल या बद्दल आम्हास संशय नाही, शेवटी साखरेची गोडी वर्णन करण्यापेक्षा अनुभूतीनेच अधिक कळत असल्यामुळे वाचकांनी त्याचा आस्वाद घ्यावा असे आवाहन !

# डॉ. गं. वि. नेर्लेकर यांचा अभिप्राय

**|| श्री ||**

आदरणीय अविभाऊंस,

स. न.

तुम्ही मोत्यासारख्या टपोऱ्या सुंदर अक्षरांत लिहिलेले जगद्गुरू शंकराचार्यांचे चरित्र (२ भाग) वाचले. मन धाले.

अलौकिक प्रज्ञावंत जगद्गुरू श्री. शंकराचार्यांच्या उत्तुंग व्यक्तिमत्वाचे विविधांगी दर्शन तुम्ही प्रसंगा प्रसंगातून परिश्रम पूर्वक समर्थपणे घडविले आहे. तुमची लेखनशैली प्रासादिक व मनोवेधक आहे. ह्या सर्व गोष्टी एकत्र जमून येण्यास सद्गुरूंची कृपाच हवी.

जिज्ञासू रसिक वाचक ह्या चरित्राचे स्वागतच करतील.

चरित्र लवकर प्रसिद्ध व्हावे अशी सास्द्गुरुंची प्रार्थना.

कळावे,

आपला स्नेहांकित

गं. वि नेर्लेकर

डॉ. गं. वि. नेर्लेकर

M. A. Ph. D.

प्राध्यापक – रुपारेल कॉलेज,

संस्कृत व मराठीचे प्राध्यापक व लोकसत्ताचे मराठी वाङ्मयाचे समीक्षक.

# स्वामी अनुभवानंद यांचा अभिप्राय

२३-०५- २००५

श्रीमत् शंकराचार्य चरित्र सारामृत

जगद्गुरू भगवान् शंकराचार्यांचे जीवन असाधारण. साधारण माणसाला त्याचे आकलन होणे कठीण. असे हे खूप कठीण कार्य असाधारणपणे अविनाश नगरकरांनी केलं आणि सगळ्यांना उपलब्ध होईल म्हणून प्रकाशित केलं.

अविनाश नगरकरांची आणि माझी भेट ऑकलंडला ज्ञानेश्वरी अभ्यासू मंडळीत झाली आणि या पुस्तकाचे हस्तलिखित हाती आलं. हे पुस्तक मराठी माणसानं न्युझीलंड मध्ये मराठी माणसांना आध्यात्म रसपान व्हावं ह्या दृष्टीने प्रकाशित होत आहे.

तसं पाहिलं तर सगळं पुस्तकच अधोरेखांकित करण्यासारखं सुंदर आहे. त्यातल्या त्यांत प्रभाकराचार्य, मंडनमिश्र, इत्यादी प्रसंग व आचार्यांचे अष्टपैलू व्यक्तिमत्व सहजपणे नगरकरांनी प्रस्तुत केलं आहे. हे सगळं त्यांची गुरुभक्ती अध्यात्मिक साधना व आचार्यांच्या अद्वैत विचार परंपरेचा वारसा असल्यामुळे शक्य झालं आहे. आचार्यांचे आशीर्वाद व सद्गुरुकृपा त्यांना उदंड लाभो.

स्वामी अनुभवानंद
ऑकलंड, न्यूझीलंड.

# अनुक्रमणिका

# || श्रीमत् शंकराचार्य चरित्र ||
# || सारामृत ||

जन्म वैशाख शुद्ध पंचमी. नंदननाम संवत्सर. युधिष्ठिर शक २६३१, म्हणजे इसवीसन पूर्व ५०९ वैशाख महिना वसंत ऋतू, रविवार, जन्मस्थळ कालटी गांव, केरळातल्या पूर्णानदीच्या काठी वसलेले.

जन्मकाळाचे ग्रह – जन्म नक्षत्र पुनर्वसू, कर्क लग्न, सूर्य मेष राशीत.

जन्म कुंडली

सर्व महत्वाचे ग्रह स्वस्थानी होते.




पित्याचे नाव – शिवगुरू, आई : आर्यांबा, ही पंजरपल्लीच्या मखपंडितांची कन्या. शिवगुरू हे विद्याधिराज नामक ब्राह्मणाचे पुत्र.

पुरातन ग्रंथ – मार्कंडेय संहिता- चित्सुखाचार्य रचित बृहत् शंकरविजय – शिवरहस्य (ह्यात भगवान् शिवांनी आपला हा अवतार सांगितला आहे. ) कूर्म पुरण – भविष्य पुरण इत्यादी .

प्रकरण १ ले

# बालपण

डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन म्हणतात शंकराचार्य म्हणजे वैदिक ज्ञान आणि मुक्त चिंतन करणारी बुद्धिमत्ता यांचे बालबृहस्पती होते. कुशाग्र बुद्धी, तल्लख स्मरणशक्ती, अत्यंत देखणी व बळकट शरीरयष्टी, चेहरा पूर्णचंद्रासारखा तेजस्वी. भव्य कपाळ, रुंद व भरदार छाती, आजानुबाहू  व लालबुंद नखे असलेली लांबसडक बोटे. असे विलोभनीय व्यक्तिमत्व लाभले होते. शांत व निश्चयी ध्रुवासारखे, निग्रही योगी शुकमुनींसारखे तर वादविवादात याज्ञवल्क्यां सारखे तेजस्वी व प्रभावी होते. वाणी मृदू, गंभीर, पण कणखर. शब्दोच्चार व लिपी यांचे ज्ञान ५ व्या वर्षीच झालेले होते. म्हणून पित्याने ५ व्या वर्षीच व्रतबंध केला. त्यामुळें,

"अष्टवर्षे चतुर्वेदी द्वादशे सर्वशास्त्र विद् |

षोडशे  कृतवान् भाष्यं द्वात्रिंशे मुनिरभ्यगात् ||"

म्हणजे आठव्या वर्षी ते चतुर्वेदी झाले. बाराव्यावर्षी सर्वशास्त्र संपन्न झाले. सोळाव्या वर्षी प्रस्थानत्रयीवर म्हणजे उपनिषदे, ब्रह्मसूत्र व श्रीमद्भगवद्गीता ह्याच्यावर जग प्रसिद्ध भाष्य केले. त्यानंतर ३२ व्या वर्षी दिव्यलोकी परतले.

कालटीची ग्रामदेवता भगवती. गावाबाहेर हे मंदिर होते. शिवगुरू रोज तिची पूजा करीत असत. दुध साखरेचा नैवेद्य दाखवीत व शेष प्रसाद म्हणून बालशंकरासाठी घरी आणून त्याला पाजत. त्यावेळी बालशंकर ४ वर्षांचे होते.

एकदा शिवगुरूंना प्रापंचिक व्यवसायासाठी बाहेरगावी जावे लागले. आर्यांबा पूजा करू लागली. शरीर अस्वास्थ्यामुळे एक दिवस तिला पूजेसाठी जाणे अशक्य झाले. तिने बालशंकराला पाठवले. बालशंकर उत्साहाने गेला. पूजा केली. दूध साखरेचा नैवेद्य दाखवला. डोळे उघडून पाहिले तो दुधाचा पेला तसाच भरलेला. आपण अर्पण केलेले दूध देवी घेत नाही म्हणून त्याला दुःख झाले. थोडी वाट पाहून तो निराश झाला. भावावेग  अनावर होऊन रडू लागला. म्हणून देवीने प्रकट होऊन दुधाचा पेला रिकामा केला. भगवतीने आपल्याला प्रसाद न ठेवता सर्व दूध पिऊन टाकले म्हणून बालशंकर अधिकच व्यथित झाला. त्याला रडू आवरेना. त्याचे समाधान करण्यासाठी देवीने स्त्रीरूप धारण केले व बालशंकराला मांडीवर पदराखाली घेऊन स्तनपान दिले. त्या स्तनपानाने बालशंकराची समाधी लागली. समाधी अवस्थेतून बाहेर येताच बालशंकराने “देवीभुजंगस्तव” हे अठ्ठावीस श्लोकांचे स्तोत्र गाईले. त्यातली अठ्ठाविसाव्या श्लोकातली प्रार्थना फारच हृद्य आहे.

“इति प्रेमभारेण किञ्चिन्मयोक्तं न बुध्वैवध्वै तत्त्वं त्वदीयं मादियम् |

विनोदय बालस्य मौर्ख्यं हि मातस्तदेतत् प्रलापस्तुतिं मी गृहाण ||२८||”

(हे माते तूं कोण व मी कोण हे न जाणताच मी प्रेमाने जे काही बडबडलो ते या मूर्ख बालकाच्या समाधानासाठी बडबडगीत म्हणून त्याचा स्वीकार कर. )

बालशंकराचे उपनयन झाल्यावर थोड्याच दिवसांत शिवगुरू आजारी पडले. त्या आजारातच त्यांचा अंत झाला. आर्यांबा दुःखाने भारली गेली. पण बालशंकरासाठी तिने आपले दुःख गिळले. पितृछत्र हरपल्यामुळे बाल शंकराच्या शिक्षणाची व्यवस्था व्हावी म्हणून तिने शंकराला कालटी पासून २२-२४

किलोमिटर अंतरावर असलेल्या गुरुकुलात दाखल केले. त्याकाळी गुरुकुलात राहाणाऱ्यांना ब्रह्मचर्य पालनाचे कडक नियम पाळावे लागत. प्रत्येक ब्रह्मचारी विद्यार्थ्याला ठराविक घरी जाऊन भिक्षा मागावी लागे. यात नम्रता व शिस्त अभिप्रेत होती.

एकदा असे झाले कीं शंकर एका पवित्राचरणी दरिद्री ब्राह्मणाच्या घरी भिक्षा मागण्यास गेला होता. त्यावेळी तो ब्राह्मण स्वतःच दुसरीकडे भिक्षा मागण्यास गेला होता. शंकराने जेंव्हा आपल्या मंजुळ आवाजात "ॐभवती भिक्षांदेहि" असा पुकारा केला तेंव्हा त्या ब्राह्मणाची पत्नी बाहेर आली. ह्या असामान्य बालकाला पाहून काहीच न बोलता भिक्षा आणण्यासाठी घरात गेली. सगळी मडकी गाडगी रिकामी पाहून उदास झाली. डबडबलेल्या नेत्रांनी शोध घेऊ लागली अन् तिला एक वळलेला आवळा दिसला. तोच घेऊन ती बाहेर आली. भिक्षा म्हणून शंकराला तो आवळा घातला. त्या आवळ्याच्या भिक्षेकडे पाहून शंकराने जाणले कीं इथे अठराविश्वे दारिद्र्य आहे. त्याचे अंत:करण द्रवले. त्याने एक स्तोत्र म्हणायला सुरुवात केली. स्वत:च रचलेल्या कनकधारा स्तोत्राने त्याने लक्ष्मीची स्तुती आरंभली होती. त्यावेळी लक्ष्मीने प्रसन्न होऊन सोन्याच्या आवळ्यांचा पाऊस पाडला. त्या ब्राह्मण-ब्राह्मणीचे दारिद्र्य कायमचे दूर केले. त्यामुळे त्या गावाचे नाव कनकांबा पडले.

अशाप्रकारे शंकराचे गुरुकुलात शिक्षण चालू होते. केवळ तीन वर्षाच्या कालावधीत शंकराने गुरुकुलातील अभ्यासक्रम प्राविण्यासह पूर्ण केला. केवळ आठव्या वर्षीच अभ्यासक्रम पूर्ण झाला. मग आता गुरुकुलात रहाण्याची आवश्यकता नाही म्हणून गुरुंनी शंकराला घरी पाठवून दिले. गुरुकुलात असतानाच शंकरांची अलौकिक बुद्धिमत्ते विषयी खूपच ख्याती झाली. त्यामुळें

त्याकाळच्या पद्धती प्रमाणे त्यांची कीर्ती राजदरबारापर्यंत पोहोचली. केरळचा राजा राजशेखर ह्या तेजस्वी बालकाच्या भेटीसाठी उत्सुक झाला. राजाने आपल्या सचिवा बरोबर शंकरांना आणण्यासाठी पालखी व नजराणा म्हणून हत्ती, घोडे व ताटभर मोहरा पाठवल्या. शंकरांनी ते अत्यंत आदराने साभार परत पाठवले. विनयाने एक पत्र लिहिले. “महाराज! आपण मन:पूर्वक पाठवलेल्या भेटी मिळाल्या. आपल्या सहृदयते बद्दल मन:पूर्वक धन्यवाद. पण ह्या गोष्टींचा मला काय उपयोग? आपण प्रजा कल्याणासाठी त्या वापराव्या. विद्वानांच्या विषयी आपण जो आदर बाळगता त्यामुळे आपले भलेच हाईल. त्यातच मला आनंद आहे. ”

शंकरांच्या ह्या कृतीमुळे लोकांच्या मनात त्यांच्या विषयी प्रचंड आदर निर्माण झाला. राजाला हे सर्व अत्यंत आश्चर्य कारक वाटले. या अद्भुत बालकाच्या भेटीसाठी राजा स्वत:च निघाला. शंकरांच्या तेजस्वी दर्शनामुळे राजा अधिकच भारावला गेला. वयाचा मुलाहिजा न ठेवता राजा शंकरांच्या चरणी नतमस्तक झाला. राजाने स्वत: तीन नाटके लिहिली होती. ती त्याने शंकरांच्या चरणी अर्पण केली. राजाला मूल नव्हते म्हणून त्याने अपत्य प्राप्तीची इच्छा शंकरांपुढे व्यक्त केली. त्यावेळी शंकरांनी राजाला सुपुत्र लाभण्याचा वर दिला. राजाने स्वत:बरोबर आणलेल्या अनेक नजराण्यांचा शंकरांनी स्वीकार करण्याचा आग्रह धरला. राजाच्या आग्रहा खातर शंकरांनी ते नजराणे देवी भगवतीच्या देवालयाच्या जीर्णोद्धारासाठी स्वीकारले. राजाला आनंद झाला. पुढे यथावकाश राजाला योग्य समयी पुत्र प्राप्ती झाली.

प्रकरण २ रे

# आचार्यांची संन्यास घेण्याची तयारी

बालशंकराचे घरातले वास्तव्य आर्यांबेला सुखावत होते. नवीन चैतन्य निर्माण झाले होते. पण शंकरांचे काही वेगळेच विचार चालू होते. ईश्वराविषयी व धर्मतत्त्वांच्या विषयी समाजात प्रचंड गोंधळ माजला होता. बौद्ध व जैन हे वेगळेच पंथ निर्माण झाले होते. त्यातही कर्मठ वैदिकांनी प्रचंड असामंजस्य अंगिकारले असून भक्तिमार्ग सोडूनच दिला आहे. सर्वांचा परमेश्वर एकच असूनही विविध पूजा प्रचारामुळे उपासक सामुहिक सहजीवन अकारण भेदमय करीत आहेत. स्पृश्यास्पृश्याचा पावित्र्याशी असलेला संबंध विसरून दैनंदिन जीवनातले ते एकमेव साधन समजून द्वेष व मत्सर वाढविण्या पलीकडे काहीच साधत नव्हते. पण लोकव्यवहार याच तत्त्वप्रणालीचा अंगीकार करून उच्च नीच या साचेबंद चौकटीत चालला होता. ईश्वराचे अस्तित्व केवळ नवस करून काम्य साध्य करण्यासाठीच असल्याची भावना दृढ झाली होती. अध्यात्म जवळ जवळ लोप पावू लागले होते. ह्या सर्व गोष्टींचे विचार-मंथन शंकर करीत होते. त्यासाठी त्यांना गरुडभरारी घ्यायची होती. पण या सर्व गोष्टींची माहिती मातोश्री आर्यांबांना कशी असावी? रोज नित्यनेमाने गंगेवर जावे. स्नान करावे. सोवळे-ओवळे पाळावे. भगवतीचा नैवेद्य करावा. मग नातवंडांचा राबता घरात सुरु झाला वंश वाढला कीं आपण सुटलो. ह्या पलीकडे आर्यांबा विचारच करू शकत नव्हती.

शिवगुरु व आर्यांबा ह्यांच्या विवाहानंतर बरीच वर्षे त्यांना अपत्य प्राप्ती झाली नव्हती. शिवगुरु व आर्यांबा यांनी पुत्र प्राप्तीसाठी व्रत करायचे ठरवले. त्याप्रमाणें ती दोघे केरळ मधल्या त्रिचूर गावी असलेल्या वृषाचल नामक शिवाच्या महाक्षेत्री आले. वृषाचल पर्वताच्या पायथ्याशी हे क्षेत्र आहे. वृषाचल पर्वताचा आकार प्रचंड मोठ्या नंदी सारखा आहे. म्हणून तो वृषाचल. त्या पर्वतामुळेच मंदिराचे नावही वृषभेश्वर मंदिर झाले. शिवगुरु व आर्यांबा यांनी भगवान् शिवाची उपासना पुत्र

प्राप्तीचा वर प्राप्त होई पर्यंत करण्याचा निर्धार केला. तिथेच मुक्काम केला. पहाटेच उठावे. मंदिराच्या जवळच्याच सरोवरात स्नान करावे. मंदिरात येऊन वृषभेश्वरावर एकशे एकवीस आवर्तनासह रुद्राभिषेक करावा. अभिषेकासाठी शुद्ध तूप वापरावे. सर्व पूजन झाल्यावर अपत्य प्राप्ती व्हावी म्हणून हात जोडून दोघांनी प्रार्थना करावी. असा त्यांचा नित्यक्रम सुरु झाला. बरेच दिवस झाल्यावर दोघेही भगवान् शिवशंकरांच्या कसोटीस उतरले.

भगवान् शिवांनी शिवगुरुंना स्वप्नात येऊन विचारले पुत्र कसा हवा? सामान्य बुद्धीचे पण शतायू पुत्र हवेत कीं असामान्य बुद्धीचा पण अल्पायु व फक्त एकच पुत्र हवा? या प्रश्नावर शिवगुरु गोंधळून जागे झाले. शिवगुरूंनी आर्यांबेला स्वप्न सांगितले. तिच्याशी विचार-विनिमय केला. नित्यप्रार्थनेच्या वेळी सांगितले कीं “देवा! तुझी जशी इच्छा असेल तेच आम्हाला मान्य होईल. आम्ही अज्ञानी आहोत. तूं आमचे हित करणारा आहेस. आम्ही केवळ निमित्तमात्र आहोत. तुझी इच्छा तूं आमच्याकडून पूर्ण करून घे. ”

ह्याचा परिणाम असा झाला कीं भगवान् शिवशंकर पुन्हा शिवगुरुंच्या स्वप्नात आले व म्हणाले, “मी स्वत: तुमच्या पोटी जन्म घेईन. पण अल्पकाळ वास्तव्य करीन. ” ह्या स्वप्नामुळे शिवगुरूंना परमानंद झाला. दोघेही आनंदाने कालटी गांवी परत आले. पुढे नंदननाम संवत्सरात वैशाख मासांत शुक्लपक्षात पंचमीला रविवारी दुपारी १२ वाजता शंकराचा जन्म झाला. त्यावेळी युधिष्ठिर शक २६३१ चालू होता. म्हणजे इसवीसन पूर्व ५०९ शक चालू होता. वसंतऋतू बहरला होता. आर्यांबा अपत्य प्राप्तीच्या आनंदात होती.

तोच आनंद ती आजही उपभोगत होती. शंकर तिचा बहिश्चर प्राण झाला होता. त्यातून आता बालशंकराला राजमान्यता प्राप्त झाली होती. तिच्या आनंदाला उधाण आले होते. अशा आनंदाला तडा देणे बालशंकराच्या जीवावर आले होते. पण बालशंकर आतां बाल राहिला नव्हता. गावांतले अत्यंत प्रतिष्ठित व ज्येष्ठ-श्रेष्ठ याज्ञिक यांचा राबता शंका समाधानासाठी व ज्ञानप्राप्तीसाठी आर्यांबेच्या घरी सुरु

झाला होता. गावातले प्रतिष्ठित त्यांना शंकराचार्य म्हणून संबोधू लागले होते. आदराने व विनयाने त्यांचा सन्मान करू लागले होते. सर्व कालटी गांव त्यांना आतां शंकराचार्य म्हणू लागले होते.

अशा या आपल्या असामान्य पुत्राच्या सहवासात आर्यांबाचे दिवस आनंदात चालले असताना शंकराचार्यांनी आपला संन्यास घेण्याचा संकल्प प्रसंगोपात्त पण हळुवारपणे आईच्या कानावर घातला. आचार्यांचा हा बालवयातला संकल्प ऐकून ती अंत:करणात विव्हल झाली. परम दुःखाने ती काहीच बोलली नाही. तिचा आनंद क्षणात मावळला. शंकराचार्यांनी त्यावेळी तो विषय तिथेच थांबवला. त्यांना आईला दुःखी करावयाचे नव्हते. पण आपल्या निश्चयापासून ते परावृत्तही होणार नव्हते. आईला दिलासा देण्यासाठी ते म्हणाले, " आई! मी तुला जन्मभर सुखी ठेवण्याचा प्रयत्न करीन. तूं काळजी करू नकोस. "

शंकराचार्य निश्चयी होते. संन्यास तर घ्यायचाच पण आईचा विश्वास जास्त महत्वाचा. तिची परवानगी तितकीच महत्वाची. त्यामुळे त्यांनी प्रथम ते करायचे ठरवले. आपल्या मागे आईची काळजी घेणारे, तिच्या दुःखावर फुंकर घालणारे तिच्या जवळ कोणीतरी असणे आवश्यक आहे. अशी व्यक्ती शंकराचार्य शोधीत होते. घरातल्या सधनतेमुळे धनाची काळजी नव्हती. काळजी फक्त आईची होती. आता आचार्यांचे बरेच भक्त व शिष्य होत होते. त्यातच आचार्यांचा एक आवडता व सात्विक नातेवाईक परमभक्त झाला होता. त्याचे नाव अग्निशर्मा होते. अत्यंत तल्लख, प्रामाणिक व प्रेमळ असा हा अग्निशर्मा शंकराचार्यांचे प्रेम व विश्वास यांना पात्र झाला. शंकराचार्य त्याच्या व्यवहार कुशलतेवर खुश होते. आईची काळजी अग्निशर्मा निश्चित घेईल ह्याची शंकराचार्यांना विविध प्रसंगी पूर्ण खात्री पटली. आईची परवानगी घेण्यापूर्वी आचार्यांनी अग्निशर्म्यास विश्वासात घेऊन आपण संन्यास घेणार असल्याचे सांगितले. अग्निशर्मा आचार्यांच्या प्रत्येक शब्दावर विश्वास ठेवत असे. त्याने ज्यावेळी आचार्यांना आपला काय विचार केला असे विचारले. तेंव्हा आचार्यांनी आपली सर्व मालमत्ता अग्निशर्म्याच्या स्वाधीन

करण्याचा विचार प्रकट केला. अग्निशर्मा आपल्यावरील ह्या विश्वासाने भारावून गेला. आर्यांबेची सर्वतोपरी काळजी घेण्याचे वचन त्याने आचार्यांना दिले. त्यामुळे ती काळजी मिटली. आता फक्त आईची परवानगी मिळवण्याची जरुरी होती.

आर्यांबा आचार्यांना क्षणभरही नजरेआड होऊ देत नव्हती. आचार्यांनी आपला संन्यास घेण्याचा मानस तिला पुन्हा एकदा सांगितला. त्यावेळी आर्यांबा म्हणाली, “बाळा! तूं खूपच मोठा आहेस. तूं संन्यास घेतल्यावर माझे काय होईल? याचा तूं विचार केलास कां? माझ्या अंतकाळी तूं माझ्या जवळ असावास असे माझ्या मनात सारखे येत आहे. तुझ्या हातूनच माझा अंत्यसंस्कार व्हावा अशी माझी तीव्र इच्छा आहे. तूं जर संन्यास घेतलास तर हे कसे बरे शक्य होईल? अरे, संन्यास घेणाऱ्याचे पूर्वाश्रमातील सर्व संबंध तुटतात. आई, वडील, भाऊ अशी नातीच संन्यास घेणाऱ्याला उरत नाहीत बघ. ह्या गोष्टीचा तूं विचार कर. ” इतके बोलून आई सद्गद होऊन गप्प बसली.

ह्यावर आचार्य आईला म्हणाले, “आई! तुझी ईश्वरावर प्रगाढ निष्ठा आहे. माझे जीवितकार्य त्या ईश्वरानेच निश्चित केले आहे. तुला दुःखी करून, तुला सोडून जाण्याची मला हौस नाही. पण घरी राहून व संसार करून संभ्रमांत पडलेल्या समाजाला चिरंतन सत्याचा मार्ग कसा दाखवता येईल? त्यासाठी निःसंग होऊन भारतभर भ्रमणच करावे लागणार. त्यासाठी संन्यास ग्रहण केला तरच हे काम सोपे होईल. आपला मुलगा आपल्याला अनाथ करून टाकून जात आहे अशी भावना तूं माझ्या विषयी कधीही करून घेऊ नकोस. कारण तुझ्या जवळ राहून मी जेवढे कार्य करू शकेन त्याच्या शंभरपट अधिक मला संन्यास ग्रहण करून करता येईल. आई तूं अत्यंत विचारी आहेस. तूंच मला म्हणाली होतीस कीं, ह्या भूमीवर खूपच पाखंड माजले आहे. त्यामुळे जीवनाचे अंतिम ध्येय असलेल्या परमानंदाला लोक पारखे झाले आहेत. त्यांना निसर्गाने दिलेल्या संपत्तीचा समान व संयत भोग घ्यायला शिकवले पाहिजे. त्यात सामुहिक सहजीवनाची मौज अनुभवता येते. ही तुझी मते तूं विसरलीस कीं काय?”

आचार्यांच्या ह्या बोलण्यावर आर्यांबा खिन्नपणे हसली. म्हणाली, “ते कार्य तूं इथें राहूनसुद्धा करू शकतोस. ” आचार्य म्हणाले, “ इथले कार्य तर जवळ जवळ झाल्यातच जमा आहे. विद्वान व हुशार वैदिकांनी ह्या परम तत्त्वांचा अंगीकार केला आहे असे वाटते. त्यामुळे भारतभर हिंडून सर्वत्र प्रचार करणे गरजेचे आहे. तूं समाधानाने मला आशिर्वाद दे. संन्यास ग्रहण करण्यास अनुमती दे. ”

आर्यांबा विचारमग्न झाली. आचार्यांच्या मधुर पण निश्चयी बोलण्याने तिला विचार करणे गरजेचे वाटू लागले. त्याच रात्री तिला स्वप्न पडले. स्वप्नात गौतम व अगस्ती ऋषी आले. म्हणाले, “माते तुझा पुत्र अलौकिक प्रज्ञेचा असून साक्षात् शिवाचा अवतार आहे. त्याचे आयुष्य थोडे आहे. तेंव्हा वैदिकधर्माचा प्रकाश लोकांना दाखवण्याचे कार्य करण्यासाठी त्याला संन्यास ग्रहण करू दे!”

आर्यांबा सकाळी जागी झाल्यावर मनाची समजूत घालू लागली. काय बाई माणसाचे मन असते? मनी वसे ते स्वप्नी दिसे म्हणतात ते काही खोटे नाही. असा सोयीस्कर विचार करून तिने ते स्वप्न विसरून जायचे ठरवले. सडा-संमार्जनादी झाल्यावर नित्याप्रमाणे ती गंगेवर स्नानासाठी निघाली. आचार्य रोजच आईला घेऊन गंगेवर जात असत. आजही ते तिच्या समोर उभे राहिले. आर्यांबेच्या मनात आले, काहीं ना काहीतरी निमित्त काढून संन्यास ग्रहणापासून याला परावृत्त करावे. असा विचार करून ती म्हणाली, “बाळा! तूं रोज मला स्नानासाठी गंगेवर घेऊन जातोस. आतां दिवसेंदिवस मी थकतच जाणार. मग मला एकटीला स्नानासाठी तुझ्या आधाराखेरीज गंगेवर कसे बरे जाता येईल?”

आचार्य ह्या बोलण्याचा रोख समजले. हसत हसत आईला म्हणाले, “आई, कशाला काळजी करतेस? तुझ्या सोयीसाठी वृषभेश्वर गंगेलासुद्धा आपल्या घरा जवळून जायला सांगेल. ”

ह्यावर अत्यंत भावपूर्ण नमस्कार करीत आर्यांबा म्हणाली, “तुझ्या तोंडात साखर पडो अन् तसे होवो, पण तसें जरी झाले तरी माझ्या अंतकाळच्या इच्छेचे काय? तूं संन्यास घेतलास तर वृषभेश्वर ती पूर्ण करील कां?”

ह्यावर आचार्य खूप गंभीर झाले. आचार्य गंभीर पण निश्चयी स्वरांत आईला सांगू लागले, “आई, तूं म्हणतेस तसे आवश्य घडेल. संन्याशाची सगळी नाती तुटतात हे अगदी खरे आहे. पण त्यातला गर्भित अर्थ असा आहे कीं आई, वडील, भाऊ, बहिण यांचे भौतिक स्वार्थासाठी नाते पूर्ण तुटते. पण ज्या ईश्वराने अलौकिक माता-पुत्र संबंध निर्माण केला तो अध्यात्मिक दृष्टीनेसुद्धा कधी क्षीण होऊ शकत नाही. पण भौतिकाचे तसे नाही. आईचे प्रेम व आई करीत असलेली पुत्राची सेवा ह्या बाबतचे संबंध संपूर्ण सोडावे लागतात. पण शास्त्रसुद्धां “न मातु:पर दैवतम्” असे सांगते. एक वेळचे मातेचे स्तनपान पुत्राला कायमचे ऋणी करून ठेवते. मी ते कसे विसरेन. आई व्यवहार हा दोन प्रकारचा असतो. एक निरपेक्ष व दुसरा अपेक्षा ठेऊन वा अंतरात काही हेतू धरून. संन्याशाला निरपेक्षता, शांती, समदर्शन, निर्वैर व ईश्वराचे मनन ह्या पांच गुणांचाच फक्त संग ठेवायचा असतो. मग असे निरपेक्ष जीवन जगत असताना माझ्या परम दैवताने म्हणजे मातेने अंतकाळी भेटण्याची इच्छा प्रकट केली तर मला यावेच लागेल. कारण शास्त्र असे सांगते;

“सर्व वंदेन यतिना प्रासुर्वन्द्या प्रयत्नत: ||”

त्यामुळे मी तुला वचन देतो,

अहंन्यम्ब रात्रिसमये समयांतरे वा संचिंत्य स्ववशगो ऽ वशगोऽथवा मां |

एष्यामि तत्समयं सकलं विहाय विश्वासमाप्नुहि मृतापि संस्कारीष्ये ||

“आई, दिवस असो कीं रात्र असो, किंवा अन्य कोणतीही वेळ असो तूं माझे भावस्मरण कर किंवा कुणाबरोबर निरोप पाठव, मी हातातले सर्व काम सोडून धांवत तुझ्याकडे येईन. यावर विश्वास ठेव कीं तुझा अंत्यसंस्कार मी स्वत: करीन. ” ह्यावर आर्यांबा काय बोलणार? तिला काहीच युक्तिवाद सुचेना म्हणून त्यातून बाहेर पडण्यासाठी ती म्हणाली, “चल गंगेवर जाऊ. खूप उशीर झालाय!” आचार्य समजले अजून हिच्या मनाची तयारी होत नाही. इतक्यात दरवाज्याच्या बाहेर खूपच गलका ऐकू आला. अग्निशर्मा घाईघाईने आता आला. आचार्यांना वंदन

करून म्हाणाला, “आई, आचार्य, लवकर बाहेर या!  मोठाच चमत्कार झाला आहे. गंगेने आपला प्रवाह बदलला आहे. ती आपल्या घराजवळून वाहू लागली आहे. ” आर्यांबेचा आपल्या कानावर विश्वास बसेना. ती आचार्यांचा हात धरून लगबगीने हा चमत्कार पहायला बाहेर आली. खरोखर गंगेचा प्रवाह त्यांच्या घरा जवळून वाहाताना तिला दिसला. ती विस्फारलेल्या नेत्रांनी आचार्यांकडे पाहू लागली. त्यांत भाव होता तो शब्दांच्या पलीकडला. पण मनात विचार होता, “अरे लबाडा, शब्दसामर्थ्याचा प्रत्यय देऊन माझ्याकडून संन्यास घेण्याची परवानगी मिळवतोस काय? पण मी ही तितकीच पक्की आहे. मी काहीं परवानगी देणार नाही!” आर्यांबेच्या निःशब्द विचारांना आचार्य तिच्या डोळ्यांत वाचून मुग्ध हसले.

आर्यांबा गंगेतून स्नान करून बाहेर आली. आचार्य स्नानासाठी गंगेत उतरले. आचार्य पोहत होते. आर्यांबा व इतर लोक आचार्यांकडे कौतुकाने पाहत होते. इतक्यात लोकांनी एका मगरीला आचार्यांच्या रोखाने येताना पाहिले. ते असहाय्यतेने ओरडले, “आचार्य! मगर!” आर्यांबा घाबरून पाहू लागली. आचार्य शिताफीने तीराकडे येऊ लागले. तीरा जवळच्या एका दगडाला धरून ते वर चढणार इतक्यात मगरीने त्यांचा उजवा पाय पकडला. जीवाच्या आकांताने ते आई पहात असताना तिला म्हणाले, “आई! मगर मला मारून खाणार, माझे आयुष्य फुकट जाणार. त्या ऐवजी तूं वृषभेश्वराची प्रार्थना कर. मला संन्यास घेण्यासाठी तरी वाचवण्यास सांग. !” आपल्या डोळ्या देखत मगर आपल्या मुलाला खाताना पाहून आर्यांबेने प्राणपणाने व कळवळून वृषभेश्वराची प्रार्थना केली. “देवाधिदेवा वृषभेश्वरा, मला क्षमा कर. वाटल्यास मला घेऊन जा. पण माझ्या शंकराला वाचाव. तुझी इच्छा असल्यास त्याला संन्यास घेऊ दे. मी आड येणार नाही. पण माझ्या पोटच्या गोळ्याला वाचव. तो माझ्या काळजाचा तुकडा आहे. ” आणि काय आश्चर्य मगर झुपकन् पाय सोडून पाण्यात शिरली. आर्यांबेने ते पाहिले पण आनंद, भय आणि दुःख ह्यांच्च्या तीव्रतेने तिला भोवळ येऊन ती खाली पडली. आचार्य पटकन् वर आले. त्यांनी आईचे मस्तक आपल्या मांडीवर घेतले. गंगाजल शिंपडून तिला

शुद्धीवर आणले. आचार्यांचा हा स्पर्श तिला आतां आयुष्याच्या अंतापर्यंत सुखावणार होता.

आचार्यांनी अग्निशर्म्याच्या हवाली आईला व सर्व मालमत्तेला सहजतेने सोपविले. अत्यंत भावपूर्ण शब्दांत आईला म्हणाले, “आई, तुला कशाचीही कमतरता पडणार नाही. तुझा आशीर्वाद माझ्या पाठीशी सदैव असेल. आतां माझ्या ऐवजी अग्निशर्मा तुझा सांभाळ करील. तूं त्याला सांभाळून घे. मला माझ्या गुरुंच्या शोधार्थ निघावे लागेल. त्यानंतरच मला संन्यास घेता येईल. मला ज्ञात आहे कीं तुझ्या मातृहृदयाला एकुलत्या एक पुत्राच्या विरहाची आग सहन करणे खूप कठीण आहे. पण तुझे मनोधैर्य वृषभेश्वराच्या कृपेने अपार वाढेल. तूं त्याच्याच कृपेने हा भवसागर पार करशील आणि मुक्त होशील. ”

आचार्य अत्यंत भावविवशहोऊन बोलत होते. आईचे नेत्र अनावर अश्रूंना अनिर्बंध करून वाहात होते. कंठ सद्गद झाला होता. आचार्यांनी जेंव्हा तिला वंदन केले तेंव्हां ते परमपवित्र अश्रू आचार्यांच्या मस्तकावरून खाली ओघळले. आचार्य कालटी सोडून निघाले हे काहीं क्षणातच सर्व कालटीत झाले. सारा गांव आचार्यांना निरोप द्यायला जमला. आचार्यांना वंदन करण्यासाठी आबालवृद्धांची दाटी झाली होती. सर्वांना आशिर्वाद देऊन आचार्य झटकन् घराबाहेर पडले. दुतर्फा नागरिक उभे होते. सुवासिनी पंचारत्यांची तबके घेऊन दुरूनच त्यांना ओवाळत होत्या. त्या दिवशी कार्तिक शुद्ध एकादशी होती. आचार्य झरझर पावले टाकीत गावाच्या सीमेवर आले. पाठोपाठ आलेल्या नागरिकांना व अग्निशर्म्याला परत जाण्यास सांगितले व पाठ फिरवून आचार्य निघून गेले. त्या दिवशी आर्यांबेच्याच काय पण कालटीच्या बहुसंख्य घरात चूल पेटली नाही.

प्रकरण ३ रे

# सद्गुरू शोध

कार्तिक शुद्ध एकादशी युधिष्ठिर शक २६३९ या दिवशी म्हणजेच इ. स. पूर्व ५०० कालटी गांवातला हा बालतपस्वी-ज्ञानसूर्य- संपूर्ण भरतखंडाला प्रकाशमान करण्यास निघाला होता. त्याकाळी आजच्या सारख्या कोणत्याच सोयी नव्हत्या. जंगलातून पायी वाटचाल करायची. पाउलवाटेच्या आधारे चालायचे. विश्रांतीसाठी झाडाखाली बसायचे. नदीचे अथवा निर्मल झऱ्याचे जीवन प्राशन करायचे. छोट्या छोट्या वस्त्या लागल्यास “ॐभवति भिक्षांदेहि” व्हायचे अन्यथा नाही. असा सगळा खडतर प्रवास करीत बालशंकराचार्य निघाले होते.

केरळची सीमा पार केली. कुठें जायचे ते नक्की केले होते. गुरुकुलांत शिक्षण घेत असताना वेदांतातल्या सर्वश्रेष्ठ गुरुगोविंद भगवद्पाद ह्यांचे नाव ऐकले होते. मन त्यांच्याकडे जाण्यास आसुसले होते. शरीर चालत होते. कर्नाटकातल्या कारवार जिल्ह्यातील प्रसिद्ध “गोकर्ण महाबळेश्वरा”कडे पाऊले खेचली जात होती. आचार्य मजल दरमजल करीत “श्रीक्षेत्र गोकर्णमहाबळेश्वर” येथे आले. महाबळेश्वराच्या दर्शनाने त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. आचार्यांचे अष्टसात्विक भाव जागे झाले. ज्या शिवाचे ते स्वत:च अंशावतार होते त्या शंकराचार्यांच्या मनात आत्मरूपाच्या दर्शनाने उत्स्फूर्त प्रार्थना न घडती तरच नवल होते. आचार्य भावविवश होऊन प्रार्थना करू लागले,

**अजं शाश्वतं कारणं कारणानां शिवं केवलं भासकं भासकानाम् |**

**तुरीयं तम:पार माद्यंतहीनं प्रपद्ये परं पावनं द्वैतहीनम् ||**

**नमस्ते नमस्ते विभे विश्वमूर्ते नमस्ते नमस्ते चिदानंदमूर्ते |**

**नमस्ते नमस्ते तपो योगगम्य नमस्ते नमस्ते श्रुतिज्ञानगम्य ||**

शंकराचार्य भगवान् शिवाची ही प्रार्थना करताना इतके तल्लीन झाले होते कीं आजूबाजूला कोणी असल्याचेही त्यांना कळले नाही. आचार्यांच्या कंठातून निघालेली शिवस्तुती ऐकून आश्चर्य चकित झालेली एक व्यक्ती आचार्यांना पाहण्यासाठी गाभाऱ्यात आली. आचार्य शिवस्तुतीतून देहभानावर आल्यावर त्या व्यक्तीने आचार्यांना वंदन केले. आचार्य आश्चर्याने उद्गारले, “कोण विष्णुशर्मा!” ती व्यक्ती म्हणाली “हो! विष्णुशर्माच!” दोघांना अत्यंत आनंद झाला.

विष्णुशर्मा वयाने जरी वडील होता तरी तो आचार्यांच्या बरोबर गुरुकुलात शिकत होता. त्याचे व आचार्यांचे शिक्षण बरोबरच संपले होते. विष्णुशर्माही विरक्त होता. त्यालाही संन्यास घ्यायचा होता. आचार्यांचा सन्यास घेण्याचा विचार ऐकून त्याला अत्यानंद झाला. आचार्य गुरुगोविंदयतींच्या शोधार्थ निघाल्याचे समजल्यावर तर विष्णुशर्म्यास आकाश ठेंगणे वाटू लागले. कारण तो सुद्धा गुरुगोविंदयतींच्या शोधार्थच बाहेर पडला होता. विष्णुशर्म्याने गुरुगोविंद यांच्या बद्दल खूपच माहिती गोळा केली होती. पण त्यांचा सध्याचा ठावठिकाणा त्याला ज्ञात नव्हता. दोघांनी गोकर्णमहाबळेश्वराची प्रार्थना केली. दोघांनाही मनोमन खात्री वाटू लागली कीं आपल्याला इथे गोकर्णातच गुरुगोविंदयतिंचा ठावठिकाणा मिळेल. दोघेही आत्मचिंतनात मग्न असत अचानक एक दिवस एका संन्याशाकडून गुरुगोविंद नर्मदानदीच्या तीरावर ओंकारमांधाता येथे आश्रम स्थापून राहात असल्याचे कळले. पल्ला खूप लांबचा होता. पण आतां एकाला दुसऱ्याचा आधार होता. तत्त्वचिंतनाच्या संवादात मार्गक्रमणा सुसह्य होणार होती.

आचार्य आणि विष्णुशर्मा त्वरेने नर्मदातीरावरल्या ॐकारमांधात्याच्या रोखाने निघाले. विष्णुशर्मा आचार्यांच्या सहवासात खूपच फुलाला. आचार्यांशी किती बोलू अन् किती ऐकू असे त्याला झाले. दऱ्या-खोऱ्या ओलांडताना दोघेही गुरुगोविंदयतींच्या स्मरणात गप्पा मारत होते. गुरुगोविंदयतींच्या गुरुपरंपरेच्या तपशिलात दोघे रममाण झाले. विष्णुशर्मा काहीशा आश्चर्याने म्हणाला, “गुरुगोविंद हे गौडपादाचार्यांचे शिष्य. गौडपादाचार्य पाणिनींच्या व्याकरणावर महाभाष्य लिहिणाऱ्या पतंजली यांचे शिष्य. पतंजली तामिळनाडू मधल्या चिदंबर मंदिरा जवळच्या आपल्या आश्रमात एकहजार शिष्यांना एकाच वेळी शिकवीत असत. पतंजली हे शेषाचे अवतार मानले जातात. त्यांनी आपल्या शिष्यांना दोन अटी घातल्या होत्या. एक अट म्हणजे आपण सर्व शिष्याना एका पडद्या आडून शिकविणार. कोणीही पडद्याच्या आत यावयाचे नाही. दुसरी अट म्हणजे शिकवणे चालू असताना अध्ययन सोडून अन्यत्र जावयाचे नाही. पण एक दिवस गौडपादाचार्य काही आकस्मिक कारणाने अध्ययन सोडून अन्यत्र गेले व नेमके त्याचवेळी एका शिष्याने आपले गुरु पडद्या आडून प्रत्येकावर कसे लक्ष ठेवतात हे पाहण्यासाठी पडदा बाजूस सारला. तत्क्षणी घात झाला. पतंजली आपले मूळशेषरूप धारण करून सहस्त्रमुखांनी शिकवीत होते. त्यांच्या मुखातून निघणाऱ्या विषाग्निने पडदा बाजूला होताच सर्व शिष्य क्षणात भस्म झाले. पतंजलींनी तत्क्षणी मनुष्यदेह धारण केला पण तोवर सर्व संपलेले होते. शिष्यांच्या संहाराचे त्यांना अत्यंत वाईट वाटले. गौडपादाचार्य वाचल्याचे पाहून समाधान वाटले खरे पण त्यांनी दुसरी अट मोडल्याचे पाप गौडपादचार्यांना लागले. त्यामुळे आपल्या शिष्याला निष्पाप करण्यासाठी पतंजली म्हणाले, “मिळवलेले ज्ञान जेंव्हा तूं एखाद्या उत्तम शिष्याला प्रदान करशील तेंव्हाच तूं निष्पाप होशील. ” त्यामुळें अस्वस्थ झालेले गौडपादाचार्य भटकत भटकत उज्जैनिला क्षिप्रा नदीच्या कांठी

एका प्रचंड वटवृक्षा खाली येऊन राहिले. येणाऱ्या जाणाऱ्याला ते व्याकरणातील खोंच असलेले प्रश्न विचारीत. त्याला त्या प्रश्नाचे उत्तर देता आले नाही म्हणजे अधिकच अस्वस्थ होत. तो जर अधिक काही बोलू लागला तर त्याला मारहाण करीत. त्यामुळे लोक त्यांना ब्रह्मराक्षस म्हणू लागले.

एकदां चंद्रशर्मा नावाचा विद्वान ब्राह्मण व्याकरण शिकण्यासाठी दक्षिणेतल्या चिदंबरला जाण्यास निघाला होता. चंद्रशर्मा अत्यंत तेजस्वी होता. त्याला पतंजली व्याकरण महाभाष्य शिकवितो हे समजल्यामुळे तो तिकडे जाण्यास निघाला होता. क्षिप्रेच्या कांठी असलेल्या ह्या प्रचंड वटवृक्षाखाली तो जरा विसावला. इतक्यात गौडपादाचार्यांची व त्याची दृष्टीभेट झाली. गौडपादाचार्यांनी त्याचा हेतू जाणून घेतला. हा जर व्याकरण महाभाष्य शिकायला जात आहे तर ह्यालाच प्रश्न विचारावेत म्हणून चंद्रशर्म्याला गौडपादाचार्यांनी भराभर प्रश्न विचारायला सुरुवात केली. चंद्रशर्मा बिनचूक उत्तरे देऊ लागला. मग आचार्यांनी त्याला भुज्, रंज् इत्यादींचे भूतकाळ वाचक धातुसाधित विचारले. चंद्रशर्म्याने भुक्त, रक्त, असे उत्तर देताच आचार्यांनी 'पच्' धातूचे भूतकालवाचक धातुसाधित विचारले, चंद्रशर्म्याने क्षणात 'पक्व' असे उत्तर दिले. आतापर्यंत हे उत्तर कोणीच दिलेले नव्हते. सर्वांनी 'भुक्त', 'रक्त', 'पक्त' अशी उत्तरे दिलेली होती. त्यामुळे गौडपादाचार्य सुखावले. चंद्रशर्म्याला म्हणाले, "चिदंबरला आता कोणीही नाही. तुला जे व्याकरण महाभाष्य शिकावयाचे आहे ते मीच शिकवितो. " चंद्रशर्म्याला आनंद झाला. पण गौडपादाचार्यांनी त्याला क्षणाचीही उसंत दिली नाही. प्रवासामुळे थकलेल्या चंद्रशर्म्याने गौडपादाचार्यांचा अधिकार पाहून जवळच पडलेल्या वृक्षाच्या पानांवर नखाने ते भाष्य लिहून घ्यायला सुरुवात केली. "

विष्णुशर्मा हकीकत सांगण्यात रंगून गेला होता. शंकराचार्य तन्मयतेने ऐकत होते. ते पाहून विष्णूशर्म्यास चांगलाच हुरूप आला. तो पुढें सांगू लागला, “ चंद्रशर्मा सतत ऐकत होता व पानांवर कोरून लिहित होता. सतत चौदा दिवस अविश्रांत हा क्रम चालू होता. चौदा दिवसांनी महाभाष्य पूर्ण झाले. आपल्या गुरुंच्या आज्ञेनुसार आपण चंद्रशर्म्यासारख्या उत्तम शिष्याला हे ज्ञान दिल्याची आंतरिक जाणीव गौडपादाचार्यांना झाली. ते निष्पाप झाले. चंद्रशर्म्याने लिहून घेतलेली महाभाष्याची सर्व पाने एका वस्त्रात बांधून ठेवली. चंद्रशर्म्याला प्रवासाचा शीण होताच. त्यातून अचानक झालेल्या महाभाष्याचा शीण. ना अन्न ना पाणी. ना तहान ना भूक. अहोरात्र अध्ययनाचे परिश्रम. अध्ययन चालू असे पर्यंत सर्व शरीरधर्मांचा विसर पडून ते महाभाष्य श्रवण करीत होते व झपाटल्या सारखे नखाने कोरून लिहून घेत होते. त्यामुळे सगळी पाने एका वस्त्रांत बाधून ठेवल्यावर त्यांना ग्लानी आली.

गौडपादाचार्य निष्पाप झाल्यावर क्षणभरही न थांबता बद्रिकाश्रमात जाण्यासाठी निघाले. चंद्रशर्म्यांना ग्लानीने घेरल्यामुळे ते गाढ झोपी गेले. गौडपादाचार्य निघून गेल्यावर जवळपास चरणाऱ्या एका शेळीने महाभाष्याची पाने असलेल्या गाठोड्यात तोंड खुपसून मिळतील तेवठी पाने घेऊन पळून गेली. चंद्रशर्म्याला आलेली झोप ही झोप नव्हतीच. चक्क चौदा दिवसांच्या अथक परिश्रमामुळे व अन्नपाणी न मिळाल्यानें अशक्तपणामुळे आलेली बेशुद्धी होती.

कर्मधर्मसंयोगाने दुसऱ्याच दिवशी उजैनी मधल्या एका धनाढ्य व्यापाऱ्याची कन्या आपल्या सखींसह क्षिप्रेच्या कांठी विहारासाठी आली. तिनें व तिच्या मैत्रिणींनी देखण्या व तेजस्वी चंदशर्म्यास पाहिले. चंदशर्म्याच्या निद्रे बद्दल त्यांना शंका आली. त्या वैश्य कन्येने त्याला जागे करण्याचा खूप प्रयत्न केला. तो असफल झाला. तिला चंद्रशर्म्याची दया आली. तिने चंद्रशर्म्यास त्याच्या

गाठोड्यासह आपल्या निवासस्थानी आणले. दोनचार दिवस होऊनही चंद्रशर्मा झोपेतून बाहेर येत नाही असे पाहून तिने आपल्या पित्याच्या सल्ल्यावरून वैद्याला पाचारण केले. वैद्याने निदान केले कीं कमालीच्या अशक्तपणामुळे हा तरुण ग्लानीत गेलेला आहे. त्यामुळे दहीभात कालवून ह्याच्या शरीरास बाह्योपचाराने चोळावा. त्यामुळे थोडा अन्नरस ह्याच्या शरीरास प्राप्त झाला कीं हा झोपेतून जागा होईल. त्या कन्येने व तिच्या एका सखीने अविरत परिश्रम करून वैद्याने सांगितलेल्या उपायाने चंद्रशर्म्यास जागे केले. वैश्यकन्या चंद्रशर्म्याच्या तशाही अवस्थेत त्याच्यावर लुब्ध झाली होती. म्हणूनच रात्रंदिवस सेवा करून तिने चंद्रशर्म्यास शुद्धीवर आणले.

चंद्रशर्मा शुद्धीवर आल्यावर त्या श्रीमंत व्यापाऱ्याला व त्याच्या सुंदर कन्येला पाहून चकित झाला. प्रथम त्याने महाभाष्याच्या पानांच्या गाठोड्याची चौकशी केली. वैश्यकन्येने ते गाठोडे दाखवताच चंद्रशर्मा सुखावला. हळूहळू शक्ती आल्यावर चंद्रशर्म्याने प्रथम ते भाष्य नीट जुळवून पुनश्च वाचून काढले. त्यातील काही भाग नष्ट झाल्याचे त्याच्या लक्षात आले. चंद्रशर्म्यास अत्यंत वाईट वाटले. पण आता काहीच इलाज नव्हता. चंद्रशर्म्याचे व्यक्तिमत्व अत्यंत आकर्षक होते. चंद्रशर्मा काश्मिरी पंडित होता. चेहऱ्यावर पांडित्याचे तेज, उंचापुरा, भरदार छाती, लांबसडक हात, गोरापान, वागणे बोलणे खानदानी त्यामुळें उज्जैनीच्या लोकांना तो आदरणीय वाटू लागला. वैराग्यशील वृत्ती, आर्जवी स्वभाव, मंजुळपण निःसंदिग्ध भाषण ह्यामुळे तो सर्वांचा आवडता झाला. त्याची योग्यता पाहून व आपल्या कन्येचे त्याच्यावर जडलेले मन पाहून त्या व्यापाऱ्याने चंद्रशर्म्यास आपली कन्या देण्याचा प्रस्ताव मांडला. चंद्रशर्म्याचे मन व्याकरणावर जडले होते. त्यामुळे त्याने ह्या विवाहाला ठाम विरोध केला. त्या व्यापाऱ्याने चंद्रशर्म्याला खूप

प्रकारे समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. व्यापारी म्हणाला, “माझ्या मुलीचे मन तुझ्यावर जडले आहे. तिने अहोरात्र कष्ट करून तुला जीवदान दिले आहे. तिची सगळी सेवा विचारात घे. तिच्याशी विवाह कर. जर तूं तिच्याशी विवाह केला नाहीस तर तो एक अपराधाच होईल. तूं जर तसा अपराध करणार असलास तर मला राजाकडे फिर्याद करावी लागेल. मग त्याच्या न्यायसभेतला निर्णय तुला मान्य करावा लागेल. ” चंद्रशर्म्याने अत्यंत विनयाने आपला अभ्यासाचा हेतू सांगितला. विवाहबंधनात आपल्याला अडकवू नये म्हणून खूप विनंती केली. पण त्या व्यापाऱ्याच्या व त्याच्या कन्येच्या मनास हे पटेना. शेवटी वैतागून चंद्रशर्म्याने न्यायसभेत जे होईल ते मान्य करायचे ठरवले. कारण न्यायसभेत आपल्याला आपली बाजू युक्तिवादाने व प्रामाणिक प्रयत्नाने पटवून देण्याचा प्रयत्न तरी करता येईल. अत्यंत दुःखाने व्यापारी व चंद्रशर्मा राजाच्या न्यायसभेसमोर आले. चंद्रशर्म्याने राजा समोर आपली बाजू अत्यंत प्रभावी भाषेत व मुद्देसूद युक्तिवादाने मांडली. चंद्रशर्म्याची बुद्धिमत्ता, वाक्चातुर्य, व्यक्तिमत्व, विद्वत्ता हे सगळे पाहून राजाच त्याच्यावर खुश झाला. आपली राजकन्याच त्याला कशी योग्य आहे ह्याचा विचार करून राजाने तसा प्रस्ताव चंद्रशर्म्या समोर मांडला. चंद्रशर्मा आणि तो व्यापारी दोघेही चक्रावून गेले. कारण राजाने व्यापाऱ्याची बाजू ऐकून न घेताच हा प्रस्ताव मांडला. इतकेच नाही तर आपल्या मंत्र्याला बोलावून हा विवाह नक्की करण्यास सांगितले. मंत्र्याने चंद्रशर्म्यास पाहीले व आपलीही मुलगी चंद्रशर्म्यास देण्याचा संकल्प चंद्रशर्म्यास सांगितला.

त्यामुळे जी गोष्ट चंद्रशर्मा टाळीत होता ती त्याच्या समोर तिपटीने उभी राहिली. हे सर्व समजल्यावर वैश्यकन्येची सखी जी सतत सेवा करीत होती. तिनेही आपण मनाने चंद्रशर्म्यास वरले असल्याचे सांगून आपलाही विवाह त्यांच्या

बरोबर व्हावा अशी मागणी केली. ह्या सर्व प्रकाराने चंद्रशर्मा क्षणांत भानावर आला. त्याने चारही जणींशी विवाह करण्याचे एका अटीवर मान्य केले. ती अट अशी कीं प्रत्येकीला एक एक पुत्र झाला कीं मी विवाह बंधनातून मुक्त होऊन निघून जाईन. पुढें प्रत्येकीला एक याप्रमाणे पुत्र होताच चंद्रशर्मा गुरूंच्या शोधार्थ घराबाहेर पडला.

आपले गुरु गौडपादाचार्य ह्यांचा शोध घेत घेत चंद्रशर्मा हिमालयांत त्यांच्या पर्यंत पोहोचले. आता गौडपादांनी संन्यास दीक्षा घेतल्यामुळे ते गौडपादचार्य झाले होते. व्याकरणा ऐवजी वेदांताचे अध्ययन करीत ते आत्मचिंतनात मग्न झाले होते. ते बद्रिकाश्रमांतच राहात होते. चंद्रशर्म्यांना पाहून त्यांना आनंदच झाला. ह्या सत्शिष्या विषयी कृपा उत्पन्न झाली. चंद्रशर्म्याचे ज्ञान व वैराग्य त्यांनी पूर्वीचा अनुभवले होते. चंद्रशर्म्याने संन्यास ग्रहण करण्याची इच्छा प्रकट करताच त्यांनी समाधान व्यक्त केले. एका शुभमुहूर्तावर गौडपादाचार्यांनी चंद्रशर्म्यांना संन्यास दीक्षा दिली. चंद्रशर्मा आतां गोविंदभगवत्पाद ह्या नावाने ओळखले जाऊ लागले.

इतके सांगून विष्णुशर्मा थांबले. शंकराचार्य उत्सुकतेने ऐकत होते. त्यांना विष्णुशर्मांचे खूपच कौतुक वाटले. ते विष्णुशर्म्यास म्हणले, “वा:! खूपच विलोभनीय व आश्चर्यकारक चरित्र आहे आपल्या सद्गुरूंचे. खूप मेहनत घेऊन आपण ही सर्व माहिती मिळवलेली आहे यात शंकाच नाही. भगवंताची लीला अगाध आहे. काळाच्या उदरात काय दडले आहे हे त्या एका भगवंताखेरीज कोण जाणणार? आपण त्याचेच सेवक आहोत. ” आचार्य आपल्याला अत्यंत आदराने वागवत आहेत व बंधुभावाने बोलत आहेत हे पाहून विष्णुशर्मा सुखावला. त्याला धन्यता वाटली. कारण आचार्य म्हणजे कोणी सामान्य व्यक्ती नाही हे तो मनोमन जाणून होता.

खडतर प्रवास सुखावह होत होता. कधी कधी निबिड अरण्यातून तर कधी रमणीय अशा सरोवरां जवळून तर कधी रम्य नदीकाठा वरून ते मार्ग आक्रमत होते. ॐकारमांधाताची ओढ लागली होती. सद्गुरुंच्या भेटीची उत्सुकता होती. विष्णुशर्मा सांगता सांगता थांबले. थोड्या संकोचाने पण अत्यंत विनयाने आचार्यांना म्हणाले, “आचार्य, मला ज्या ठिकाणाहून जसे समजले तसे मी सांगितले खरे. पण गुरु गोविंदभगवत्पादांचे गुरु गौडपादाचार्य आणि गौडपादाचार्यांचे  मोक्षगुरु साक्षात् शुक मुनी आहेत असे समजले आहे. त्याबद्दल मला किंचितही संदेह नाही. पण कालभेद पहाता मला विचार करूनही ही कालसंगती लावता येत नाही. कारण शुकमुनींचा काल राजा परीक्षितीच्या वेळचा. म्हणजे जवळजवळ २५०० वर्षांपूर्वीचा. त्यातून राजा परिक्षितीला भागवताचा उपदेश करून शुकमुनींनी आपले जीवन कार्य संपवले असे भागवतात दिले आहे. वेदांतही शुकवामदेव मुक्त झाल्याचा उल्लेख आहेच. म्हणून आपण जर ह्यावर काही मार्गदर्शन कराल तर माझ्या मनाला अधिक स्थिरता प्राप्त होईल. ”

आचार्यांना विष्णुशर्म्याच्या ह्या विचारपद्धतीचे खूपच कौतुक वाटले. सारासार विवेक व विनय, दृढश्रद्धा व जिज्ञासा यांच्या उत्कृष्ट मिलाफातून उत्पन्न झालेल्या ह्या प्रश्नाचे उत्तर देण्याचे आचार्यांनी ठरवले. आचार्य म्हणाले, “ विष्णुशर्मा, आपण खूपच छान प्रश्न विचारला आहे. याचे उत्तर शुकमुनींनी राजा परीक्षितीला आधीच दिलेले आहे. शुकमुनी म्हणतात,

तद् विश्वनाभिंत्वतिवर्त्यविष्णोरणीयसा विरजेनात्मनैक: |

नमस्कृतं ब्रह्मविदामुपैति कल्पायुषो यद् विबुधा रमन्ते ||२. २. २५||

अथो अनंतस्य मुखानलेन दंदह्यमानं स निरीक्ष्यविश्वम् |

निर्याती सिद्धेश्वरजुष्टधिष्ण्यं यद् द्वैपरार्ध्यं तदु पारमेष्ठ्यम् ||२. २. २६||

न यत्र शोको न जरा न मृत्युर्नातीर्नचोद्वेग ऋते कुतश्चित् |

यच्चित्ततोद: कृपयानिदंविदांदुरन्तदुःखप्रभावानुदर्शनात् ||२. २. २७||

अर्थात् योगी लोक सूक्ष्म आणि शुद्ध शरीराने विश्वाधार विष्णुचक्र पार करून सर्ववंद्य अशा महर्लोकांत ब्रह्मवेत्त्यांच्या स्थायी कल्पावधीकाल वास्तव्य करतात. या महर्लोकांत देवांनाही जाता येत नाही. तेथून ते योगी शेषाच्या मुखातील अग्निने दग्ध न होणाऱ्या महर्लोकाच्याही वर असलेल्या ब्रह्मलोकांत जातात. इथेच सर्व योगेश्वरांची स्थाने आहेत. ह्या लोकी कसलेच दुःख नाही, जरा नाही, मृत्यू नाही, म्हणून भय, पिडा, उद्वेग नाही. पण ह्या योग्यांना सदैव दया येते ती भगवद्विरहीत जीवन जगणाऱ्या जीवांची. केवळ त्या दयेपोटीच ते भक्तांच्यासाठी प्रगट होतात. ते कालातीत असल्यामुळे त्यांना केंव्हाही व कोठेही मुक्त संचार करता येतो. म्हणूनच तर गुरुपद अविनाशी म्हणूनच सांगितले आहे. अविनाशी संकल्पना मनाने श्रद्धा ठेवून स्वीकारली कीं जीवाचे जीवपण त्यागण्याचीच सर्वांगीण तयारी होते. गुरु हे तत्त्व आहे. ते अविनाशी आहे. त्याला कालभेदाची बंधनेच नाहीत. सद्गुरू कालातीत असल्यामुळे जेंव्हा जीव स्वत:च्या एकादेशित्वाच्या स्थितीचा त्याग करण्यास सिद्ध होतो तेंव्हा जर तो एकांतात असेल आणि गुरुस्मरण करीत असेल तर हे अविनाशी गुरुतत्त्व तत्क्षणी ह्या योग्यांच्या रूपांत त्याच्या समोर साकार होते. इथे जीवाला एकदेशित्वामुळे सूक्ष्मदर्शनाने समाधान प्राप्त होणारे नसते. कारण त्याची तेवढी तयारी झालेली नसते. शिवाय ज्या विक्षेपशक्तीने अहंकार जागा

असतो तिथे सूक्ष्म दर्शनावर विश्वास बसत नाही. म्हणून सगुण स्वरूपात दर्शन स्पर्शानादी क्रिया जडजीवाला विश्वसनीय वाटतात. त्याची अनुभूती देऊन जीवाचे जडत्व अथवा जीवपण नाहीसे करण्यास गुरुतत्त्व कारण होते. आतां आज आपलेच उदाहरण पहा. ज्यांना आपण पूर्वी कधीच पाहिलेले नाही. ज्यांचा कधी अनुभवही घेतलेला नाही. त्यांच्याकडे कां आकर्षित झालो आहोत? कर्म-धर्म संयोगाने त्यांच्या अधिकाराविषयी, सामर्थ्या विषयी, ईश्वरभक्ती इत्यादी संबंधी जी माहिती मिळाली त्यावर दृढ श्रद्धा ठेवूनच नां? म्हणजे आध्यात्मिक गुरु हे केवळ श्रद्धेनेच प्राप्त होतात. ब्रह्मस्वरूप झालेल्यांना गुप्त प्रकट होण्याला क्षणही लागत नाही. कारण ते पांचही मितींच्या पलीकडे गेलेले असतात. मग आतां मला सांगा कीं तुमच्या मनातला कालभेदाचा गोंधळ नष्ट झाला आहे कीं नाही?" हे सर्व विवरण ऐकून विष्णुशर्मा अत्यंत भारावला गेला. त्याचा सारा संदेह नाहीसा झाला. भारावलेल्या अवस्थेतच तो आचार्यांना म्हणाला, " इतका सूक्ष्म विचार मी कधी केलाच नव्हता आपल्या ह्या विवरणामुळे मला विचारांची एक नवी दिशा प्राप्त झाली आहे. "

आचार्य व विष्णुशर्मा अशा तत्त्वचिंतनात ॐकार मांधाताला कधी पोहोचले ते त्यांना समजलेच नाही. नर्मदा नदीच्या किनाऱ्यावर दोघे सुखावले. सद्गुरू भेटीची ओढ होतीच. प्रातःकाल होईपर्यंत दोघेही एका वृक्षाखाली विश्रांतीसाठी थांबले.

प्रकरण ४ थे

# सद्गुरूप्राप्ती व विवेकचूडामणिची निर्मिती

प्रात:काल झाल्यावर दोघांनीही प्रात:स्नान केले. सद्गुरु गोविंदयती ज्या गुहेत रहात होते तिकडे निघाले. पाऊले आतुरतेने चालत होती. मन भक्तिभावाने ओथंबून गेले होते. नेत्र दर्शनोत्सुक झाले होते. हात वंदनासाठी शिवशिवत होते. बुद्धी योगधारणेसाठी अधीर झाली होती. अंत:करण निर्विकल्प होण्यासाठी आसुसले होते. चित्त चांचल्याचा त्याग करण्यास सिद्ध झाले होते. अहंकार आत्मार्पण करून शिष्यत्व मिळवण्यासाठी तत्पर झाला होता. श्रवणेंद्रिये उपदेश श्रवणासाठी कानात प्राण आणून उत्साहाने तयार झाले होते. हृदय चौफाळले होते ती गुरु पाउले धारण करण्यासाठीच.

अशा भावावस्थेत बालशंकर गुरुंच्या गुहेत नातमस्तक होऊन आले. आचार्यांनी अश्रुपूर्ण नेत्रांनी सद्गुरूंना साष्टांग नमस्कार केला. आचार्यांचे अष्टसात्विक भाव जागे झाले. नेत्रातून अश्रूधारा वाहात होत्या. कंठ सद्गद झाला होता. कांती विवर्ण झाली होती. शरीराला कंप सुटला होता. कपाळावर घर्मबिंदूंची दाटी झाली होती. अंगावर रोमांच उठले होते. बोलणे खुंटले होते. शरीर दंडवत् झाले होते. काही क्षण अशा भावविभोर अवस्थेत गेले. गुरूंना आंतरिक भावना समजल्या. विष्णुशर्मा अनिमिष नेत्रांनी देहभान हरपून आचार्यांचे हे वंदन पाहात होता. क्षणभराने भानावर येऊन त्यानेही वंदन केले. आचार्य उभे राहून सद्गुरूंना प्रदक्षिणा घालू लागले. तीन प्रदक्षिणा होताच गुरुगोविंद यतींनी कौतुकाने ह्या तेजस्वी देखण्या बालकाला अत्यंत मृदू , गोड व प्रेमळ वाणीने विचारले, “बाळा! कोण तूं?” आणि आचार्य उत्स्फूर्त उद्गारले,

**“मनोबुद्ध्यहङ्कार चित्तानि नाहं न च श्रोत्रजिह्वे न च घ्राणनेत्रे।**
**न च व्योम भूमिर्न तेजो न वायुः चिदानन्दरूपः शिवोऽहम् शिवोऽहम्॥”**

मी मन, बुद्धी, अहंकार, चित्त, नाही, मी कान, जीभ, नाक, डोळे ही इंद्रिये पण नाही. मी आकाश, भूमी, तेज, वायू इत्यादी पंचमहाभूते पण नाही. तर मी चिदानंदरुपी शिवच आहे. असे अत्यंत भावपूर्ण काव्यमय उत्तर देऊन साश्रूनयनांनी हात जोडून आपल्या गुरुंसमोर उभे राहिले. आपल्या दर्शनाने ह्याच्या चित्तवृत्ती चांगल्याच उचंबळून आल्याचे जाणून गुरुगोविंद प्रसन्नतेने हसत हसत म्हणाले, “म्हणजे तू एक केवळ परब्रह्म आहेस काय?” ह्यावर आचार्य अत्यंत नम्र व मंजुळ वाणीने म्हणाले,

**“न चैकं तदन्यद् द्वितीयं कुत:स्यात् न वा केवलत्वं न चाकेवलत्वम्।**

**न शून्यं न चाशून्यामद्वैतकत्वम् कथं सर्ववेदांतसिद्धं ब्रवीमि ॥”**

परब्रह्म एक सुद्धां नाही मग दुसरे कसले असणार? ते केवळही नाही वा त्या विरुद्धही नाही. ते शून्य तर नाहीच नाही पण अशून्यही नाही. असे जे अद्वैतस्वरूप आहे ते मी वाणीने कसें बरें सांगावे? तेच तर मला आपल्याकडून जाणून घ्यायचे आहे. हे उत्तर ऐकून गोविंदयती भावविवश झाले. ह्या उत्तरात आचार्यांनी परब्रह्माविषयी असलेली आपली धारणा सद्गुरूंकडे प्रभावी पद्धतीने व्यक्त केली होती.

गुरुगोविंदयती मनाशी विचार करू लागले. वा:! काय ही प्रज्ञा! आणि ती ही इतक्या लहान वयात! अशा विचारात ते असतानाच त्यांना बद्रिकाश्रमांत झालेल्या व्यासमुनींच्या दृष्टांताचे स्मरण झाले. व्यासमुनिंनी दृष्टांतात सांगितले होते, “पृथ्वीवरील भगवान् शिवाचा अवतार तुझ्याकडे शिष्य म्हणून येईल. त्याच्यासाठी

तूं नर्मदातीरावर ॐकार मांधाताला जाऊन वास्तव्य कर आणि तो येण्याची वाट पहा. हा तुझा शिष्य मी लिहिलेल्या ब्रह्मसूत्रावर अपूर्व भाष्य करील. " ह्या दृष्टांताचे स्मरण होऊन व शिवोऽहम् ह्या उत्तराचे वर्म जाणून गुरुगोविंदयती गुहेच्या गाभाऱ्यातल्या आपल्या आसनावरून उठले. थोडे पुढे आले. त्यांनी बालशंकराला अत्यंत प्रेमभराने आलिंगन दिले. असामान्य गुरु-शिष्यांची हृद्यस्पर्शी भेट झाली. विष्णुशर्मा ती अनिमिष नेत्रांनी पाहात होता. त्याने मनोमन दोघांनाही वंदन केले.

आचार्य आणि विष्णुशर्मा यांचे वास्तव्य आतां नर्मदातीरावरील गुरुगोविंद यतींच्या आश्रमात सुरु झाले. आल्या दिवसापासूनच आचार्यांनी गुरुंच्या आज्ञेने षड्दर्शनांचा अभ्यास सुरु केला. विविध प्रकारे सखोल अभ्यास व्हायला त्यांना फक्त तीनच महिने लागले. गुरुगोविंदयती आचार्यांच्या ह्या अभ्यासावर इतके प्रसन्न झाले कीं त्यांनी आचार्यांना संन्यासदीक्षा देण्याचे ठरवले. एकदां गुरूंच्या मनांत आल्यावर मग वेळ कशाला लागणार. त्यांनी बालशंकराला आपला मनोदय सांगितला. विधीपूर्वक संन्यास दिला. तो दिवस सर्व जगाच्या दृष्टीने अविस्मरणीय ठरला. फाल्गुन वद्य द्वितीया युधिष्ठिर शक २६४० म्हणजेच इसविसनपूर्व ४९९ हा दिवस सोनेरी पहाट घेऊन आला. तो या बालसूर्याला माध्यान्हीच्या तेजाने तळपवण्यासाठीच. त्या दिवशी गुरुगोविंदयतींनी आपल्या ह्या बालबृहस्पती शिष्याला **"शंकराचार्य" म्हणून उद्घोषित केले.** त्यावेळी गुरुगोविंदयतींनी चतुर्विध महावाक्यांच्या बोधाने "शंकराचार्यांना" परिपूर्ण केले. ज्याने पहिल्या भेटीत शिवोऽहम् चा घोष करून "कथं सर्व वेदान्त सिद्धं ब्रवीमि" असा प्रश्न केला त्याचे समर्पक उत्तर क्रमश:च "अहंब्रह्मास्मि", "तत्त्वमसि", "प्रज्ञानंब्रह्म" व "अयं आत्मा ब्रह्म" असे दिले. आचार्य ध्यानमग्न झाले. सद्गुरूकृपेत न्हाहून निघाले.

आतां खऱ्या अर्थाने सद्गुरूंचा सहवास सुरु झाला. सद्गुरूंच्या प्रेरणेने त्याचे आतां षड्दर्शनावर सखोल चिंतन सुरु झाले. चिंतन चालू असताना अखंड सद्गुरुसेवा शंकराचार्य करीत असत. ह्या काळात त्यांनी अनेक स्तोत्रांची रचना केली. नर्मदेचे स्नान करताना नर्मदेचे सौंदर्य त्यांना ब्रह्मानंद प्राप्त करून देत असे. त्यामुळे अत्यंत भक्तिभावाने ते नर्मदेला वंदन करीत असत. अत्यंत उत्कृष्ट स्तोत्र रचनेचे वरदान लाभलेला हा तपस्वी एक दिवस आपलीही स्तुती नक्कीच करील. असे नर्मदादेवीला वाटले. कारण आज पर्यंत आचार्यांनी प्रात:स्मरण व साधनपंचक ही स्तोत्रे रचली. त्या पाठोपाठ त्यांनी यतिपंचक स्तोत्र रचले. त्यांत संन्यास ग्रहण केलेल्यांना मार्गदर्शक तत्त्वांचा समावेश आहे. ह्या नंतर आचार्यांनी गुरूगृही, अत्यंत श्रेष्ठ अशा विवेकचुडामणि ह्या ग्रंथाच्या निर्मितीला आरंभ केला. सद्गुरूंनी ज्या महावाक्यांचा उपदेश आचार्यांना केला, त्याचा अनुभव ते सद्गुरुंच्या सहवासात घेतच होते. शब्दांच्या पलीकडे असलेला हा अनुभव त्यांना विवेकाने शब्दबद्ध करावयाचा होता. कठीण तत्त्वज्ञान सामान्यांपर्यंत नेऊन पोहोचवण्याचे विलक्षण कार्य त्यांना करावयाचे होते. अद्वितीय बुद्धिमत्ता, भाषेवरील प्रभुत्व, कनवाळू  वृत्ती असे असामान्य गुण त्यांच्या अंगी असल्याचे त्यांच्या गुरूंनी हेरले होते. इतके असूनही श्रीगुरुचरणी समर्पित भावानेच ते सद्गुरुंची अविरत सेवा करीत होते. मग सद्गुरूंनी आंतरिक प्रेरणा देताच आचार्यांनी ग्रंथारम्भ केला.

“सर्ववेदांतसिद्धांतगोचरं तमगोचरम् |

गोविंदपरमानंदं सद्गुरूं प्रणतोऽस्म्यहम् ||

केवळ वेदांतातील सिद्धान्ताच्याच सहाय्याने ज्यांना जाणता येते अन्यथा नाही त्या परमानंद स्वरूपी सद्गुरू गोविंदांना मी विनम्रतेने वंदन करतो.

आचार्य सद्गुरुमय झाले. अंत:करणांतच सद्गुरूंशी संवाद करू लागले. प्रभावी भाषावैभव, अपूर्व शब्दरचना व परिपूर्ण पण सोपे करून सांगितलेले तत्त्वज्ञान अशा विक्रमी वैभवाने नटलेला 'विवेकचूडामणि' नामक ग्रंथ साकार झाला. सद्गुरू वंदनाने सुरुवात करून पहिल्या ४७ श्लोकांत सर्वसामान्यांना सहजतेने आत्मचिंतनाने शिष्यप्रज्ञा कशी जागृत करावी ह्याचे प्रभावी दर्शन घडवले. अत्यंत दुर्लभ असलेल्या नरदेह प्राप्तीचा उपयोग आत्मानात्म विवेक न करता जर व्यर्थ घालवला तर येणारा मृत्यू म्हणजे एक प्रकारे आत्मघातच आहे. बहिर्मुखतेने इंद्रियादिकांच्या सौख्याच्या कल्पनांचा त्याग कसा व कोणत्या विचारांच्या माध्यमातून करतां येतो हे सांगून आचार्य शिष्यप्रज्ञा जागी करतात. मग सहजतेने सांगतात,

"मंदमध्यमरुपापि वैराग्येण शमादिना |

प्रसादेन गुरो: सेयं प्रवृद्धा सूयते फलम् ||"

आणि मग सद्गुरूंची महती समजल्यामुळे पुढे शिष्य सद्गुरूंना प्रश्न विचारतो, "हे प्रभो! बंध कुठला? कशामुळे? कां प्राप्त झाला? व कां राहतो? त्या पासून कसें मुक्त होता येईल? आनात्म व आत्म तत्त्वाचा विवेक कसा असतो? हे सर्व आपल्या परमपवित्र वाणीने आपणच मला समाजावून सांगा. मला काही कळत नाही. " मग आचार्य अंतरंगातला सद्गुरू उपदेश सहजतेने प्रकट करतात.

सद्गुरू म्हणतात, "तुला आत्मानात्मविवेक जाणून घेण्याची इच्छा होऊन ब्रह्मभावात येण्याची इच्छा झाली त्यामुळें तूं धन्य झालास. तुझ्या प्रश्नाचे उत्तर ऐक. अरे बंध कोणता तर तो अविद्येचा. कशामुळे तर नेणीवे मुळे. कां तर तृष्णा व वासनांमुळे. त्यापासून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे आत्मज्ञान प्राप्ती. त्या ज्ञान प्राप्तीसाठीच आत्मानात्मविवेक  करावा. कसा तर तूं विचार कर कीं तुला सुख-

दुःखाची बाधा कशामुळे होते? तर इंद्रियांच्या आधीन होण्यामुळे. इंद्रिये म्हणजे विषयारण्यांत संचार करणारे पशू. त्वगेंद्रियांना स्पर्शसुखाची लालसा, चक्षुरिंद्रियांना स्वरुपाची लालसा, श्रवणेंद्रियांना सुश्रवणाची लालसा, घ्राणेन्द्रियांना सुगंधाची लालसा, अशा विविध लालसा पंचज्ञानेंद्रिये व पंचकर्मेंद्रिये यांच्या आधीनतेमुळे बंध उत्पन्न झालेले आहेत. ह्या लालसा कधीच तृप्त होणाऱ्या नसतात. शिवाय त्या क्षणिक असतात. नष्ट होतात व पुन्हां उत्पन्न होतात. म्हणून त्या सर्व अनात्म. आत्मतत्त्व कधीच नाश पावत नाही वा नवीन उत्पन्न होत नाही. ते जसेच्या तसे असते. म्हणून ते स्वदेहाच्या विचारांनी येते. त्रिविध तापांनी सदैव ग्रासलेल्या ह्या देहाची रचना विचारांत घ्यावी. सप्तधातू व सप्तआवरणे ह्यांनी भूषवलेले हे शरीर म्हणजे झांकलेले चर्मकुंडच आहे. दिव्यान्न सेवनाची पोटात विष्ठा तयार होते. गंगाजल प्राशनाची लघुशंका तयार होते. आधिभौतिक तापांत भर घालणारा आध्यात्मिक ताप असतोच आणि हे सर्व ताप भोगले जातात ते मनाच्या माध्यमातून म्हणून,

“मनो नाम महाव्याघ्रो विषयारण्य भूमिषु |

चरत्यत्र न गच्छन्तु साधवो ये मुमुक्षव: ||१७६||”

मन नामक महाव्याघ्र विषयारण्यात दबा धरूनच बसलेला असतो. त्यामुळे मुमुक्षूंनी विषयसेवनाच्या बाबतीत कटाक्षाने औदासिन्य बाळगावे. निरंतर ईशचिंतनातून मनाची विषयाकडे असलेली धांव थांबवावी. मनाला सतत उपदेश करून सांगत रहावे कीं आत्मसुखाच्या गोडी इतके सौख्य कशातही असू शकत नाही. मन हे वायुरुपाने सर्व शरीरात रजोगुणाच्या स्कंधावर बसून इंद्रियांच्या मध्यावर बुद्धीने निर्णय देण्याची वाट पहात बसलेले असते. म्हणून बुद्धीच ईश्वरार्पण करावी. मग ती स्थिर होते. हळूहळू हा बुद्धियोग कार्यान्वित होऊ लागतो. मन व

बुद्धी स्थिरता प्राप्त करून घेतलेल्यांना आपोआपच सृष्टी व दृश्यजात विश्व, सर्व पदार्थ व स्वदेह ह्यांच्या विनाशत्वाचा बोध होतो. त्यामुळेच मिथ्यत्व म्हणजे काय हे जाणता येते. ”

हे ऐकून शिष्य विचारतो, “ हे सद्गुरो आपण जीवाच्या म्हणजे स्वत:च्या नश्वरतेचा विचार करायला सांगता. पण जीव  व आत्मतत्त्व अविभाज्य असल्याचेही प्रतिपादन करता. आत्मतत्त्व उत्पन्नही होत नाही व नाशही पावत नाही असेही म्हणता. जीवाला मात्र संसृती आहे असेही म्हणता. मग मुक्ती ज्याला म्हणतात ती कशी प्राप्त होईल? मला आकलन होत नाही म्हणून कृपया सुलभ करून सांगा अशी मी आपणास नम्र प्रार्थना करतो. ”

सद्गुरू म्हणले, “ सत्शिष्या तूं हा फार चांगला प्रश्न विचारला आहेस. तूं अशी कल्पना कर कीं आत्मतत्त्व म्हणजे शुद्ध जल. त्या जळांत माती, धूळ इत्यादी पडून ते गढूळ होऊन त्याचा रेंदा झाला कीं त्याच पाण्याला आपण चिखल म्हणतो. पण त्यावर गाळणादि संस्कार करून त्याच चिखलातून निर्मल जल वेगळे करता येते. तसेच हे आत्मतत्त्व जरी वेगळे नसले तरी अज्ञानरुपी माती, विषयरूपी धूळ त्यात पडल्यामुळे व वासनांचा संयोग झाल्यामुळे ते जीवदशेला प्राप्त झाले. म्हणून शहाण्याने विचारपूर्वक वागावे. सदाचार पाळावा. ईशस्तवन करावे. अमर्याद विषयभोगाचा त्याग करावा. नाशवंत पदार्थांची कामना त्यागावी. मिळेल त्यांत संतुष्टतेनें नामस्मरण करण्याची संवय जडवून घ्यावी. अशाप्रकारे युक्ती युक्तीने आत्मानात्मविवेक करून देहबुद्धीचा त्याग करावा. ”

त्यावर शिष्य विचारतो, “ हे प्रभो, देहबुद्धीचे लक्षण म्हणजे अंत:करण पंचक व पंचमहाभूते यांचा कर्दम. आता ह्याचा त्याग करायचा तर खाली उरणार काय? परत आपणच बोध करताना “तत्त्वमसि” असेही सांगितले आहे. बरे, परत

त्यागांच्या विचारांची सीमा काय? क्षुधा, तृषा, निद्रा, जागृती इत्यादी देहधर्माचे व्यवहार कितपत त्यागता येतील? प्रभो, हे मज अज्ञानाला नीट समजावून सांगा!”

सद्गुरू म्हणतात, “बा रे शिष्या तुझ्या मार्मिक प्रश्नामुळे माझा बोधसमुद्र उचंबळून आला आहे. ऐक, जसे विविध ठिकाणच्या चिखलांत एकच जल असते पण पदार्थांच्या भिन्नतेमुळे वेगळे वेगळे भासते. तथापि नीट विचार केला तर त्या जळांत जर मातीसारखा पदार्थ नसेल तर त्याला चिखल म्हणता येत नाही. तद्वत ईश्वरांत काहीच नाही पण सर्व पंचमहाभूतांच्या कर्दमास ईश्वर कारण आहे. अथवा विविध मृत्तिकांच्या घटाचा विचार केला तर आकार व नाम भिन्नत्वा खेरीज सर्व घटांमध्ये फक्त मृत्तिकाच असते. तद्वत् यच्चयावत् चराचरांत शब्द, रूप, रस, गंध व स्पर्श यांच्या भिन्न्त्वा खेरीज एक आत्मतत्त्वच सत्-चित्-आनंद आहे. तेच आपल्यात आहे. म्हणून तुला जो “तत्त्वमसि” हा बोध केला त्याचा भावार्थ ध्यानात घ्यायचा. त्यालाच विवेक असे नाव आहे. वाक्यांचे अनेक अर्थ असतात. सरळ अर्थ, ध्वन्यार्थ, भावार्थ, गर्भितार्थ असे अनेक प्रकार आहेत. “अहं ब्रह्मास्मि” काय किंवा “तत्त्वमसि” काय अशी अनेक महावाक्ये सांगितली पण त्यातला भावार्थ जर विवेकाने निश्चित केला नाही तर फसगतच होणार. कारण व्यवहारभेदाने व्यवहार जसा करावाच लागतो तसे अध्यात्म हे विवेकाच्या माध्यमातून तारतम्याने स्वत:च स्वत:चे जाणून घ्यायचे असते. आपले स्वत:चे काहीच नाही हे जरी आध्यात्मिक दृष्ट्या सत्य असले तरी व्यावहारिक दृष्ट्या राजाचा कर चुकवण्यासाठी उपयुक्त न होता तो एक गुन्हाच होणार असतो हे तारतम्य समजलेच पाहिजे. म्हणून.

**यस्मान्नास्ति सत: परं किमपि तत्सत्यं स आत्मा स्वयं**

**तस्मात्तत्त्वमसि प्रशांतममलं ब्रह्माद्वयं यत्परम् ||२५१||**

विचार करून बघ ज्याला तूं तुझा कमंडलू  म्हणतोस, तुझे आसन म्हणतोस, तुझे वसन, तुझी जपमाळ इत्यादी सर्व देहपाता नंतर तुझे राहणार आहे कां? पण तूं देहात असे पर्यंत त्याच्यावर कोणी हक्क सांगणार आहे कां? नाही. कारण त्याला पांच मितींपैकी कालाची मिती आहे. मित् हा मूळ धातू त्यापासूनच मिथ्या हा शब्द तयार झालेला आहे तर मिथ्या म्हणजे ज्याला सर्वच मर्यादा असतात काळाची मर्यादा, आकाराची (आकाराच्या तीन मर्यादा लांबी रुंदी उंची ) मर्यादा, दिशेची मर्यादा अशा पांच मर्यादा असतात. म्हणून ते मिथ्या. म्हणजे काही काल टिकणारे व नंतर त्याचे स्थित्यंतर होणार असते. म्हणून ते मिथ्या. मिथ्या म्हजे खोटे नव्हे. कारण त्यातही सुप्तावस्थेत आत्मतत्त्व असते. तसेच तुझे चैतन्यमयी आत्मतत्त्व तुझ्या बरोबरच असणार आहे. देहपाता नंतरही तुझ्या सूक्ष्मदेहा बरोबरच राहाणार आहे. आपल्या देहपाता नंतर मन, बुद्धी, चित्त, अंत:करण व अहंकार आपल्या बरोबरच येणार असते. यातल्या मनाचा, बुद्धीचा, चित्ताचा, अंत:करणाचा व अहंकाराचा तूं मायेमुळे जरी अंगीकार केला असलास तरी विवेकाने त्यागही करू शकतोस. त्यावेळी तुला हा अनुभव आत्मतत्त्वाने येईल कीं 'तत्त्वमसि'! तसा अनुभव आला कीं मग तूं मुक्त होशील. कारण त्यावेळी तुला समजेल कीं बद्ध-मुक्त असा कोणताच प्रकार आत्मतत्त्वात नाही. तो केवळ अविद्येने जीवभावाच्या दशेने उत्पन्न होतो. त्यावेळी तूं देहांत असूनही विदेही झालेला असशील. निर्विकल्प झालेला असशील. म्हणून बा शिष्या तूं हे ध्यानात ठेव कीं,

**निर्विकल्पमनल्पमक्षरं यत्क्षराक्षरविलक्षणं परम् |**
**नित्यमव्ययसुखं नीरञ्जनं ब्रह्म तत्त्वमसि भावयात्मनि ||२६१||**

आणि निर्विकल्पता प्राप्त होण्यासाठी "मी व माझे" ह्या धारणेचा समूळ त्याग आवश्यक आहे. त्याच्या अध्यासानेच (सध्या ध्यास आहे) तो हळूहळू

जमतो. त्यासाठी प्रत्यही मनात उत्पन्न होणाऱ्या अहंकाराच्या लहरी दुर्लक्षित करून मन ईशचिंतनात गुंतवावे लागते. तसेच कोणत्याच प्रकारची कामना उत्पन्नच होऊ न देणे शिकावे लागते. त्या साठी तत्त्वमसि चा बोध उपयुक्त होतो. कारण देह जीवभावाने उत्पन्न झालेला आहे. स्वेच्छेने नाही. तथापि प्रत्येक जीवाला मुक्त होण्याचे स्वातंत्र्य आहे. ते आध्यात्मिक धारणे साठी आहे. बाकी व्यावहारिक स्वातंत्र्य मर्यादित स्वरूपातच आहे. म्हणून तर पाप व पुण्य ह्या दोन गोष्टी निर्माण होतात. देह प्रारब्धाधिन असल्यामुळे संसारासाठी त्याला पूर्ण स्वातंत्र्य असत नाही. कारण देहाचा संबंध प्रकृतीशी आहे. प्रकृती संघर्षमय आहे तर आध्यात्म शांत व आनंदमय आहे. प्रकृती सविकार आहे तर अध्यात्म निर्विकार आहे. प्रकृतीत सुख-दुःखाची क्षणभंगुरता आहे तर अध्यात्मांत चिरकालीन आनंद आहे. प्रकृतीत अपूर्णत्वाचा अनुभव येतो तर अध्यात्मांत परिपूर्णता अनुभवास येते. प्रकृती प्रारब्धाधीन अनुभव देते, तर अध्यात्म तत्त्वमसि हा अनुभव देऊन शांत करतो. प्रारब्धात भौतिकाचा व्यापार, हव्यास, वासना ह्यांचा क्षणोक्षणी उद्रेक होतो. तर अध्यात्मात आत्मानंदासाठी सूक्ष्मत्याग धारणा उत्पन्न होऊन अविनाशी “अहं ब्रह्मास्मि” चा बोध होतो. प्रकृती पूर्वजन्मातल्या सुकृत अथवा दुष्कृत यांच्या परिणामाने प्रारब्ध निर्माण करते व भविष्य अज्ञात असते. तर अध्यात्म याच जन्मात जीवनमुक्तीचा अनुभव देऊन आत्मज्ञान प्रदान करते. प्रारब्ध प्रकृती व माया यांच्या आधीन आहे. प्रारब्ध प्रत्येकाचे वेगळे वेगळे असते तर अध्यात्म हे आत्मज्ञानासाठी सर्वांचे एकच असते. अध्यात्माने ज्या परब्रह्माची प्राप्ती होते त्या परब्रह्माला पारावर नाही. प्रकृती व प्रारब्ध यांना मर्यादा आहे. प्रारब्धाचा नाश हृद्यग्रंथी मोकळ्या होण्याने होतो तिथेच अध्यात्म उदयाला येते. मग देह बाह्य आचरणाने प्रारब्ध भोगताना दिसत असला तरी तो अंतरातून मुक्त झालेला असतो. जीवनमुक्तीचा सोहळा अनुभवत असतो. कारण प्रारब्ध

देहाला पूर्वजन्मातल्या सुकृत-दुष्कृतामुळे प्राप्त झालेले असते. ते प्रकृतीच्या नियंत्रणात असते. जसे  एखाद्या शिकाऱ्याने वाघावर नेम धरून सोडलेला बाण, वाघाला लागण्यापूर्वीच जर वाघ त्याठिकाणाहून बाजूला झाला तर तो बाण त्याच्या मागे जर गाय उभी असेल तर तिला लागणारच. तद्वत पूर्व कर्मफलाने विद्ध झालेला देह प्रारब्ध भोगत रहातो.

ज्ञानोदयात्पुरारब्धं कर्मज्ञानान्न नश्यति ।
अदत्वा स्वफलं लक्ष्यमुद्दिश्योत्सृष्टबाणवत् ॥ ४५१॥

व्याघ्रबुद्ध्या विनिर्मुक्तो बाणः पश्चात्तु गोमतौ ।
न तिष्ठति छिनत्येव लक्ष्यं वेगेन निर्भरम् ॥ ४५२॥

मनाच्या निवृत्तीमुळे जीवाचे जीवपण हरपून ते ब्रह्मतत्त्वाशी तादात्म्य पावल्यावर देह आपला नाही ही दृढ धारणा होते मग प्रारब्ध ते काय उरणार? कारण

**अजो नित्य: शाश्वत इति ब्रूते श्रुतिरमोघवाक् ।**
**तदात्मना तिष्ठतोऽस्य कुत: प्रारब्धकल्पना ॥४५९॥**

श्रुती सुद्धा निःसंदिग्ध शब्दांत हाच बोध करून देतात. ज्याला जन्मच नाही, ज्याला नाशही नाही, जे शाश्वत आहे, जे निर्लेप आहे, त्या परब्रह्माशी एकरूप झाल्यावर देहच आपला नाही तर प्रारब्ध कल्पना उरेल कशी?

अशाप्रकारे गुरुवचनामृत प्राशन करता करता शिष्य देहभान विसरला. त्याच्या हृदयग्रंथी मोकळ्या झाल्या. मनाचे मनपणच मोडले. ज्या मनावर संसारचित्र उमटते तो मनोरूप पडदा पूर्ण विरून गला. मन ब्रह्मभावाने शरीरभर समरसून गेल्याने जीवभावही नाहीसा झाला. मन व बुद्धी यांनी जाणता न येणारी

परब्रह्मतत्त्वाची सूक्ष्म अनुभूती "तत्त्वमसि" ह्या परममहावाक्याने श्रीगुरुंच्या अमृतमय वाणीने जागी झाली. शिष्य त्याच क्षणी समाधीअवस्थेत गेला. निर्विकल्प अवस्थेचा अनुभव अनिर्वाच्य असल्याचे त्याला समजले ते विश्वमनाच्या सहय्याने. किबहुना तो स्वत: चराचरमय झाला असल्याचे त्याला जाणवले. परब्रह्म हे निर्विकल्प आहे. ते एकही नाही वा अनेकही नाही. येत नाही किंवा जातही नाही. चल नाही अथवा अचलही नाही. ते असेही नाही वा तसेही नाही. रूपही नाही अथवा अरुपही नाही. अशा बोधाने तृप्त झालेला व सत्-चित्-आनंदाने निथळून निघालेला शिष्य काही वेळाने देहभानावर आला त्यावेळी त्याचे अष्टसात्विकभाव जागे झाले होते त्याच अवस्थेत भावविवश होऊन तो श्रीगुरुंना म्हणाला,

**नमो नमस्ते गुरवे महात्मने**
**विमुक्तसङ्गाय सदुत्तमाय ।**
**नित्याद्वयानन्दरसस्वरूपिणे**
**भूम्ने सदाऽपारदयाम्बुधाम्ने ॥ ४८६॥**

अर्थात् हे सद्गुरो! आपल्या चरणी माझे अनंत प्रणिपात आहेत. आपण साक्षात् परब्रह्ममूर्ति नित्यानंदरूप असे अपार दयेचे सागर आहात. कारण आपल्या बोध-सागरामुळे ,

**धन्योऽहं कृतकृत्योऽहं विमुक्तोऽहं भवग्रहात् ।**
**नित्यानन्दस्वरूपोऽहं पूर्णोऽहं त्वदनुग्रहात् ॥ ४८८॥**

मी धन्य झालो आहे, कृतकृत्य झालो आहे, परिपूर्ण झालो आहे, भवसागर पार केला आहे. तो केवळ आपण माझ्यावर केलेल्या कृपानुग्रहामुळेच.

शंकराचार्य भराभर लिहित होते. लिहिताना वैखरी वाणीने उच्चारही करीत होते. सद्गुरु गोविंदयती श्रावण करीत होते. अत्यंत भावविभोरतेने ते शिष्याला न्याहाळत होते. नेत्रांतून कृतार्थता ओसंडली होती. कृपा उचंबळून आली होती. शिष्या बद्दलचा आत्मविश्वास दाटला होता. आनंदाश्रू मुक्त मौक्तिक बिंदूसम ओघळत होते. नेमके त्याचवेळी शंकराचार्यांनी त्याच्याकडे पाहिले. आचार्यांच्या भावना अनावरतेने शब्दबद्ध झाल्या

स्वाराज्यसाम्राज्यविभूतिरेषा
भवत्कृपाश्रीमहिमप्रसादात् ।
प्राप्ता मया श्रीगुरवे महात्मने
नमो नमस्तेऽस्तु पुनर्नमोऽस्तु ॥ ५१७॥

हे सद्गुरो! स्वराज्य व साम्राज्य ह्यांच्या वैभवाने नटलेली ही मोक्षसंपदा मी आपल्या परमकृपाशिर्वादानेच प्राप्त करून घेतली आहे, म्हणून माझा आपणास नमस्कार आहे, पुन:पुन्हां नमस्कार आहे.

गुरु गोविंदयतींना आनंद झाला. ज्ञानी झालेला शिष्य समर्पणात्मक भावाने आपल्या चरणी एवढ्या विनयाने ग्रंथाचे श्रेय अर्पण करतो आहे ह्याचे त्यांना अपार कौतुक वाटले. त्यांनी शंकराचार्यांना भरभरून आशिर्वाद दिले. हा सर्व सोहळा शंकराचार्यांचा बालमित्र विष्णुशर्मा महत्भाग्याने पाहात होता.

प्रकरण ५ वे

# नर्मदा स्तुती व गुरुगौडपादचार्य भेट

विष्णुशर्म्यांनी हा सर्व संवाद श्रवण केला. विष्णुशर्मा विवेकचूडामणि प्रथमपासून श्रवण करीत होते. त्यांना जसे जसे श्रवण घडत होते तशी तशी प्रचीती येत होती. नर्मदा तीरावरचा आश्रम अशा थोरांच्या सहवासाने उजळून निघाला होता. नर्मदामाता आनंदाने ह्यात सहभागी झाली होती. "विवेकचूडामणि" सारख्या अद्वितीय ग्रंथाची निर्मिती झाल्यावर शंकराचार्य आपल्याकडे लक्ष देतील व नर्मदेसाठी नव्हे तर जनलोकांत नर्मदामातेचे पावित्र्य समजावे म्हणून तरी आपल्यावर काही काव्य रचना करतील असे नर्मदामातेला वाटत होते. पण तसा योग काही लवकर येईना. जो तो आपल्या साधनात निमग्न होता. गुरुगोविंदयती आपल्या गुहेत ध्यानस्थ होते. बाहेर धुवांधार पाऊस पडत होता. नर्मदामातेला अनायासेच संधी मिळाली. नर्मदामाता दुथडी भरून वाहू लागली.

पाऊस थांबला पण नर्मदामाता थांबायला तयार नव्हती. नर्मदामातेचे पाणी वाढतच राहिले. इतके वाढले कीं उंचावर असलेल्या आश्रमातही आले. प्रचंड उग्ररूप धारण केलेली नर्मदामाता गुरुगोविंदयती जिथे ध्यानमग्न होऊन बसले होते त्या गुहेच्या रोखाने निघाली. विष्णुशर्म्याने ते पाहिले. त्यांनी आचार्यांना हे वर्तमान गुहेत जाऊन सांगितले. शंकराचार्य तत्क्षणी आपला कमंडलू घेऊन गुहेच्या द्वाराजवळ आले. समोरून वेगाने येणारी नर्मदा त्यांनी पाहिली. झटकन कमंडलू प्रवेशद्वाराशी ठेवला. हात जोडून नर्मदामातेला प्रार्थना केली, हे संसारताप नष्ट करणाऱ्या नर्मदादेवी तुझ्या चरणकमलांशी मी नम्र होतो. ह्यावेळी भयचकित झालेले विष्णुशर्मा शंकराचार्यांच्या चेहऱ्यावरील निर्भयता पाहून स्वत:चे भय विसरले आणि तन्मयतेने शंकराचार्यांची प्रार्थना ऐकू लागले, आचार्य म्हणत होते,

सबिन्दुसिन्धुसुस्खलत्तरङ्गभङ्गरञ्जितं

द्विषत्सु पापजातजातकादिवारिसंयुतम् ।

कृतान्तदूतकालभूतभीतिहारिवर्मदे

त्वदीयपादपङ्कजं नमामि देवि नर्मदे ॥ १॥

**गतं तदैव मे भयं त्वदम्बु वीक्षितं यदा**

**मृकण्डुसूनुशौनकासुरारिसेवितं सदा ।**

**पुनर्भवाब्धिजन्मजं भवाब्धिदुःखवर्मदे**

**त्वदीयपादपङ्कजं नमामि देवि नर्मदे ॥ ४॥**

अशा प्रकारचे 'नर्मदाष्टक' आचार्यांनी नर्मदामातेची स्तुती करण्यासाठी रचले. ज्या कारणास्तव नर्मदामाता गुरुगोविंदयतींच्या गुहे कडे झेपावली होती तो हेतू पूर्ण होताच प्रवेशद्वारी असलेल्या आचार्यांच्या कमंडलूत तिने प्रवेश केला व नर्मदामाता गुप्त झाली. नर्मदामाता शांत झाली व झरकन ओसरून गेली. हे आश्चर्य पाहून विष्णुशर्म्याने नर्मदेसह श्रीशंकराचार्यांना वंदन केले.

गुरुगोविंदयती ध्यानावस्थेतून बाहेर आल्यावर विष्णुशर्म्यांनी विनयाने त्यांना वंदन करून सर्व घटना कथन केली. ह्या अपूर्व घटनेमुळे गुरुगोविंदयतींना आनंद तर झालाच पण त्यांनी शंकराचार्यांना बद्रिकाश्रमांत आपल्या गुरुंच्या दर्शनासाठी नेण्याचा संकल्प केला. गुरुगोविंदयतींनी संकल्प केल्यावर निघायला किती वेळ लागणार? ते शंकराचार्यांना बरोबर घेऊन लगेच निघाले. ज्या कारणासाठी बरीच वर्षे नर्मदाकाठी वास्तव्य केले ते कारण पूर्ण झाले. मग बरीच वर्षे सद्गुरू भेट न

झाल्यामुळे सद्गुरु भेटीची ओढ न लागती तरच नवल. शुकाचार्यांचे शिष्य झाल्यापासून गुरु गौडपादाचार्य वेदाभ्यासात मग्न झाले होते. त्याच अभ्यासातून त्यांनी मांडुक्यकारिका नामक अपूर्व ग्रंथ निर्माण केला होता. मांडुक्योपनिषदावरचे ते अपूर्व भाष्य होते. त्यात गौडपादाचार्यांनी अंतर्ज्ञानाने त्यांना दिसलेली अजातवादाची कल्पना सिद्धांतासह अनाग्रही तर्कावर मांडली आहे. मन व बुद्धीचे ऐक्य साधून चित्त चतुष्टय जेंव्हा अंत:करणात विलीन होते तेंव्हा निर्विकल्पता प्राप्त होऊन ज्ञानेंद्रियांना भासमान होणारे संपूर्ण विश्व हे एकसंघ ब्रह्मच आहे असे ज्ञान प्राप्त होते व कसलीच निर्मिती झालेली नाही अशी अनुभूती येते. निर्मितीच नाही तर निर्माताही नाही. म्हणजेच निर्मिती व निर्माता दोन्ही एकच ब्रह्म असल्याचे जाणवते. ब्रह्म हेच एकमेवाद्वितीय आहे. असा सिद्धांत अत्यंत कुशलतेने अजातवादाच्या भाष्यात गौडपादाचार्यांनी प्रतिपादन केला आहे. हाच अद्वैतवाद शंकराचार्यांनी गुरु परंपरेने आत्मसात् केला होता. मग अशा शिष्याला आपल्या गुरुंच्या चरणी नेण्याची ओढ गुरुगोविंदयतींना लागणे अगदी स्वाभाविक होते. शंकराचार्यांना आपल्या गुरुंबद्दल परम आदर होता. गुरुगोविंदयतींनी आपल्या गुरुंच्या आश्रमात जेंव्हा शंकराचार्यांच्यासह प्रवेश केला तेंव्हा गुरुगोविंदययतींच्या भावना अत्यंत तरल झाल्या. त्यांचे शरीर कंप पावू लागले. त्यामुळे सहजतेने त्यांनी आपला हात श्रीशंकराचार्यांच्या स्कंधावर ठेवला. शंकराचार्यांनी त्यावेळी आपल्या गुरुंच्या स्पर्शातली विलक्षण शक्ती अनुभवली. गुरु-शिष्य दोघेही एकाच वेळी गुरु गौडपादाचार्यांच्या समोर आले. अनावर भावाने गुरुगोविंदांनी आपले मस्तक गुरुचरणी ठेवले. नेत्रातल्या गंगा-यमुनारुपी जलाने त्यांचे पादक्षालन केले. शंकराचार्य ह्या अपूर्व भेटीचा सोहळा आपल्या अंत:करणात साठवीत परात्परगुरु गौडपादचार्यांच्या चरणी नतमस्तक झाले.

गुरु-शिष्याच्या जोडीला नेत्रातल्या कृपा कटाक्षाने प्रभू गौडपादचार्यांनी आशिर्वाद दिला. गुरुगोविंदयतींच्या शिष्याला गौडपादाचार्यांनी नीट न्याहाळले. प्रखर वैराग्याने तेज:पुंज दिसणारा चेहरा, निष्कपट व बघणाऱ्यांच्या अंत:करणाचा ठाव घेणारे तेजस्वी डोळे, भव्यकपाळ, तरतरीत नाक, मुग्धहास्य विलसणारी जीवणी, चेहऱ्याला शोभून दिसणारी हनुवटी, बालवयामुळे नितळ दिसणारे गाल, अशा सर्व वैभवी चेहऱ़पट्टीवर विशेषत्वाने जाणवणारी गोष्ट म्हणजे परम शांती! स्थिर नजरेने पाहाणे. शांतचित्ताने पण निश्चयाने होत असलेल्या अचूक हालचाली इत्यादी पाहून गौडपादाचार्यांना जाणवले कीं हाच तो अलौकिक पुरुष. हाच तो शंकराचा अवतार. महर्षी व्यासांनी ज्याच्या बद्दल पूर्वसूचना दिली तो सत्पुरुष हाच. हाच व्यास सूत्रांचा भाष्यकार! गुरगोविंदांनी जेंव्हा लौकिक ओळख करून दिली तेंव्हा गौडपादाचार्यांनी कौतुकाने आपला हात आशिर्वादासाठी शंकराचार्यांच्या मस्तकावर ठेवला. गुरुगौडपादाचार्यांनी मनाशी काही निश्चय केला. दुसऱ्या दिवसापासून प्रभात समयी आपल्या समवेत काही काल श्रवणासाठी बसण्याची आज्ञा त्यांनी शंकराचार्यांना केली. परमादराने शंकराचार्यांनी ती आज्ञा शिरोधार्य मानली.

दुसऱ्या दिवसापासून शंकराचार्य ब्राह्ममुहूर्तावर उठून ध्यानधारणा व आह्निक करून सूर्योदयाच्यावेळी गुरुगौडपादाचार्यांना वंदन करून त्यांच्या सोर आसनावर बसू लागले. गुरुगौडपादचार्य आपल्या मुखाने शंकराचार्यांना मांडुक्यकारिका ऐकवू लागले. शंकराचार्य अत्यंत एकाग्रतेने श्रवण करीत होते. त्यांच्या एकाग्रतेवर गुरुगौडपादाचार्य परम संतुष्ट झाले. आपल्या नातशिष्याला बौद्धमतवादाचे खंडन करून वैदिक सनातनधर्माची स्थापना करावयाची आहे. त्यांत परिपूर्णता व साधार आत्मविश्वास यांची आवश्यकता आहे हे जाणून त्यांनी शंकराचार्यांना

“मांडुक्यकारिका” सांगितली. कुशाग्र बुद्धीच्या व तीव्र स्मरणशक्तीच्या आचार्यांनी ती धारण केली. मांडुक्यकारिका पूर्ण सांगून झाल्यावर गौडपादाचार्यांनी शंकराचार्यांशी चर्चा केली. चर्चेच्या संवादातून शंकराचार्यांचा विनय, सखोल अभ्यास, निःसंदिग्ध भाषण इत्यादी सर्व गुणांचे दर्शन त्यांना मिळाले. गौडपादाचार्य अत्यंत प्रसन्न झाले. आपल्या परारात्परगुरुंशी संवाद झाल्यावर आचार्यांनी अत्यंत आदराने गुरुगौडपादाचार्यांना वंदन केले, आचार्य म्हणाले,

**प्रज्ञावैशाखवेद: क्षुभितजलनिधेर्वेदनाम्नोऽन्तरस्थं |**

**कारुण्यादुद्धरामृतमिदममरैदुर्लभं भूतहेतो: ||**

वैशाख महिन्यात सूर्य ज्याप्रमाणे सागराचे पाणी आटवून जलधारासाठी मेघांची निर्मिती करतो, त्याचप्रमाणे माझ्या परात्पर गुरुंनी सर्वसामान्यांच्या करुणेने प्रेरित होऊन आपल्या असामान्य प्रज्ञेने वेदसागरातून ज्ञानामृतधारांचा वर्षाव करण्यासाठी हा वेदांतमेघ निर्माण केला आहे.

गौडपादाचार्य कृतकृत्य झाले. कारण आतां हे ज्ञान भूतलावर प्रवाही होणार होते. गुरु-शिष्य जोडीला त्या थोर वेदांत्याने तोंडभरून आशिर्वाद दिले. हा मुक्काम जवळ जवळ महिनाभर होता. गुरुगौडपादाचार्यांनी दोघांनाही आनंदाने निरोप दिला. गुरु-शिष्य पुन्हां आपल्या नर्मदातीरावरील आश्रमाच्या मार्गाने निघाले. अंत:करण जड झाले होते. पाऊले निघत नव्हती. नेत्र पाणावले होते. पुनर्दशनाची त्यात याचना होती. मान पुहां पुन्हां मागे वळून पहात होती. अगदी आश्रम दिसे पर्यंत.

गुरुगोविंदयतींनी आणि शंकराचार्यांनी ॐकार मांधाता येथील आश्रमात प्रवेश केला. अत्यंत आतुरतेने वाट पहात असलेल्या विष्णुशर्म्याने परमानंदाने सामोरे येऊन स्वागत केले. दोघांनही एकाचवेळी साष्टांग दंडवत घातला. शंकराचार्य गुरुगोविंदयतींच्या सह बद्रिकाश्रमात गेल्या पासून विष्णुशर्मा अत्यंत उदास झाला होता. त्याला गोकर्णापासून शंकराचार्यांचा सहवास लाभला होता. शंकराचार्यांच्या बरोवर तो सावली सारखा वावरत होता. त्यांची सेवा करीत होता. त्याला क्षणभरही आचार्यांशिवाय चैन पडत नव्हती. आचर्य म्हणजे त्याचे परमदैवत झाले होते. शंकराचार्य गुरुगोविंदांची सेवा करीत आणि विष्णुशर्मा आचार्यांची सेवा करीत होता. विष्णुशर्मा गुरु-शिष्य संवाद अत्यंत मन लाऊन व उत्सुकतेने श्रवण करीत असे.

प्रकरण ६ वे

# प्रस्थानत्रयीवर भाष्य करण्यासाठी काशीत वास्तव्य

आचार्य व गुरुगोविंदयतींच्या आगमनाने विष्णुशर्मा आनंदला. त्याच्यासाठी जणू महिन्याभराची रात्र संपून उष:काल झाला असेच त्याला वाटले. त्याने मनाशी निश्चय केला इत:पर आचार्यांना सोडून राहायचे नाही. आचार्य व गुरुगोविंदयती यांचा प्रवासाचा शीण संपला. ॐकार मांधाताच्या आश्रमात पुनश्च पुर्ववत् वर्दळ सुरु झाली. गुरुगोविंदयतींनी एका शुभ दिवशी शंकराचार्यांना काशीला जाऊन राहण्याची आज्ञा केली. ते भूतलावरील ब्रह्मविद्येचे सर्वश्रेष्ठ माहेरघर आहे. तेथे राहून “प्रस्थानत्रयी”वर भाष्य लिही.

आपल्या सद्गुरूंचा निरोप घेऊन आचार्य निघाले. विष्णुशर्म्याला ह्यावेळी मोठेच आश्चर्य वाटले. कारण आचार्यांनी त्याला आधीच विचारले होते कीं आपल्या बरोबर काशीला येणार कां? आतां आचार्य खरोखर निघालेले पाहून विष्णुशर्मा क्षणाचाही विलंब न लावता त्यांच्या समवेत निघाला. दोघांनीही गुरुगोविंदयतींना वंदन केले. ॐकारेश्वराला वंदन केले व दिसत नाहीसे होई पर्यंत पुन्हां पुन्हां आश्रमास वंदन करीत मार्गस्थ झाले. शंकराचार्यांनी विंध्याचलाचा मार्ग धरला. रमणीय वनश्रीसाठी नारदांनीही ज्याची स्तुती केली होती तो विंध्याचल आचार्यांना सुखावित होता. घनदाट उंच उंच टिगोरे साग होते. विशाल औदुंबर होते. सळसळणारे अश्वत्थ होते. असंख्य पारंब्या भूमीत रोवून अनेक वृक्षांचा आभास निर्माण करणारे प्रचंड वटवृक्ष स्थितप्रज्ञासारखे भासत होते. जंगलातील मुक्त पशु-पक्षांचा संचार मनाला मोहवीत होता. नद्यांचा आवाज मनाला साद घालीत होता. अनेक वेलींची सुगंधी फुले आपला सुगंध दरवळवीत होती. भ्रमरांचा गुंजारव जणू

सामवेदाचे गायन करीत आहेत कीं काय असेच वाटत होते. आकाश कधी नितळ अथांग खोलीने भरून गडद निळे भासत होते तर कधी अवखळ वायुलहरींवर श्वेतमेघांचे नृत्य घडवीत होते. ही सर्व रमणीयता पाहून आचार्य विष्णुशर्म्याला म्हणाले, “बघ तरी “ब्रह्म” नावाच्या जादुगाराने विविधतेने नटवलेले इंद्रजाल कसे पसरवले आहे!” विष्णुशर्मा आचार्यांच्या ह्या वाक्यानेसुद्धा ब्रह्मभावांत जाण्याचा प्रयत्न करीत असे. त्याला तर आचार्य म्हणजेच चालते बोलते ब्रह्म वाटत होते. त्यातून आता तर सदैव आचार्यांच्या सेवेत राहण्याची संधी प्राप्त झालेली.

माध्यान्हा पर्यंत चालत राहावे. माध्यान्ही कोठे वस्ती लागली तर भिक्षा करावी. मग थोडी विश्रांनी घेऊन पुढील मुक्कामी निघावे. अंधारून येईपर्यंत एखाद्या गावी पोहोचावे. एखाद्या मंदिरात मुक्काम करावा. दर्शनासाठी आलेल्या लोकांशी बातचीत करावी. गावकऱ्यांच्या शंकांचे अत्यंत सोप्या भाषेत निरसन करावे. त्यांचे भाषण ऐकताना छोटेमोठे, ज्ञानी-अज्ञानी, सारेजण समरस होऊन ऐकत. एकतर आचार्यांचा चेहरा अत्यंत देखणा व विलक्षण बोलका होता. त्यांना पाहताक्षणीच लोक त्यांच्याकडे आकर्षित होत असत. मग बोलायला लागल्यावर मंत्रमुग्ध होऊन ऐकत असत. त्यावेळी आचार्य अत्यंत सुंदर काव्य रचना करून स्त्रोत्र रूपाने त्यांना ज्ञान देत असत. असा प्रकार दर मुक्कामी घडत असे. विष्णुशर्मा मन:पूर्वक आचार्यांची सेवा करीत असे. आचार्य आपल्याला मित्रत्वाने वागवतात याचा त्याला फार आनंद होत असे. पण तो स्वत: त्यांच्याशी परम आदराने वागत असे. त्याने मनोमन आचार्यानाच आपले गुरु मानले होते. म्हणून सतत:चा शिष्यत्वाचा भाव तो कधीच सोडत नसे. त्यांचा हा लांबचा प्रवास आचार्यांच्या ओघवत्या उपदेशाने व अनेक काव्य रचनेमुळे अत्यंत आनंदात होत होता. विविध शहरे, गावे, खेडी अथवा वस्त्या इत्यादी ठिकाणच्या लोकांना आपलेसे करीत त्याना ज्ञानामृत पाजीत दोघेही श्रीक्षेत्र वाराणसीला आले. तेंव्हा

आचार्य सहज म्हणाले, वारणा व असी ह्या दोन नद्यांच्या संगमावर हे नगर वसलेले आहे म्हणून ते “वाराणसी”. पण खरे नाव काशीच आहे. कारण,

**काश्यां’ हि काशते काशी काशी सर्व प्रकाशिका |**
**सा काशी विदिता येन तेन प्राप्ता हि काशिका ||४||**

“काशी म्हणजे आत्मा. तो आत्मतत्त्वातच प्रकाशित होतो. म्हणून आत्मतत्त्वच सर्व विश्वावर प्रकाश टाकणारे आहे. काशीचा हा गुढार्थ ज्याला समजला तोच खरा काशीला पोहोचतो. ”

विष्णुशर्मा विचारमग्न झाला. त्याच्या मनात सहज आले, म्हणजे आपण देहाने जरी काशीत येऊन पोहोचलो असलो तरी गुढार्थाने अद्याप आपल्याला काशी पहावयाची आहे. ॐकार मांधाता ते काशी आचार्यांची अनेक प्रवचने झाली. त्यावेळी त्यांनी अनेक स्तोत्रांची रचना केली. ती सर्व विष्णुशर्मा यांनी लिहून काढली होती. आता काशी वैशिष्ट्याच्या “काशीपञ्चक” स्तोत्राने काशीत प्रवेश झाला. सद्गुरुंच्या आज्ञेनुसार आतां “प्रस्थान-त्रयी” वरील भाष्य पूर्ण होई पर्यंत काशीतच वास्तव्य होणार होते.

आचार्य विष्णुशर्म्यासह प्रथम गंगेच्या दर्शनास आले. गंगेचे अथांग वैभव पाहून आचार्य स्तब्ध झाले. गंगा किनारी हात जोडून उभे राहिले. त्यांच्या भाव आणि भक्ती ह्यांच्या उर्मींनी वाग्देवतेचे स्वरूप धरण केले. कंठातून मधुर नादासह वैखरीवाणी गंगाष्टकाच्या रुपात प्रकट होऊ लागली.

**“भगवती तव तीरे नीरमात्राशनोऽहं**
**विगतविषयतृष्ण: कृष्णमाराधयामि |**
**सकलकलुषभंगे स्वर्ग सोपानसंगे**

**तरलतर तरंगे देवी गंगे प्रसीद ||"**

शंकराचार्य आपल्या मधुरवाणीने जेंव्हा गंगेची स्तुती करू लागले तेंव्हा जवळपासची माणसे भारावल्यासारखी ऐकत स्तब्ध झाली. इथूनच शंकराचार्यांच्या बद्दल जनसागरांत कुतूहल निर्माण झाले. त्यांच्या बद्दल आदरभाव दाखवू लागले. शंकराचार्य गंगेच्या काठावरून प्रसिद्ध अशा मनकर्णिका घाटावर आले. आतां त्यांच्या बरोबर बराच मोठा जनसमुदाय होता. आचार्यांनी मनापासून मनकर्णिक घाताची प्रार्थनारुपी स्तुती केली. तेच मनकर्णिकाष्टक.

त्वत्तीरे मणिकर्णिके हरिहरौ सायुज्यमुक्तिप्रदौ वादन्तौ कुरुतः परस्परमुभौ जन्तोः प्रयाणोत्सवे । मद्रूपो मनुजोऽयमस्तु हरिणा प्रोक्तः शिवस्तत्क्षणात् तन्मध्याद्भृगुलाञ्छनो गरुडगः पीताम्बरो निर्गतः ॥ १॥

अशी सुरुवात केली व

कृच्छैर् कोटिशतैः स्वपापनिधनं यच्चाश्वमेधैः फलं तत्सर्वे मणिकर्णिकास्नपनजे पुण्ये प्रविष्टं भवेत् । स्नात्वा स्तोत्रमिदं नरः पठति चेत्संसारपाथोनिधिं तीर्त्वा पल्वलवत्प्रयाति सदनं तेजोमयं ब्रह्मणः ॥ ९॥

असा समारोप करून आचार्यांनी त्रिवार बुडी मारून स्नान केले. तेथून ते काशी विश्वेश्वराच्या दर्शनास आले. आपल्या सद्गुरूंना स्वत:ची ओळख "श्चिदानंदरूप:शिवोऽहम्" म्हणणाऱ्या आचार्यांची अवस्था अत्यंत भावविवश झाली. विश्वेश्वराचे दर्शन होताच नतमस्तक झालेले आचार्य शिवस्तुतीत रंगून गेले.

सानन्दमानन्दवने वसन्तमानन्दकन्दं हतपापवृन्दम् ।
वाराणसीनाथमनाथनाथं श्रीविश्वनाथं शरणं प्रपद्ये ॥ ११॥

आनंदवनातल्या आनंदी आनंदाच्या कंदा, पापांचे ढीग नष्ट करणाऱ्या हे वाराणसीच्या अनाथांच्या नाथा, हे विश्वनाथा मी तुला शरण आलो आहे!" अशी भावपूर्ण सुरुवात करून नंतर आचार्यांनी सुवर्णमालास्तुति करण्यास आरंभ केला.

अथ कथमपि मद्रसनां त्वद्गुणलेशैर्विशोधयामि विभो ।
साम्ब सदाशिव शम्भो शङ्कर शरणं मे तव चरणयुगम् ॥ १

अशी सुरुवात करून आचार्यांनी ती ५० श्लोकांत पूर्ण केली. आचार्य स्तुति करण्यात पूर्ण रंगून गेलेले होते. अत्यंत रसपूर्ण व सोपी शब्द रचना. अर्थपूर्ण आणि भक्तीरसाने ओथंबलेली रचना लोकांचे मन मोहून घेतल्या खेरीज कशी राहील. जनसमुदाय आपोआपच त्यांच्या मागे मागे जाऊ लागला. आचार्य जेंव्हा मोदादी पंचविनायकाच्या दर्शनास आले तेंव्हा त्यांनी "श्रीगणेशपञ्चरत्नम्" स्तोत्राने प्रार्थना केली

**मुदा करात्तमोदकं सदा विमुक्तिसाधकं**
**कलाधरावतंसकं विलासलोकरक्षकम्।**
**अनायकैकनायकं विनाशितेभदैत्यकं**
**नताशुभाशुनाशकं नमामि तं विनायकम्॥१॥**

असे प्रत्येक देवाचे व देवतेचे दर्शन घेत असताना आचार्य वैभवशाली स्तोत्र रचना करीत होते. जेंव्हा ते अन्नपूर्णा मंदिरांत पार्वतीमातेच्या दर्शनास आले तेंव्हा

नित्यानन्दकरी वराभयकरी सौन्दर्यरत्नाकरी
निर्धूताखिलघोरपावनकरी प्रत्यक्षमाहेश्वरी ।
प्रालेयाचलवंशपावनकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी माताऽन्नपूर्णेश्वरी ॥ १॥

अशी सुरुवात करून समारोपात मागणे मागितले ते अत्यंत हृद्य आहे त्यांत आचार्य म्हणतात,

अन्नपूर्णे सदापूर्णे शङ्करप्राणवल्लभे।
ज्ञानवैराग्यसिद्ध्यर्थं भिक्षां देहि च पार्वति ॥ ११॥

अशाप्रकारे वैराग्याची प्रार्थना करून आचार्य कालभैरवाच्या मंदिरात आले आणि त्यांनी कालभैरवाची प्रार्थना कालभैरवाष्टकाने केली,

देवराजसेव्यमानपावनाङ्घ्रिपङ्कजं व्यालयज्ञसूत्रमिन्दुशेखरं कृपाकरम्।
नारदादियोगिवृन्दवन्दितं दिगम्बरं काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ १॥

अशाप्रकारे अंतर्गृह यात्रा करून आचार्य विश्वेश्वरमंदिराच्या प्रशस्त ओवरीत विष्णुशर्म्यासह स्थिरावले.

विष्णुशर्म्याला आचार्यांच्या अथक उत्साहाचे व अचूक हालचालींचे आश्चर्य वाटत असे. त्याला जसे आश्चर्य वाटे तसेच ते हळूहळू काशीतल्या लोकांनाही वाटू लागले. सर्वात मोठे आश्चर्य असे कीं काशीतल्या विद्वान कर्मनिष्ठ पंडितांना जितकी आपुलकी वाटत असे तितकीच ती अडाणी शेतकरी कर्मचाऱ्यांनाही वाटत असे. याला कारण एकच, प्रत्येक व्यक्तीशी समरस होऊन बोलण्याची आचार्यांची संभाषण कला. विद्वानातला विद्वानही त्यांच्या भाषावैभवाने तृप्त होई. अडण्यातला अडाणीसुद्धा भाषेतल्या सोपेपणामुळे आकृष्ट होई. त्यामुळे आचार्यांची प्रवचने आमंत्रण न देताच रंगू लागली. अमाप गर्दी होऊ लागली.

हळूहळू सर्व थरातील जनसमुदाय आचार्यांची प्रवचने ऐकण्यास गर्दी करू लागला. आचार्य सद्गुरूंचे स्मरण करून "प्रस्थाननत्रयी"वर भाष्य करू लागले. सर्वसामान्य लोकांना समजेल अशा कौशल्याने एक एक सूत्राचा विचार मांडू लागले. "ब्रह्मसूत्रातल्या 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' " ह्या पहिल्याच सूत्रावर भाष्य

करताना आचार्यांनी प्रथम “अथ” ह्या शब्दाच्या अर्थापासून सुरुवात केली. वैदिक कर्माचरण करणारे परंपरेने अथ म्हणजे मंगलाचरणाची सुरुवात असे समजत असत. त्यांना समजावे म्हणून आचार्य म्हणाले इथे हा आरंभ वाचक नसून आनंतर्य (म्हणजे आतां इथून पुढें) असल्याचे समजाऊन सांगितले. (अत्र अथशब्दः आनन्तर्यार्थः परिगृह्यते नाधिकारार्थः ब्रह्मजिज्ञासाया अनधिकार्यत्वात् मङ्गलस्य च वाक्यार्थे समन्वयाभावात् अर्थान्तरप्रयुक्त एव ह्यथशब्दः श्रुत्या मङ्गलप्रयोजनो भवति पूर्वप्रकृतापेक्षायाश्च फलत आनन्तर्याव्यतिरेकात्।)

अशाप्रकारे आपल्या प्रवचनात आचार्य अगदी सोप्या पद्धतीने समजाऊन सांगत असत. जडजंबाल शब्द जणू त्यांच्या कोशांतच नव्हते. त्याकाळातल्या लोकांना उपनिषदे, श्रुति-स्मृति, वेद इत्यादी ग्रंथ प्रमाण असल्यामुळे त्यातले निवडक आधार आचार्य देत असत. प्रचलित मराठी भाषेतले उदाहरण द्यायचे म्हणजे “वाटणे”, “फुटणे” अशाप्रकारचे शब्द जसे वाक्याच्या अनुसंधानभेदाने वापरले जातात तसे आचार्य समजून देत असत. म्हणजे वाटणे ह्या मराठी शब्दाचे वाक्यभेद सर्वज्ञात आहेत. पेढे “वाटणे”, चटणी “वाटणे”, लाज “वाटणे” इत्यादी किंवा शब्द “फुटणे”, पालवी “फुटणे”, कप “फुटणे”, रहस्य “फुटणे”, हे सगळे वाटणे व फुटणे अनेक ठिकाणी वापरले असले तरी वाक्यार्थ भेदाने वेगळे वेगळे असतात तसा अर्थभेद समजाऊन सांगताना आचार्यांनी लोकांना हसत खेळत अर्थबोध करून देण्याची किमया संस्कृत भाषेविषयी साधली होती. अथ शब्द वेगळ्या ठिकाणी वेगळे अर्थ कसे प्रकट करतो हे सांगताना प्रथम त्यांनी अथ शब्दाची उत्पत्ती ब्रह्मदेवाकडून झालेली आहे. म्हणून ती मंगलारंभाची मानण्याची पद्धत झाली आहे. तथापि वाक्याच्या अनुसंधानांत ब्रह्मजिज्ञासाचा विचार केल्यास ब्रह्माची अनुभूती घेण्याची क्रिया ह्यात महत्वपूर्ण आहे. ब्रह्म जाणून घेण्याच्या अधिकारासाठी निरंतर आत्मानात्म विवेक, म्हणजे विचार समाविष्ट होतो. म्हणून

अथ म्हणजे आनंतर्य. इत्यादी समजावात आचार्यांनी संपूर्ण विवेकाचे विवरण करून सर्व जीवांचा ब्रह्म जाणून घेण्याचा अधिकार त्यांना समजाऊन सांगितला. प्रवचन दर दिवशी उत्तरोत्तर रंगू लागले. प्रवचनानंतर विद्वान मंडळी आचार्यांना प्रश्न विचारून स्वत:च्या शंकाचे निरसन करून घेऊ लागली.

रोज सायंकाळी आचार्य प्रवचने करीत असत व दुपारी मिळेल तेवढा वेळ ग्रंथ रचना करीत असत. त्यांत ते विद्वानांना पडणाऱ्या प्रश्नांचा सांगोपांग विचार मांडून रचनेचे स्वरुप निश्चित करीत होते. कारण ग्रंथ त्यांना स्वत:साठी नव्हे तर सर्वसामान्य जनतेसाठी निर्माण करावयाचा होता. त्यांच्या गुरुंचीच तशी आज्ञा होती. आचार्यांनी ती तंतोतंत पाळली. ब्रह्मसूत्रावरच्या भाष्याचा ग्रंथ साकार होऊ लागला. लोक भराभर नाकाला करून घेऊ लागले. त्याचे सर्वात महत्वाचे कारण म्हणजे, पहिल्याच सूत्राच्या प्रवचनाने सर्वसामान्य लोकांना हा दिलासा मिळाला कीं, ब्रह्मप्राप्ती म्हणजे ईश्वारानुभूतीसाठी सर्व शास्त्र जाणता आलेच पाहिजे असे नसून केवळ ब्रह्मजिज्ञासा जागी करून घेऊन मुमुक्षुत्व प्राप्त करून घ्यावे. मुमुक्षुत्व म्हणजे कर्म करतां करतां परब्रह्माचा विचार करून कर्मबंधनातून मुक्त होणे. कर्मातून मुक्त होणे नव्हे. “अत:” शब्दाच्या व्याख्येप्रमाणें इत:पर पारब्रह्मभावांतच सर्व कर्माचा लय “तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु” ह्या भावात करणे. त्यामुळे समग्र कर्मकांड न येणारे व येणारे दोघेही त्यांच्याकडे आकृष्ट झाले ह्यांत काय नवल!

प्रस्थानत्रायींत उपनिषदांचे अनन्य साधारण महत्व आहे. कारण प्रस्थानत्रयीचे महत्व आचार्यांनी सांगतानाच ही महत्वाची गोष्ट सांगितली “आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोत्व्यो निदिध्यासितव्य: |” म्हणजे उपनिषदांचे श्रवण, ब्रह्मसूत्रांनी मनन, व भगवद्गीतेने निदिध्यास ह्या उपायांनी ब्रह्मभावाची प्राप्ती करून घेता येते. ह्याला श्रुतीचा आधार असल्याचेही त्यांनी ब्रह्मसूत्रातल्या पहिल्याच अध्यायातल्या प्रथम पादातल्या जन्माद्याधिकरण “जन्माद्यस्य यत:” ह्या सूत्रावर प्रवचन करताना

समजाऊन सांगितले. उपनिषदांचे सर्व रहस्य समजाऊन सांगताना आचार्यांनी फारच बहार आणली. अध्यात्म व परमार्थ सहजतेने सोपा व आचरणांत आणता येईल अशा प्रकारे प्रतिपादन केला. सर्व विश्व एकसंध ब्रह्म असल्याचे समजाऊन सांगितले. त्यावेळी प्रवचना नंतर “अहं ब्रह्मास्मि” ह्या उपनिषदातल्या महावाक्यावर एका श्रोत्याला मोठाच प्रश्न पडला. त्याला प्रवचनां’तल्या वक्तव्याचा अर्थच समजेना. तो घोटाळ्यात पडला. आचार्यांकडे आला. नतमस्तक झाला. म्हणाला, “अहं ब्रह्मास्मि”चा मला काही नीट बोध होत नाही. तरी मला कळेल असे कृपया सांगा”.

आचार्य म्हणाले, “ ठीक आहे. सांगतो. ” असे म्हणून आचार्यांनी त्याला विचारले, “ तुझ्या खांद्यावर काय आहे?”

श्रोता म्हणाला, “उपरणे!”

आचार्य, “कुणाचे?”

श्रोता, “माझे”.

आचार्य, “याचा अर्थ उपरणे म्हणजे तूं नाहीस!”

श्रोता “खरे आहे!”

आचार्य, “ मग हा खांदा कुणाचा?”

श्रोता, “माझा. ”

आचार्य : “तो खांदा कशाला जोडला आहे?”

श्रोता : “शरीराला!”

आचार्य : “शरीर कुणाचे?”

श्रोता : “माझे!”

आचार्य : “मग शरीर म्हणजे तूं आहेस कां?”

आतां मात्र श्रोता बुचकळ्यात पडला. पण आधीच्या प्रश्नोत्तरांच्या अनुषंगाने म्हणाला, “नाही!” मग लगेच आचार्यांनी विचारले, “मग तूं कोण?” श्रोता भांबावला. करुण नजरेने आचार्यांच्या डोळ्यांत पाहत मुग्ध झाला. तेंव्हां आचार्य सहज पण गांभीर्याने म्हणाले, “तेच ब्रह्म तूं आहेस!” श्रोता परत विचारमग्न झाला. त्याला हे कोडे काही उलगडेना. म्हणून त्याने विचारले, “मग जीव, ईश्वर व ब्रह्म हे तीन वेगळे आहेत कां? कारण मी जर ब्रह्म असेन तर प्रत्येक वस्तू दृश व द्रष्टत्वाच्या, स्पर्शत्वाच्या, आकाराच्या इत्यादी सर्व विचारांनी भिन्न वाटायला नको. पण तसे होत नसल्यामुळे मला काही निर्णय करता येत नाही. मग मी ब्रह्म कसा?” आचार्य म्हणाले, “जीव, ईश्वर व ब्रह्म हे तिन्ही एकच आहेत. केवळ भेदबुद्धिमुळे वेगळे समजले जातात. जसे द्रव-बाष्प-बर्फ हे एकाच जलाचे असूनही आपण त्याला पाणी वाफ बर्फ असे म्हणतो नां? ही जशी एकाच जलाची स्थित्यंतरे असतात व ती जाणकाराला ह्या तिन्ही मध्ये जला खेरीज काहीच नाही हे जसे समजते, तसे ह्या स्थित्यंतराचे ज्ञान नसलेल्यांना ते समजत नाही. अशा स्थित्यंतरामुळे जल जसे भिन्न जाणवते, दिसते, भासते व अनुभवता येते तद्वतच अखंड ब्रह्म हेच ईश्वर व जीव ह्या स्थित्यंतरात येते. जीव हा त्या त्या देहात त्या त्या देहावर ममत्व धरून वासनाभोगांचा भोक्ता झालेला असतो. तोच स्वत:ला अहंकाराने कर्ता समजून कर्म करीत असतो. तोच जीव देहाच्या इंद्रियसौख्याचा “मी” ह्या संज्ञेने भोक्ता होतो. ह्या सर्व जीवांचा नियंता जो असतो तो ईश्वर. जीव ही वासनामय दशा आहे. तर ईश्वर हे त्याचे जीवन आहे. “जीवनं सर्वभूतेषु”(भ. गी. अ. ७वा श्लोक९वा) हे सांगताना आचार्य म्हणाले, “तथा सर्वभूतेषु येन जीवन्ति सर्वाणि भूतानि तद् जीवनम् ।” भगवान् श्रीकृष्णांनी ही कल्पना स्पष्ट करताना अठराव्या अध्यायात अर्जुनाला सांगताना स्पष्ट व निःसंदिग्ध सांगितले कीं,

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।

भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया॥१८. ६१. ॥

**ईश्वर**ः ईशनशीलःनारायणः **सर्वभूतानां** सर्वप्राणिनां **हृद्देशे** हृदयदेशे**अर्जुन** शुक्लान्तरात्मस्वभावः विशुद्धान्तःकरणः –इति| म्हणून जीव अहंकारी कर्ता. ईश्वर निरहंकारी नियंता. ब्रह्म सम, निर्गुण, निर्विकारी, निर्दोष व चराचरास व्यापून उत्पत्ती स्थिती व लय ह्यांनीही विचलित न होणारे आहे. म्हणूच भगवंतांनी भगवद्गीतेतल्या पांचव्या अध्यायांत १९ व्या श्लोकांत ब्रह्माचे वर्णन व त्याच्या प्राप्तीचा मार्ग सांगितला आहे. भगवान् श्रीकृष्ण म्हणतात,

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः।

निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः॥५. १९॥

ज्यांनी आपले मन समावस्थेत स्थिर केले आहे त्यांनी इहलोकीच जन्म मृत्यूचा खेळ संपवलेला असतो. कारण ब्रह्म हे एकच निर्दोष असून सर्वत्र सम आहे. त्यामुळे ते त्या निर्दोष व सम ब्रह्माशी एकरूप झालेले असतात. मग जन्म-मृत्यू कुठला? श्रोता ऐकत होता. त्याचा चेहरा आनंदाने व आदराने उजळून निघाला. त्याने पुन्हा पुन्हां आचार्यांच्या पायावर आपले डोके टेकले.

आचार्यांच्या समजाऊन सांगण्याच्या अतुलनीय कौशल्यामुळे बुद्धिमान् लोक अत्यंत श्रद्धेने ऐकत होते. त्यांतच सदानंद नावाचा एक गृहस्थ आला होता. हा आंध्र प्रदेशांतल्या “अहोबील” या गावांतून आला होता. सदानंदाने आपल्या मामाच्या मार्गदर्शनाखाली वेदाध्ययन व इतर शास्त्रकलांचा अभ्यास केला होता. सदानंदाचे आई-वडील सदानंद लहान असतानांच पंचत्व पावले होते. त्यामुळे मामाने त्याचा सांभाळ केला होता. मामा अत्यंत कर्मठ होता. कर्मकांड म्हणजेच सर्वस्व असे त्याचे मत होते. त्यामुळे त्याने सदनंदाला तेच वळण लावले होते. अहोबील येथे एक लक्ष्मीनृसिंहाचे सुरेख मंदिर आहे. सदानंदाचे आई-वडील

अहोबील मध्ये असलेल्या त्याच “लक्ष्मीनृसिंहाचे” भक्त होते. दोघेही नित्य त्या लक्ष्मीनृसिंहाची उपासना मनोभावे करीत असत. सदानंदाची प्राप्ती ही आपल्यावरील लक्ष्मीनृसिंहाची कृपाच असल्याचे ते मानत असत. त्यामुळे सदनंदालाही लक्ष्मीनृसिंहाची भक्ती उत्पन्न झाली. वेदाध्ययन झाल्यावर तर ती द्विगुणीत झाली. त्यामुळे अत्यंत पवित्राचरणाने सदानंद लक्ष्मीनृसिंहाची पूजा करूं लागला. त्याला कर्मकांड व याज्ञिकी करून द्रव्यार्जानांत रस वाटेना. मामाच्या लक्षात ही गोष्ट आली. म्हणून मामाने सदानंदाला विवाहबंधनात अडकवून टाकायचे ठरवले. मामाने आपल्याच मुलीशी सदानंदाचे मोठ्या थाटात लग्न लाऊन दिले. सदानंदाच्या ते मना विरुद्ध होते. पण मामाच्या हट्टापुढे सदानंदाचे काही चालले नाही. तथापि विवाहा नंतर पत्नी तरी आपल्याला साथ देईल व आपल्या विचारांशी सहमत होऊन भक्तिमार्गात येईल अशी त्याला आशा वाटली. परंतु दुर्दैवाने तिला फक्त विलासी जीवनाची आवड होती. त्यामुळे सदानंदाने निरर्थक वेळ न घालवता आपल्या पित्याप्रमाणे याज्ञिकी करून अमाप द्रव्य मिळवावे असेच तिला वाटत असे. ती सदानंदाला वारंवार तसा सल्ला देऊ लागली. सदानंदमात्र सतत आत्मचिंतनात व वेदांमधल्या महावाक्यांचा विचार व त्यांचाच अभ्यास ह्यात मग्न असे. परब्रह्म म्हणजे काय? अंतिम सत्य नक्की काय? आपण कोण आहोत? इत्यादी अध्यात्मिक विचार सतत त्याच्या मनात रुंजी घालीत असत. त्यामुळे व्यावसायिक गोष्टींकडे त्याचे दुर्लक्ष होऊ लागले. मामा व मामाची मुलगी अत्यंत लालची स्वभावाची होती. त्यांना सदानंदाची तीक्ष्ण व अफाट बुद्धिमत्ता ज्ञात होती. त्यामुळे ती दोघे त्याला व्यवसायासाठी यज्ञकर्म नीट आत्मसात करून घेण्याचा आग्रह करू लागली. शेवटी कंटाळून सदानंदाने आपल्याला अध्यात्ममार्गात जावयाचे असल्याने ते शक्य होणार नाही. असे सांगितले. पुढे हे ही सांगून टाकले कीं आपले वडिलोपार्जीत उत्पन्न भरपूर

असल्यामुळे संसाराला इतर द्रव्यार्जनाची आवश्यकता नाही. मामा व सदानंदाची पत्नी यांना ते अजिबात पटले नाही. दोघांनी मिळून त्याला “ह्या मार्गाने जर तुला जीवन व्यतीत करावयाचे असेल तर वडिलोपार्जित धनापैकी तुला काहीही मिळणार नाही. ” अशी धमकी दिली! ब्रह्मज्ञानप्राप्तीची तीव्र इच्छा असलेल्या सदानंदाला ती धमकी म्हणजे इष्टापत्तीच वाटली. त्याला संपत्तीचा मोह नव्हताच. तो मनातूनच विरक्त झालेला होता. त्यामुळे त्याने गृहत्यागाचा निर्णय घेतला. सदानंदाचा हा निर्णय मामाने व मामाच्या मुलीने आनंदाने मान्य केला. सदानंद त्याच क्षणी शांतपणे घराबाहेर पडला. घराबाहेर पडताना कोठें जावयाचे ह्याचा त्याने विचार केला नव्हता. फक्त लक्ष्मीनृसिंहाचे स्मरण करून तो बाहेर पडला होता. त्याच स्मरणांत तो प्रयागला आला. आपल्याला ज्ञानमार्ग कोण दाखवणार? ह्या विचारत तो गर्क झाला. त्यावेळी सदानंदाला गंगेच्या पलीकडे असलेल्या झुत्सी गांवी असलेल्या प्रभाकराचार्यांची आठवण झाली. प्रभाकाराचार्य हे त्याकाळांतले एक श्रेष्ठ मीमांसक होते. सदानंदाच्या मामांचे ते गुरु होते. सदानंद त्यांच्याकडे आला. परंतु सदानंदाची इथेही घोर निराशाच झाली. प्रभाकराचार्यांनी त्याला ज्ञानमार्ग अत्यंत कठीण असून कर्ममार्ग अत्यंत सोपा असून ऐश्वर्य प्राप्ती करून देणारा आहे. त्यामुळे तूं कर्ममार्गी हो. हे ऐकून निराश झालेला सदानंद परत प्रयागक्षेत्री आला. प्रयागला त्याने शंकराचार्यांची कीर्ती ऐकली. त्यामुळे शंकराचार्यांना शरण जाण्याच्या हेतूनेच तो काशीला आला.

आचार्यांची बरीच प्रवचने त्याने श्रवण केली होती. अनेक श्रोत्यांनी विचारलेल्या महावाक्यांच्या प्रश्नावरील आचार्यांचे नेमकेपणे केलेले विवेचन ह्या सर्व गोष्टींचा विचार सदानंदाने केला. त्यानें आचार्यांना शरण जाण्याचा निर्धार केला. पण हे घडावे कसें? म्हणून तो विष्णुशर्म्यास भेटला. त्याच्यासह आचार्यांची सेवा करू लागला. सदानंदावर आचार्यांचे लक्ष होतेच. आचार्यांच्या अस्खलित

प्रवचनांनी सदानंद अहोरात्र त्याच चिंतनात मग्न होऊ लागला. सदानंद पूर्ण विरक्त झाला होता. त्याला संन्यास ग्रहण करण्याची तीव्र इच्छा झाली. त्याची अशी दृढ भावना होती कीं आचार्य सर्वकाही जाणतात. त्यांना आपली विरक्ती समजणारच. आपल्याला त्यांच्याकडून संन्यास दीक्षा मिळावी असे त्याला सारखे वाटत होते. माझी जर खरोखरच मला वाटते तशी योग्यता झाली असेल तर ते आपण होऊनच मला दीक्षा देतील आणि एक दिवस तसेच घडले.

एकदा गंगा किनारी आचार्य प्रवचनाला आले. पण त्यांना विष्णुशर्म्याबरोबर सदानंद आलेला दिसला नाही. त्यावेळी सदानंद पैलतीरी होता. आचार्यांनी तेथूनच सदानंदाला हांक मारली. ती हांक ऐकतांच देहभान हरपून आचार्यांच्या दिशेने धांवत सुटला. त्याला नदीचेही भान राहिले नाही. किनारा संपून जेंव्हा त्याची पावले नदीच्या पाण्यावर पडू लागली तशी प्रत्येक पावलाखाली कमल उत्पन्न होऊ लागले. देहभान हरपलेल्या अवस्थेत तो आचार्यांच्या चरणी आला. अशा तीव्र गुरुभक्तीचे फळ त्याला मिळाल्या शिवाय कसें राहील? आचार्यांनी त्याला संन्यासदीक्षा दिली. त्याचे नाव पद्मपाद ठेवले. पद्मपाद कृतकृत्य झाला. आचार्यांच्या शिष्यवर्गात पद्मपाद विशेष शोभून दिसू लागला. विष्णुशर्मा व पद्मपाद दोघेही आचार्यांची मनोभावे सेवा करीत होते. त्यांत जराही अंतर पडू देत नव्हते. विष्णुशर्मा व पद्मपाद आपल्या सद्गुरुंच्या सदैव पाठीमागे थोडे अंतर ठेवून चालत असत. चालताना आचार्यांच्या चरणावर त्यांचे लक्ष असे व मन आचार्यांच्या शिकवणीत तल्लीनतेने चिंतनात मग्न असे. त्या दोघांमध्ये अनेक वेळा संवादही होत असत. त्यांच्या संवादात एकदां वर्णाश्रमधर्म या विषयावर चर्चा चालली होती. त्यावेळी विष्णुशर्मा म्हणाला, आचार्य चातुर्वर्ण्य जरी मानत असले तरी त्यांची शिकवण जनमानसांत सध्या प्रचलित असलेली जाती वर्चस्वाची कल्पना नष्ट करणारी आहे. पद्मपाद आनंदाने म्हणाले “हो खरेच आहे ते. आपल्या स्वामींचे

व्यवहारांत जे वागणे दिसते त्यांत ते कुणालाच कधी तुच्छ समजत नाहीत. मग भले तो शूद्र जरी असला तरी. कारण चातुर्वर्ण्य हा केवळ व्यवहार व सामुहिक जीवन सुखावह व्हावे म्हणून अस्तित्वात आल्याचे त्यांनी अनेकवेळा आपल्या प्रवचनातून प्रतिपादन केलेले आहे. व्यक्तिगत साधनेतच जे काय स्पर्श-अस्पर्शाचे नियम आहेत तेवढेच. असे तर स्वामी नेहमीच सांगत असतात. " हे ऐकून विष्णुशर्मा म्हणाले, " मला स्वत:ला शास्त्रांत "अस्पृश्य" ही संकल्पना कुठेच आढळली नाही. पण आध्यात्मिक उन्नतीसाठी व्यक्तिगत शुचिता व चित्तशुद्धी ह्यांचे बरेच नियम आढळले आहेत. ते कर्मकांडांत सकाम भक्तीत विशेषत्वाने पाळावे लागतात. त्यांत जराही तडजोड चालत नाही. " अशा प्रकारचे स्पृश्यास्पृश्यते बाबत त्यांचे बोलणे चालू होते. त्यांत विष्णुशर्म्यांनी पद्मपादाचार्यांना सहज विचारले, "आपल्याला काय वाटते? ही स्पृश्यास्पृश्यता आपल्या वैदिक परंपरेत कशी काय रूढ झाली असेल?" पद्मपादाचार्य अत्यंत गंभीरपणे म्हणाले, "आपले दुर्दैव! फार पुरातनकाळी बौद्ध अवतारानंतर अनेक बुद्ध अनुयायी निर्माण झाले. ते आपला पंथ म्हणजे आपला वेगळा धर्मच समजू लागले. स्वत:ला बौद्धधर्मीय म्हणवू लागले. त्यांनी चातुर्वर्ण्याला तिलांजली दिली. तथापि अहिंसेचे स्तोम असे काही माजवले कीं खाटिक जमात ही हिंसा करणारी म्हणून त्यांनी खाटिक वर्ग, मांस व चर्म इत्यादींचा व्यवसाय करणाऱ्यांस "अस्पृश्य" ठरवून त्यांच्याशी व्यवहार बंद केला. पुढे जेंव्हा वैश्य व शूद्र वर्गाचे लोक बौद्ध पंथात प्रचंडसंख्येने सामील होऊ लागले तेंव्हा मोठेच राजकारण झाले. राजाश्रयाने ह्या अस्पृश्य वर्गाची वसाहत ग्रामाबाहेर काढण्यात आली. राजाश्रयाने समाजात एखादी रूढी एकदा पडली कीं मग ती समाजात मूळ धरते. त्या रूढीचे रुपांतर नियमात होते. ज्या काळात बौद्ध व जैन आचार्यांचे वर्चस्व राजसत्तेवर अमात्याच्या स्वरूपांत निर्माण झाले व राजा त्यांच्या तंत्राने राजसत्ता वापरून सामाजिक

व्यवस्था जारी करू लागले. पुढे पुढे राजसत्तेवर बुद्ध आचार्यांचे वर्चस्व वाढत गेल्यावर त्यांनी आपल्या पंथाचे "धर्मा"त रुपांतर करून घेतले. धर्मांतर करणाऱ्यांना समान दर्जाचे प्रलोभन निर्माण करून धर्मांतर घडवून आणू लागले. मनुने "नास्ति पंच्मोवर्ण:" म्हणजे चारवर्णाखेरीज पांचवा वर्ण नाही असेच सांगितलेले आहे. स्वामींनीही प्रवचनात ह्यावर विवेचन केले आहे. पण बौद्ध पंथाला धर्माचे स्वरूप प्राप्त झाल्यावर खाटिक व हिंसक जे ग्रामाबाहेर काढले गेले ते कायमचेच. त्याचा परिणाम सर्व समाजावर होणे अपरिहार्य होते. त्यातून एकदा का राजमान्यता प्राप्त झाली कीं ज्या पिढीपासून ती प्रथा पडते ती परंपरेने पिढ्यानपिढ्या तशीच चालू राहते. त्याचा हा परिणाम आहे. " त्यांचा हा संवाद अधिकही चालला असता पण तेवढ्यातच आचार्यांच्यापुढे असलेल्या काही शिष्यांच्या गडबडीमुळे तो थांबला. आचार्यांच्यापुढें असलेल्या शिष्यांच्या मार्गात एक चांडाळ आपल्या चार कुत्र्यांसह डोक्यावर दारूचे मडके घेऊन येत होता. त्याचे कपडे अत्यंत मलीन व फाटके होते. त्याच्या बरोबर त्याची दोन बालके होती. त्यामुळे आचार्यांच्यापुढें चालणारे शिष्य त्याच्या अंगावर ओरडले, " दूर हो! आम्हाला वाट दे! रस्ता सोडून मार्गातून तूं दूर हों!" त्यावेळी चांडाळ त्यांना म्हणाला,

"अन्नमयादअन्नमयं अथवा चैतन्यमेव चैतन्यात् |
द्विजवर दूरीकर्तुं वाञ्छसि किं ब्रूहि गच्छगच्छेति ||"

"हे श्रेष्ठ ब्राह्मणहो, मला सांगा तुम्ही कशापासून काय दूर करूं इच्छित आहात? एकाच परब्रह्माच्या अन्नमय कोशापासून दुसरा अन्नमय कोश दूर करूं इच्छिता कीं एका चैतन्यमय कोशापासून दुसरा चैतन्यमय कोश दूर करू इच्छित आहात? कारण मी सुद्धा तुमच्या सारखाच ब्रह्म आहे. माझे शरीरही तुमच्या सारखे अन्नमय कोशापासूनच झालेले आहे!"

त्या अंत्यजाचे हे आकस्मिक व वेगळे उत्तर ऐकून भांबावलेले शिष्य क्षणांतच थबकून आचार्यांच्या मुखाकडे पाहू लागले. अपरिपक्वतेमुळें ते असहाय्य मुद्रेनें आचार्यांच्या मदतीची अपेक्षा करूं लागले. इतक्यांत धीरगंभीर पावले टाकीत आचार्य पुढे आले. पिढ्यानपिढ्या चालत आलेल्या संस्काराच्या प्रभावाने हे घडत असल्याचे आचार्य जाणत होते. आचार्य अत्यंत मृदू व मधुर शब्दांत म्हणाले,

**"सत्यमेव भवता यदिदानीं प्रत्यवादि तनुभृत् प्रवरैतत् ।**

**अन्त्योजोऽयमिति संप्रतिबुद्धिं संत्याजामि वचसात्मविदस्ते ॥**

हे श्रेष्ठ पुरुषा तूं म्हणतोस ते अगदी सत्य आहे. आत्मज्ञान झालेल्या तुझ्या बोलण्यावरून हा "अंत्यज" आहे अशी भेदबुद्धी मी सोडून देईन.

आचार्यांची ही प्रतिक्रिया सर्व शिष्यांना परम आश्चर्यकारक वाटली. पद्मपादांनी अत्यंत गंभीरपणे विष्णुशर्म्याकडे पाहिले. विष्णुशर्मा मनोमन समजले कीं, नुकत्याच झालेल्या संभाषणाचे हे प्रत्यंतरच स्वामींनी दिले आहे. विष्णुशर्म्यांच्या मनांतला संदेह नाहीसा झाला. एक अनामिक दडपण नाहीसे झाले. मन क्षणातच मोकळे झाले.

प्रकरण ७ वे

# श्रीवेदव्यासांची भेट व आशिर्वाद

आचार्यांच्या काशी क्षेत्रातील वास्तव्याला चार वर्षे पूर्ण होत आली. त्यांची प्रवचने ऐकण्यासाठी दूरदूरहून अत्यंत विद्वान मंडळी येऊ लागली होती. त्याचे मुख्य कारण आचार्य प्रवचना नंतर श्रोत्यांच्या शंकांचे निरसन करीत असत. असेच एकदा आचार्यांनी “तदन्तर प्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः प्रश्ननिरुपणाभ्याम्” ह्या सूत्रावर आपल्या प्रवचनात विवेचन केले. मृत्यूनंतर जीव देह सोडून जातो तेंव्हां काय होते? जीवात्मा पंचमहाभूतांसह अत्यंत सूक्ष्म रूपाने एक शरीर सोडून दुसऱ्या शरीरांत प्रवेश करतो असे छांदोग्य उपनिषदांत सांगितले आहे. आचार्यांनी हे समजून सांगताना सूक्ष्मदेह पंचमहाभूतांचाच असल्याचे प्रतिपादन केले. त्याचे कारणही सांगितले. देह सोडताना जीव अपूर्ण राहिलेल्या वासनांमुळे पुन्हां जन्म घेतो. त्यासाठी सूक्ष्मदेह अथवा लिंग देह धारण करतो.

हे प्रवचन संपल्यावर अनेक जिज्ञासूंनी आचार्यांना आपल्या शंका विचारून स्वत:चे समाधान करून घेतले. सगळ्यांच्या शंका विचारून झाल्यावर एक वृद्ध ब्राह्मण आचार्यांशी बोलू लागला. त्याने आचार्यांना आपली शंका विचारली कीं “पंचमहाभूते चराचरांत भरलेली आहेत हे खरे आहे कां?” आचार्य “हो!” म्हणाले. तेंव्हा तो वृद्ध ब्राह्मण मिस्कील हसत म्हणाला, “मग लिंगदेह व जडदेह दोन्ही पंचमहाभूतांचे असताना लिंगदेह जाताना कां दिसत नाही? हे एक व दुसरे म्हणजे देह सोडताना लिंगदेह धारण करण्याची आवश्यकता काय? विश्वांत जर सर्वत्र पंचमहाभूते व्यापलेली आहेत तर ती कुठेही मिळू शकतात. मग देह सोडताना लिंग

देह धारण कां करायचा? तो नंतर नाही कां धारण करता येणार? त्यामुळे आपण माझ्या ह्या शंकेचे निरसन केल्यास बरे होईल. ” ह्या प्रश्नामुळे इतरही विद्वानांचे लक्ष वेधले गेले. आचार्यांच्या लक्षात आले कीं ह्या वृद्धाचा हा प्रश्न दिसतो तितका साधा नाही. ह्यांत खूपच गुंतागुंत आहे. ह्या गृहस्थाचा अभ्यासही तसाच असणार. त्यामुळे ह्या गृहस्थाला आधी कोणत्या ना कोणत्यातरी तत्त्वाशी बांधून घेणे गरजेचे आहे. म्हणून आचार्य अत्यंत मधुर व मृदू आवाजात म्हणाले, “आपण वेदशास्त्र व श्रुती प्रमाण मानतां कां?” त्यावर ते वृद्ध गृहस्थ “हो!” म्हणाले. त्यावर आचार्य म्हणाले “वेद प्रणित महावाक्ये आपणास मान्य आहेत कां?” वृद्ध गृहस्थ “हो!” म्हणाला, मग आचार्य म्हणाले, “अहं ब्रह्मास्मि” हे महावाक्य जर प्रमाण मानले तर ब्रह्म व आपण वेगळे राहतो कां?” आचार्यांच्या प्रश्नावर अत्यंत सखोल विवेचन करून ते वृद्ध गृहस्थ म्हणाले, “जीवाने ती परब्रह्मप्राप्ती करीता करावयाची भावनात्मक धारणा असून देहाच्या भौतिक व्यापाराचाक्षय करण्यासाठी सर्व शरीरभर रुजवायची असते. ब्रह्मभाव जागा ठेवण्यासाठी युक्तियुक्तीने त्या वाक्याचा उपयोग केवळ वैचारिक व अध्यात्मिक पातळीवर करावयाचा असतो. त्यामुळें जीवदशा प्राप्त झालेल्या जीवाला परब्रह्म प्राप्तीचा मार्ग सांपडतो. ” आचार्यांना नेमके तेच हवे होते. आचार्य म्हणाले, “म्हणजे परब्रह्म व जीवदशा यांचे वेगळेपण आपणही मान्य करता आहात!” ह्यावर त्या वृद्ध गृहस्थाला “हो!” म्हणण्या खेरीज गत्यंतरच नव्हते.

त्यावर आचार्य म्हणाले, “जर परब्रह्माच्या शुद्ध चैतन्यापासून जीवदशा चैतन्यमय असूनही आपणास वेगळी असल्याचे जाणवते तर शुद्धस्वरूपी व अतिसूक्ष्म अशा पंचमहाभूतांचे जीवदशात्मक सूक्ष्मशरीर अथवा लिंगदेह कां बरे मान्य नाही? वृद्ध तत्काळ म्हणाला, “कारण एका परब्रह्मापासूनच पंचमहाभूते

अवक्रांत झालेली आहेत म्हणून!" ह्यावर आचार्य म्हणाले, " मूलतत्त्वाची पंचमहाभूते व जीवदशेतील पंचमहाभूते ह्यात आपण फरक मानता कां?" वृद्ध गृहस्थ म्हणाले, "फरक तर जरूर मानतो. पण तो फरक जीवदशेनें त्याचा अंगीकार केल्या खेरीज मानता येत नाही. म्हणून पंचमहाभूते जडदेह सोडताना अंगिकारण्याची काय आवश्यकता आहे? जीवाला ती नंतरही प्राप्त करता येणार नाहीत कां?" आचार्य म्हणाले, "नाही! कारण जीवदशा जडदेहाच्या माध्यमांतून जडपंचमहाभूतांसह सूक्ष्म वासनादेहाच्या प्राण नामक माध्यमातून भोगवली जाते. जडदेह पडतो त्यावेळी एकच प्राण पांच ठिकाणी जसा विभागलेला असतो तसाच तो देहा बाहेर पडतो. त्याचे हे पंचमहाभूतात्मक सूक्ष्म रूप चर्मचक्षुंना गोचर होणारे नसते. त्याचे हे पंचमहाभूतात्मक सूक्ष्म रूप चार्मचक्षुंना गोचर होणारे नसते. तसेच सूक्ष्मदेह मन, बुद्धी, श्रोत्र, चक्षु, रसनेन्द्रीय व स्पर्शेन्द्रीय यांना घेऊनच बाहेर पडतो. फुलांतील सुगंध जसा वायुबरोबर जातो पण चर्मचक्षुंना दिसत नाही त्याच प्रकारे वायू ह्या सर्व इंद्रियसमुहासह सूक्ष्मदेहाने म्हणजेच लिंगदेहाने बाहेर पडतो. याला उपनिषदांचे प्रमाण आहे.

इन्द्रियाणि संयाति सम्यग् याति गच्छति |

किम् इति आह वायुः पवनो गन्धान् इव आशयात् पुष्पादेः ||

भगवद्गीतेत हे

**"शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वर: |**

**गृहित्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ||१५. ८||"**

"यदा च पूर्वास्मात् शरीरान्तरम् अवाप्नोति तदा गृहीत्वा एतानि मन:षष्ठानि असे अगदी स्पष्ट सांगितलेले आहे. त्यामुळे जीवाला नवीन शरीर मिळण्यासाठी सूक्ष्मदेह प्राप्त होतो. प्रत्यक्षांत त्याला धारणा करण्याची गरजच नसते तर ती एक स्वाभाविक अव्यक्त अथवा प्रधान तत्त्वातून घडणारी घटना असते.

ह्यावर वृद्ध गृहस्थ अत्यंत विनयाने म्हणाले, " पण जगाच्या पूर्वस्थितीलाच सांख्यमतवादी 'प्रधान' असे म्हणतात. ह्यावर आपण काय म्हणता?" आचार्य म्हणाले, "म्हणजे जगाच्या उत्पत्ती पूर्वीची स्थिती आपण स्वतंत्र मानता कीं काय?" ह्यावर ते वृद्ध गृहस्थ म्हणाले, "आपण सूक्ष्मशरीराबद्दल बोलत आहोत. आतां शरीर म्हटले म्हणजे ते व्यक्तच असले पाहिजे. आपण अव्यक्ताला शरीर असे कसे संबोधता? माझी आपली ही एक शंका आहे. दुसरे असे कीं प्रधान हे जगाचे कारण आहे असे सांख्यमतवादी मानतात. म्हणजे जगाच्या उत्पत्तीपूर्वीची स्थिती स्वतंत्र मानावी लागेल!"

ह्यावर आचार्य अत्यंत प्रभावी भाषेत व ठामपणे सांगू लागले, "इथें अव्यक्त ह्या शब्दाने सूक्ष्म असे "कारणशरीर" सुचवलेले आहे. ते सूक्ष्म पंचमहाभूतांपासून निर्माण होते म्हणूनच त्याला अव्यक्त म्हटले आहे. आपला वेदाचा गाढा अभ्यास आहे म्हणून इथें मुद्दाम उल्लेख करतो कीं, "ऋग्वेद संहितेत ९:४:६४ 'गोभि: श्रीणीत मत्सरम्' असे म्हटले आहे. ह्याचा अर्थ शब्दश: घेतला तर "गाय सोमरसात कालवा" असा होईल. पण तो तसा शिष्टसंमत नाही. इथें कारणासाठी वापरावयाचा शब्द कार्यासाठी वापरला आहे. म्हणून "सोमांत गाय" न कालवता गोरसच कळवला जातो. गोरस म्हणजे दूध हाच अर्थ घेतला जातो. अव्यक्त हा शब्द सूक्ष्म पंचभौतिक शरीरास वापरला आहे तो ह्याच अनुषंगाने घ्यावा लागेल. दुसरे आपण म्हणता कीं जगाच्या उत्पत्ती पूर्वीची स्थिती स्वतंत्र मानावी लागेल. पण तसे मानले

तर “पुरुषान्न परं किञ्चित्” ह्या श्रुती वचनाला बाधा येते. त्यामुळे जगाच्या उत्पत्ती पूर्वीची स्थिती स्वतंत्र मानता येत नाही. मूळस्थितीच्या पर काहीच नाही मग स्वतंत्रता कशी राहील? त्यामुळे मूळस्थिती अथवा पुरुष ह्यापासून उत्पन्न झालेल्या “बीजरूप शक्तीला” अविद्या अथवा अव्यक्त असे संबोधले जाते. मुक्त झालेला साधक पुन्हां जन्मास येत नाही. कारण ज्ञानामुळे अविद्येचा नाश झालेला असतो. म्हणजेच अव्यक्ताच नाश झालेला असतो. हे अव्यक्त परमेश्वराच्याच आश्रयावर राहाते. ‘माया’ हे तिचे स्वरूप आहे. अविद्येच्या सृष्टीत आवरण व विक्षेप ह्या दोन शक्ती कार्यान्वित असतात. आवरण शक्तीने मोह निर्माण होतो व विक्षेप शक्तीने मूळस्वरूपाचा विसर पडून भेदबुद्धीने प्रपंच निर्माण होतो. तिच्यातच सर्व संसारी जीव आपल्या स्वरुपाची ओळख न होण्यामुळे अज्ञानाने राहतात. ह्या मायेला अविद्या, अव्यक्त इत्यादी नावांनी ओळखले जाते. असे अव्यक्त व त्याचे कार्य जे शरीर ह्यांच्या ऐक्याची कल्पना करता येते. शरीर हे दोन प्रकारचे आहे. एक स्थूल व दुसरे सूक्ष्म. स्थूल शरीर सर्वांना दिसते. सूक्ष्म दिसू शकत नाही. ते सूक्ष्म शरीर ह्या ठिकाणी सांगावयाचे आहे. ”

आचार्य व वृद्ध गृहस्थ ह्यांचा हा संवाद सर्व सभा मुग्ध होऊन ऐकत होती. वृद्ध गृहस्थ वेदाचा गाढा पंडित होता व त्याच्या प्रत्येक शंकेचे निरसन आचार्य आपल्या प्रभावी भाषेत करीत होते. त्या गृहस्थाच्या शंका काही संपत नव्हत्या. संवाद रंगतच होता. पद्मपाद विस्मय चकित झाले. आजपर्यंत इतकावेळ इतक्या शंका विचारणारा हा ब्राह्मण कोणीतरी अलौकिक असला पाहिजे. त्याच्या डोळ्यातली चमक व तेज पाहून पद्मपादांनी अंतर्ज्ञानाने त्यांचे खरे स्वरूप जाणून घेतले. तेंव्हा त्यांच्या लक्षात आले कीं हा न संपणारा वाद आहे. कारण प्रश्न विचारणारे साक्षात्

भगवान् वेद व्यासमुनी आहेत व उत्तर देणारे साक्षात् भगवान् शिवशंकर आहेत. हे लक्षात येताच पद्मपाद अत्यंत चतुराईने म्हणाले,

**"शंकर:शंकर: साक्षात् व्यासो नारायण: स्वयम् |**

**तयोर्विवादे संप्राप्ते किंकर: किं करोम्यहम् ||"**

**"शंकराचार्य म्हणजे** प्रत्यक्ष शंकरच आहेत आणि प्रश्न विचारणारे प्रत्यक्ष वेदव्यास म्हणजे साक्षात् विष्णूच आहेत. अशा दोघांचा वाद सुरु झाल्यावर माझ्यासारख्या दोघांच्या सेवकाने काय बरे करावे?"

पद्मपादांच्या उद्गारांचा गर्भितार्थ आचार्यांनी जाणला. आचार्य पटकन उभे राहिले व त्या वृद्ध ब्राह्मणाच्या पाया पडले. आचार्यांचा हा विनय व कुशाग्र बुद्धी पाहून त्या वृद्ध ब्राह्मणाने आपले खरे रूप प्रकट केले. महर्षि वेदव्यास प्रकट झाले. त्यांनी आचार्य, त्यांचे शिष्य व इतरांनाही आशिर्वाद दिले व झटकन निघूनही गेले. ह्या प्रसंगा नंतर थोड्या दिवसांतच आचार्यांनी आपले "ब्रह्मसूत्रावरचे" भाष्य पूर्ण केले.

प्रकरण ८ वे

# प्रस्थान त्रयीच्या भाष्याला गुरुंचा आशिर्वाद

आचार्यांचे प्रस्थानत्रयीवरचे भाष्य लेखन पूर्ण झाल्यावर आचार्यांना ते भाष्य आपल्या गुरुंना दाखवण्याची इच्छा झाली. सद्गुरूंचा आशिर्वाद घेतल्या खेरीज आचार्यांना चैन पडणार नव्हते. त्यांना माहिती मिळाली कीं गुरु गोविंदयती बद्रीकाश्रमांत गुरु गौडपादाचार्यांकडे गेले आहेत. आचार्य त्वरित निघाले. विष्णुशर्मा व पद्मपाद त्यांच्याबरोबर निघाले. इतरही अनेक शिष्य त्यांच्या समवेत निघाले. आचार्यांचे हे शिष्यवैभव अपूर्व होते. आचार्य त्या सर्व वैराग्यशील समुदायांत सूर्यासारखे तेजस्वी दिसत होते. अत्यंत गोड, मृदू व हसरा चेहरा. कपाळावर शूर्पाकृती आडवे भस्माचे पट्टे. तेजस्वी डोळे, धारदार सरळ नाक, मधुरस्मिताने भरलेली जिवणी, शंखासारखा नितळ उंच पण प्रमाण बद्ध गळा, भरदार धती, रुंद खांदे, भरदार मांड्या, टपोऱ्या प्रमाणबद्ध पोटऱ्या आणि अत्यंत सुंदर पाउले. बुद्धी देवगुरु बृहस्पतींच्या सारखी तल्लख, बोलणे अत्यंत मधुर, वाणी स्पष्ट व सुबोध वाक्यरचना. ह्या सर्व वैभवामुळे व मुसमुसत्या तारुण्यामुळे आचार्यांना पाहून बटू वामन तो हाच कीं काय असा भाव पाहणाऱ्याच्या मनात उत्पन्न होई. मन परम आदराने भरून गेल्याशिवाय राहात नसे. आचार्यांनी अंगावर धारण केलेल्या भगव्या वस्त्रांना अवर्णनीय शोभा प्राप्त होई.

आचार्य, विष्णुशर्मा व पद्मपाद ह्या दोघांनाच घेऊन आपल्या गुरुंच्या दर्शनास जाणार होते. इतर शिष्य मागे थांबणार होते. मजल दर मजल करीत आचार्य बद्रिकाश्रमा जवळ आले. गुरु गोविंदयती व त्यांचे गुरु गौडपादाचार्य दोघेही

आश्रमात होते. आचार्य आपल्या प्रस्थानत्रयीवर केलेल्या भाष्यासह त्यांच्या समोर आले. त्या दोघांच्या दर्शनाने आचार्य भारावले गेले. साश्रुनेत्रांनी आचार्यांनी गुरु गोविंद व गुरुगौडपादाचार्य ह्यांना वंदन केले. दोघांनीही यथावकाश प्रस्थानत्रयी वरील आचार्यांनी केलेले भाष्य श्रवण केले. दोघेही आचार्यांच्या ह्या कर्तृत्वावर संतुष्ट झाले. त्या संतुष्टतेत तृप्तता होती. प्रेम होते. आशिर्वाद होता. आपल्या गुरुंच्या संमतीने गुरुगोविंदयतींनी आचार्यांना अद्वैतवादाचा प्रसार करण्याचा आदेश दिला. आचार्यांनी तो शिरोधार्य मानला. मनोमन संपूर्ण आयुष्य अद्वैतवेदान्ताच्या प्रचारांत घालवण्याचा दृढ निश्चय केला. त्याच वेळी गुरु गौडपादाचार्य ह्यांनी आपल्या वैखरी वाणीने जणू त्या निश्चयाला कोंदणात बसवावे तसे आचार्यांना म्हणाले, “ह्या पुढचे सर्व जीवन ह्या प्रसारात घालव!” आचार्यांना धन्यता वाटली. आचार्यांनी केलेल्या “माणिक”रुपी निश्चयाला परात्परगुरूंच्या “सुवर्ण”रुपी शब्दांचे कोंदण प्राप्त झाले. परात्परगुरुंच्या सर्वज्ञतेची मनोमन साक्षच मिळाली. तत्क्षणी आचार्यांना गुरुगौडपादाचार्यांच्या सर्वज्ञतेच्या स्तुतीचे काव्य स्फुरले ते त्यांनी अत्यानंदाने आपल्या मधुर वैखरीवाणीने प्रकट केले.

**“संपूर्ण जगदेव नंदनवनं सर्वेपि कल्पद्रुम:**
**गाङ्गंवारी समस्तवारिनिवहा: पुण्या: समस्ता: क्रिया: |**
**वाच: संकृतप्राकृत: श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी**
**सर्वावस्थितिरस्य वस्तुविषया दृष्टे परब्रह्मणि ||”**

(हे परब्रह्मरुपी सद्गुरो, आपल्या साठी संपूर्ण विश्व म्हणजे एक नंदनवनच आहे. सर्वच वृक्ष आपणास कल्पवृक्षच आहेत. सर्वच जलाशय गंगा आहेत व आपल्या सर्वच क्रिया अत्यंत पवित्र आहेत. आपली भाषा संस्कृत असो कीं प्राकृत असो ती मला वेदासम शिरोधार्य आहे. सर्वभूमी आपणासाठी वाराणसीच आहे कारण आपण चराचरासह ब्रह्मभावांत रहाता.) ह्यावर गृरू गौडपादाचार्यांनी आपला

वरदहस्त आचार्यांच्या मस्तकावर ठेवला. त्यांनी जणू प्रसन्नतेने त्या स्तुतीचा स्वीकारच केला.

गुरु गौडपादाचार्यांचा आश्रम खूपच उंचावर होता. समुद्रसपाटी पासून जवळ जवळ १०२०० फूट इतका उंच असल्यामुळें खूपच थंड. त्यातून तो हिमालय. गुरु गोविंद आपल्या गुरूंची सर्वतोपरी सेवा करीतच होते. पण गुरु गोविंदांना आपल्या गुरूंना इतक्या थंडीतही गार पाण्याने स्नाना करावे लागते ह्याचे वाईट वाटे. गुरुभक्त आचार्यांच्या हे सहज लक्षांत आले. आचार्यांनी आपले शास्त्र व कला यांचा वापर केला. बारकाईने त्यांनी शोध घेतला. एके ठिकाणी त्यांना गरम पाण्याच्या झऱ्याची लक्षणे दिसली. आचार्यांनी परिश्रम करून तेथे खणायला प्रारंभ केला. त्यांच्या प्रयत्नाला यश आले. गरमपाण्याचा झरा चोवीसतास वाहू लागला. त्याकाळापासून तो झरा आजही तेथें वाहात आहे. गुरु गोविंदांना धन्यता वाटली. दोन्ही यतींच्या स्नानाने तो झरा पावन झाला. त्या पावन झालेल्या झऱ्यातच नंतर आचार्य, विष्णुशर्मा व पद्मपाद यांनी स्नान केले. आचार्य आपल्या गुरूंचा व परात्परगुरूंचा आशिर्वाद घेऊन तेथून निघाले.

प्रकरण ९ वे

# कैलास पर्वताकडे गमन व शिव दर्शन

विष्णुशर्मा व पद्मपाद यांच्यासह आचार्य गुरुंच्या आश्रमातून अत्यंत जड अंत:करणाने निघाले. आचार्यांनी कैलासपर्वताकडे जाण्याचा निश्चय केला. प्रवास अत्यंत खडतर होता. प्रचंड गारठा. पण आचार्यांना कैलासाचा ध्यास लागला होता. त्यामुळे ह्या व असल्या कोणत्याच गोष्टींची तमा न बाळगता ते कैलास पर्वताजवळ आले. अनेक वृक्षांची गर्दी तिथे होती. शोधक नजरेने आचार्य सर्व काही पाहात होते. इतक्यात त्यांची नजर एका वटवृक्षाकडे गेली. जरा विश्रांती घ्यावी ह्या विचाराने आचार्य त्या वटवृक्षाकडे निघाले. झाडाझुडुपातून वाट काढीत आचार्य जेंव्हा पुढे आले तेंव्हां तो वटवृक्ष पूर्णपणे त्यांच्या दृष्टीपथात आला. त्या वटवृक्षाच्या पायथ्याशी असलेल्या पारासारख्या उंचीवर आचार्यांना एक महान् आश्चर्य दिसले. त्या वृक्षाखाली अनेक वृद्ध शिष्यांना घेऊन एक अत्यंत तेजस्वी तरुण गुरु बसलेले आहेत. त्या वृद्ध शिष्यांत गुरुगौडपादाचार्य व त्यांचे गुरु श्रीशुकमुनी हे ही बसलेले आहेत. आतां हे स्वप्न म्हणावे कीं जागृती? हे आचार्यांना समजेना! पण त्याच अवस्थेत त्यांच्या कडून स्तोत्र गाईले जाऊ लागले.

विश्वं दर्पणदृश्यमाननगरी तुल्यं निजान्तर्गतं |
पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया ||
यत् साक्षात्कुरूते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वयम् |
तस्मै श्रीगुरूमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये || १ ||

निद्रेत असताना स्वप्नात भासणाऱ्या पदार्थांप्रमाणे हे सर्व विश्व आरशासारखे आत्मस्वरूपाच्या ठिकाणीच प्रतिबिंबित झालेले असते. मायेच्या अज्ञानस्वरूपी द्वैतभाव उत्पन्न होण्यामुळे ते वेगळे वाटते खरे पण गुरुकृपेने जेंव्हा आत्मज्ञान प्राप्त होते तेंव्हा त्या निद्रेतून आलेल्या जागृतीमुळे ज्यांच्या कृपेमुळे ते नाहीसे होते त्या परमात्मस्वरूपी श्री दक्षिणामूर्तीला मी नमस्कार करतो ||१||

अशी सुरुवात करून आचार्यांनी समारोपाच्या ११ व्या श्लोकात म्हटले,

वटविटपि समीपे भूमिभागे निषण्णं ।

सकलमुनिजनानां ज्ञानदातारमारात ॥
त्रिभुवनगुरुमीशं दक्षिणामूर्तीदेवं ।

जननमरणदुःखच्छेददक्षं नमामि ॥११॥

सर्व ऋषीमुनींना अगदी सहज ज्ञानदान करणारे, जन्म मरणादी दुःखांचा नाश करण्यात अत्यंत कुशल वटवृक्षातळी बसलेले, त्रैलोक्यगुरु, श्रीदक्षिणामूर्ती देव त्यांना मी नमस्कार करतो. ॥११॥

चित्रं वटतरोर्मूले वृद्धाश्शिष्या गुरुर्युवा ।

गुरोस्तु मौनंव्याख्यानं शिष्यास्तु छिन्नसंशयः ॥

चिदघनाय महेशाय वटमूलनिवासिने |

सच्चिदानन्दरुपाय दक्षिणामूर्तये नमः ||१२ ॥

वटवृक्षाच्या मुळाशी एक मोठे आश्चर्य दिसत आहे. सगळे शिष्य वृद्ध दिसत आहेत आणि गुरु मात्र तरुण दिसत आहेत. विशेष म्हणजे गुरुंच्या मौनरूपी भाषणानेच शिष्यांच्या अंतःकरणातील सर्व संशय आपोआप मावळत आहेत.

वटवृक्षाच्या मूळाशी वास्तव्य करणारे चिन्मय सच्चिदानन्दरुप असे जे दक्षिणामूर्ति भगवान शंकर महेश त्यांना माझा नमस्कार असो. ॥१२॥

आचार्यांनी देहभान हरपून त्यांच्याकडे पाहायला सुरुवात केली आणि चमत्कार घडला. वृद्ध शिष्य अदृश्य झाले. तरुण गुरूंच्या ठिकाणी आचार्यांना भगवान् शिवशंकर दिसू लागले. मदनाला जाळणारा भगवान् शिव. मस्तकावर जटा, त्यातून प्रवाही होणारी गंगा. मस्तकी विराजणारा चंद्र. नीलकण्ठाभोवती क्रीडा करणारे ते सर्प. भव्य कपाळावर लखलखणारे भस्माचे त्रिपुंड्र. तेजस्वी पाणीदार डोळे. सरळ नासिका, स्मितहास्य असलेली जिवणी. गजचर्म पांघरलेले. भव्य देह. तेजस्वी कर्पूरगौर कांती. संपूर्ण मर्दानी सौंदर्य एकवटले असल्याची साक्ष दाखवणारा भगवान् शिवाचा तेजस्वी चेहरा आचार्य अनिमिष नेत्रांनी पाहात होते. भगवान् शिवांनी त्यांना समीप येण्याची खूण केली. आचार्य शिवाच्या समीप आले. आचार्यांना त्याक्षणी काय वाटले हे शब्दांच्या पलीकडले आहे. आचार्यांनी साष्टांग दंडवत घातले. हात जोडून प्रार्थना केली, "हे प्रभो! गोविंदयतींनी मला विधिसंन्यास दिला आहे. हे भगवंता, हे त्रिभुवन पालका, हे दयानिधे, आपण मला अध्यात्मसंन्यास देऊन कृतार्थ करावे!" आचार्यांची ती प्रार्थना भगवंताने ऐकली. अत्यंत प्रसन्नतेने भगवान् शिवांनी आचार्यांना अध्यात्मसंन्यास दिला. अध्यात्मसंन्यास मिळताच आचार्यांनी भगवान् शिवाची मानस पूजा केली. आचार्यांची वाणी प्रवाही झाली,

**"रत्नैः कल्पितमासनं हिमजलैः स्नानं च दिव्याम्बरं**
**नानारत्नविभूषितं मृगमदामोदाङ्कितं चन्दनम् ।**
**जातीचम्पकबिल्वपत्ररचितं पुष्पं च धूपं तथा**
**दीपं देव दयानिधे पशुपते हृत्कल्पितं गृह्यताम् ॥१॥**

**सौवर्णे नवरत्नखण्डरचिते पात्रे घृतं पायसं**
**भक्ष्यं पञ्चविधं पयोदधियुतं रम्भाफलं पानकम् ।**
**शाकानामयुतं जलं रुचिकरं कर्पूरखण्डोज्ज्वलं**
**ताम्बूलं मनसा मया विरचितं भक्त्या प्रभो स्वीकुरु ॥२॥**

**छत्रं चामरयोर्युगं व्यजनकं चादर्शकं निर्मलं**
**वीणाभेरिमृदङ्गकाहलकला गीतं च नृत्यं तथा ।**
**साष्टाङ्गं प्रणतिः स्तुतिर्बहुविधा ह्येतत्समस्तं मया**
**सङ्कल्पेन समर्पितं तव विभो पूजां गृहाण प्रभो ॥३॥**

**आत्मा त्वं गिरिजा मतिः सहचराः प्राणाः शरीरं गृहं**
**पूजा ते विषयोपभोगरचना निद्रा समाधिस्थितिः ।**
**सञ्चारः पदयोः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो**
**यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम् ॥४॥**

**करचरणकृतं वाक्कायजं कर्मजं वा**
**श्रवणनयनजं वा मानसं वापराधम् ।**
**विहितमविहितं वा सर्वमेतत्क्षमस्व**
**जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो ॥५॥**

आचार्यांच्या ह्या वैभवी-भावपूर्ण मानसपूजेमुळे भगवान् शिव अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी आचार्यांचा हात आपल्या हातात घेतला व ते आचार्यांसह चालू लागले. देहभान हरपून आचार्य भगवान् शिवां बरोबर चालत होते. कैलास पर्वताच्या पायथ्याशी येताच भगवान् शिव अदृश्य झाले. आचार्य देहभानावर आले. स्वप्न म्हणावे तर स्वप्न नाही, जागृतीतले सत्य म्हणावे तर समोर विष्णुशर्मा व पद्मपाद उभे. आचार्य काही बोलण्यापूर्वीच विष्णुशर्मा म्हणाला, “आपण त्या

वटवृक्षाकडे जाताना अचानक दिसेनासे झालात. म्हणून आम्ही कितीतरी वेळ शोध घेत घेत इथे पर्वताच्या पायथ्याशी आलो. विचार केला आपण नक्कीच इथे भेटाल. झालेही तसेच!” दिक्कालाच्या अतीत असलेल्या व सर्वान्तर्यामी वास करणाऱ्या भगवान् शिवांनी आपल्याला इथे कां आणले याचा आचार्यांना सहजच खुलास झाला. ईश्वराच्या चराचरावरील सत्तेची खूण पटली. म्हणजे स्वप्न म्हणावे तर स्वप्न नाही. सत्य म्हणावे तर सत्य नाही. भास म्हणावा तर सर्वच भास. आचार्यांनी कैलास शिखराला वंदन केले. पुन्हां म्हणाले,

विश्वं दर्पणदृश्यमाननगरी तुल्यं निजान्तर्गतं |

पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया ||

यत् साक्षात्कुरूते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वयम् |

तस्मै श्रीगुरूमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये || १ ||

निद्रेत असताना स्वप्नात भासणाऱ्या पदार्थांप्रमाणे हे सर्व विश्व आरशासारखे आत्मस्वरूपाच्या ठिकाणीच प्रतिबिंबित झालेले असते. मायेच्या अज्ञानस्वरूपी द्वैतभाव उत्पन्न होण्यामुळे ते वेगळे वाटते खरे पण गुरुकृपेने जेंव्हा आत्मज्ञान प्राप्त होते तेंव्हा त्या निद्रेतून आलेल्या जागृतीमुळे ज्यांच्या कृपेमुळे ते नाहीसे होते त्या परमात्मस्वरूपी श्री दक्षिणामूर्तीला मी नमस्कार करतो ||१||

आचार्यांनी केलेल्या स्तुतीचा अन्वय पद्मपादांनी जाणला. त्यांनी तो विष्णुशर्मयाला सांगितला. विष्णुशर्मा आचार्यांच्या बालपणापासून आचार्यांना ओळखत होता. गोकर्ण महाबळेश्वरपासून त्यांची सेवा करीत होता. आजपर्यंत ती सेवा चालूच होती. पण विष्णुशर्म्याचा अद्याप मनाचा निश्चय झाला नव्हता कीं संन्यास घ्यावा कीं नाही. मधूनच त्याला गृहस्थी व्हावे असे वाटत असे. आजमात्र

त्याला आचार्यांच्या चरणावर मस्तक ठेवण्याची इच्छा झाली. सावली सारखा आचार्यांबरोबर असणारा, त्याची सर्वतोपरी सेवा करणारा, पण अद्याप गुरुकृपा प्राप्त न झालेलाच होता. आज त्याला आचार्यांना शरण जावेसे वाटले. त्याने आचार्यांच्या चरणावर आत्मार्पणाच्या भावनेने मस्तक ठेवले. त्याचे अष्टसात्विक भाव जागे झाले. हिमालयातल्या बद्रीकाश्रमांतल्या गारठ्यातही विष्णुशर्म्याच्या मुखावर घर्मबिंदू तरळले. आवाज उमटेना. वाणी सद्गदित झाली. शरीर विवर्ण झाले. अंगावर रोमांच उभे राहिले. गात्रे कंपायमान झाली आणि काही क्षणातच तो तटस्थ झाला. नेत्रांतून वाहाणाऱ्या अश्रूंनी चरणक्षालन झाले. त्या भावसमाधीतून बाहेर येतांच निश्चयाने म्हणाला, “माझ्यासाठी आपणच दक्षिणामूर्ति आहात. आजवर माझ्या मनांत यती कीं पती हे द्वंद्व होते. ते आज संपलेले आहे. माझा दृढनिश्चय झाला आहे कीं मला अज्ञानाला काही कळत नाही. आपण मला आपले म्हणा. मला संन्यास दीक्षा द्या. माझ्यावर अनुग्रह करा. ” विष्णुशर्म्याने अंत:कारणपूर्वक केलेली ही प्रार्थना आचार्यांनी मान्य केली. योग्य काळ पाहून आचार्यांनी विष्णुशर्म्याला विधीपूर्वक संन्यास दिला. त्याचे नाव चित्सुखाचार्य ठेवले.

प्रकरण १० वे

# बदरी नारायण मंदिर स्थापना

बदरिकाश्रमांत विविधभागातून संचार चालू असताना आचार्य विचार करीत होते. हा परिसर नर-नारायणांचा. अलकनंदा नदीच्या डाव्या तीरावर नर पर्वत व उजव्या तीरावर नारायण पर्वत पण मंदिर कोणाचेच नाही. ह्या विचारांत आचार्यांना निद्रा आली. त्यांची निद्रा म्हणजे समाधी अवस्थाच. त्यांच्या ध्यानांत स्वत: नारायण प्रकट झाले. म्हणाले, “पूर्वी पाखंडीमतवाद्यांनी मला अलकनंदा नदीच्या नारदकुंडात टाकले आहे. तेथून तूं मला बाहेर काढ. तूं शोधलेल्या गरमपाण्याच्या कुंडात स्नान घाल. जवळच मंदिर बांधून त्यांत माझी स्थापना कर. ” आचार्य समाधीतून बाहेर आले. चित्सुखाचार्य व पद्मपादाचार्य यांना घेऊन नारदकुंडा जवळ आले. नारदकुंडात आचार्यांनी शोध घेतला. त्यांना फुटभर उंचीची “नारायणा”ची सुंदर मूर्ती मिळाली. समाधीत झालेल्या दृष्टांता प्रमाणे त्यांनी लगेच उष्ण पाण्याच्या झऱ्यात त्या मूर्तीला स्नान घातले. जवळच मंदिरस्थापनेचा संकल्प करून (सध्या जिथे मंदिर आहे) तिथे विधीपूर्वक प्राणप्रतिष्ठा करून ती मूर्ती स्थापनकेली. मंदिर बांधण्यासाठी द्रव्याची व्यवस्था करण्याचे विचार मनात घोळत होते. त्यावेळी कालटीहून आग्निशर्मा आर्याम्बेचा निरोप घेऊन आला. “मुला! लवकरांत लवकर ये. माझा अंत समीप आला आहे. माझ्याजवळ असेलेली सर्व सोन्या-चांदीची भांडी तुझ्याकडे पाठवत आहे. तुला त्यांचा जसा विनियोग कराय्वायाचा असेल तसा कर. इकडे यायला उशीर करू नकोस. धावत ये!” आचार्यांनी हा निरोप ऐकला. नारायणाच्या समोर हात जोडून उभे राहिले. त्यांच्या अमृतमयवाणीतून षट्पदी बाहेर पडली.

## ॥ श्रीविष्णुषट्पदी ॥

अविनयमपनय विष्णो दमय मनः शमय विषयमृगतृष्णाम् ।
भूतदयां विस्तारय तारय संसारसागरतः ॥ १॥

दिव्यधुनीमकरन्दे परिमलपरिभोगसच्चिदानन्दे ।
श्रीपतिपदारविन्दे भवभयखेदच्छिदे वन्दे ॥ २॥

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरङ्गः क्वचन समुद्रो न तारङ्गः ॥ ३॥

उद्धृतनग नगभिदनुज दनुजकुलामित्र मित्रशशिदृष्टे ।
दृष्टे भवति प्रभवति न भवति किं भवतिरस्कारः ॥ ४॥

मत्स्यादिभिरवतारैरवतारवताऽवता सदा वसुधाम् ।
परमेश्वर परिपाल्यो भवता भवतापभीतोऽहम् ॥ ५॥

दामोदर गुणमन्दिर सुन्दरवदनारविन्द गोविन्द ।
भवजलधिमथनमन्दर परमं दरमपनय त्वं मे ॥ ६॥

नारायण करुणामय शरणं करवाणि तावकौ चरणौ ।
इति षट्पदी मदीये वदनसरोजे सदा वसतु ॥ ७॥

आचार्यांच्या मुखातून अमृतवाणी स्त्रवू लागली,

- "हे भगवान् श्रीविष्णो! माझा उद्धटपणा व उन्मत्तपणा नाहीसा करून मनाचे दमन करा. विषयमृगांची तृष्णा शमवा व यच्चयावत् भूतमात्रांच्या बद्दल मनात दया उत्पन्न करा व मला या संसाररुपी भवसागरांतून तारून न्या. ||१||

● हे श्रीपती तुझ्या चरणकमलांतून निघणारी मकरंदरुपी गंगा आमचे संसारभय नष्ट करून तुझ्या चरणकमलातून निघणाऱ्या “सच्चिदानंद”रुपी परिमळाचा आस्वाद घेण्याची पात्रता उत्पन्न करून दे. यासाठी मी तुझ्या चरणकमलांस वंदन करतो. ||२||

● हे प्रभो, हे नाथ, तुमच्या माझ्यात तुम्ही भेद मानीत नाही हे खरे पण मी आपल्यापासून आहे आपण माझ्यापासून नाही. अहो भगवंता, तरङ्ग हे समुद्राचेच असतात व समुद्रावरच येतात पण त्या तरङ्गांना कोणी समुद्र म्हणत नाहीत. त्यांना समुद्रावाचे तरङ्ग म्हणूनच संबोधले जाते. ||३||

● हे गोवर्धनधारी (उद्धृतनग) भगवंता, हे वामना (नगभिदनुज), राक्षसांच्या शत्रो, चंद्र-सूर्य नेत्र असणाऱ्या प्रभो, तुझ्या सारख्या प्रभावशाली दर्शन झाल्यावर संसारासक्ती संपल्या खेरीज राहील काय? ||४||

● हे भगवंता, मत्स्य, कच्छ, वराह इत्यादी रूपे धारण करून आपण ज्या वसुधेचे सदैव रक्षण केलेत त्याच वासुधेवर मी त्रिविध तापांनी भयग्रस्त झालो असल्यामुळें आपल्या संरक्षणाखाली येण्यास पात्र आहे. ||५||

● हे षड्गुणैश्वर्यशाली मंदिर असलेल्या दामोदरा, हे गोविंदा, तुझे मुखकमल अतिशय सुंदर आहे. हे प्रभो आमच्यासठी तूं भवसागराचे मंथन करणारा साक्षात् मंदारपर्वतच आहेस. म्हणून माझ्या अंत:करणातली भवाची भीती नष्ट कर. ||६||

- हे करुणामय नारायणा, तुझ्या चरणकमलांचा मी आश्रय घेतला असल्यामुळे हा स्तुतीरूपी भ्रमर माझ्या मुखात सदैव वास करो. ||७||

आचार्य भक्तिरसात न्हाऊन निघाले होते. प्रार्थना करताना ते देहभान विसरले होते. त्यांनी षट्पदीला सुरुवात केली तेंव्हाच गढवालचा राजा आचार्यांच्या दर्शनास आला होता. त्याची सुद्धा भावसमाधी लागली होती. आचार्यांची षट्पदी म्हणून झाल्यावर कामाची निरवानिरव करून आचार्य लगेच निघणार होते. त्यासाठी ते वळले. गढवालचा राजा समोर आला. आदराने वंदन करून हात जोडून उभा राहिला. राजाने आचार्यांना नम्रपणे विनंती केली. मला काहीतरी आज्ञा द्या. आचार्यांनी तत्क्षणी आर्याम्बेने पाठवलेली सोन्या-चांदीची भांडी राजाच्या हातात दिली. म्हणाले, “इथे सुंदर बद्रीनारायणाचे मंदिर बांधून घ्या! त्याच्या खर्चासाठी ही भांडी वापरा. ” गढवालच्या राजाने ती भांडी आचार्यांना तशीच परत केली. म्हणाला, “सर्व खर्च मी करीन! ह्या भांड्यांची आवश्यकता नाही!” आचार्यांनी ती भांडी तशीच अग्निशर्म्या जवळ दिली. त्याला ती बद्रीनारायणाच्या पूजेसाठी वापरण्यास सांगितली व बद्रीनारायणाच्या पूजेसाठी तिथेच राहायला सांगितले. अग्नीशर्म्याने आचार्यांची आज्ञा शिरसावंद्य मानली आणि तिथेच राहिला. बांधकामाच्या देखरेखीसाठी पद्मापादांना तिथे राहायला सांगून आचार्य चित्सुखासह कालटीकडे निघाले.

प्रकरण ११ वे

# आर्याम्बामातेचे निधन

आर्याम्बा कालटीला आपल्या घरांत वृषाचलाचे ध्यानांत अंथरुणात काळ कंठीत होती. आपल्या बाळाची वाट पाहात होती. डोळे थकले होते. तिच्या शंकराची कीर्ती विविध प्रकारे कालटीत येऊन पोहोचली होती. आपला शंकर आता खूप मोठा झालाय. अद्वैत सिद्धांत सांगतो. म्हणजे नक्की काय सांगतो हे त्या माऊलीला कळत नसे. गावातल्या विद्वानांना ती ह्या अद्वैत सिद्धांताबद्दल विचारत असे. पण कोणालाच काही समाधानकारक सांगता येत नसे. आर्यांबिचे कुतूहल तशाही अवस्थेत टवटवीत होते. आचार्यांकडून म्हणजे तिच्या काळजाच्या तुकड्याकडून ती हे जाणून घेणार होती. अंतकालाची तिला पर्वा नव्हती. तिचा भरवसा तिच्या काळजाच्या तुकड्यावर होता. तिच्या मनांत आपल्या बाल शंकराचे वचन नेहेमीच घोळायचे. आजही तिला ते आठवले. बाल शंकर तिला म्हणाला होता, "अहंन्यम्ब रात्रिसमये समयांतरे. . . हे ती आठवत होती आणि इतक्यात मधुर व खणखणीत आवाजात त्याच्या पुढचा चरण तिला बाहेरून ऐकू आला,

. . . . वा संचिंत्य स्ववशगो ऽ वशगोऽथवा मां | एष्यामि तत्समयं सकलं विहाय विश्वासमाप्नुहि मृतापि संस्कारीष्ये ||". . . . . .

आठवणींच्या पाखरापेक्षा आपले पाखरुच परत आले आहे. हे आर्यांबेने त्वरित जाणले. दहा ते बारा वर्षांनी भेट होत होती. डोळ्यांतले आटलेले अश्रू शंकराला

पाहून पुन्हां तरारले. भावनांच्या मेघांनी दाटी केल्यावर जलाचा पूर नेत्रद्वारे न वाहाता तरच नवल. चित्सुखाचार्यांनी दंड कमंडलू आपल्या जवळ घेतला. आचार्य खडावा काढून ओसरीवर आले. आचार्य आईच्या बिछान्या जवळ आले. आचार्यांना पाहून आर्यांबा उठणार इतक्यांत आचार्यांनी चपळाईने आईच्या मानेखाली हात घालून तिला अलगद उठवले. शंकराचा स्पर्श होतांच आर्यांबा भावविभोर झाली. शंकराला तिने आपल्या कृश हातांनी मिठीत घेतले. तत्क्षणी तिला तिच्या जीवनांतला वृषाचलाच्या वास्तव्याचा कालावधी आठवला. स्मृतींची पाखरे चीवचिवाट करून दाटली. वृषाचलाच्या मंदिरांत शिवगुरुंसह केलेली शिवाची आराधना. शिवदृष्टांत! मग शंकराचा जन्म, शिवगुरूंचा विरह. असामान्य बालशंकराचा अपूर्व सहवास. मग त्या पाठोपाठ त्याचाही विरह! आर्यांबाला हुंदका अनावर झाला. आचार्यांनी तिच्या पाठीवरून हात फिरवून तिला शांत केले. पहिला आवेग ओसरला. आचार्य आईच्या मिठीतून बाहर आले. आचार्य कालटीत आल्याची वार्ता वायूने फुलातला सुगंध सर्वत्र पसरवावा तशी सर्वत्र पसरली. आचार्यांच्या दर्शनाला जमलेल्यांची आचार्यांभोवती दाटी होऊ लागली. चित्सुखाचार्यांनी त्या गर्दीला शिस्त लावून तासाभरात दर्शनाचा कार्यक्रम संपवला. आर्यांबेच्या वाड्यावर वर्दळ वाढली. आर्यांबेच्या सेवेसाठी एक दोघी असावयाच्या पण आतां न मोजलेल्याच बऱ्या! वातावरणात उत्साह होता तो आचार्यांच्या आगमनामुळे. तरीही वातावरणात एक अनामिक ताण जाणवत होता. तो आर्यांबेच्या प्रकृतीमुळे! आचार्य आईजवळ बसले होते. आईने त्यांचा हात आपल्या हातात घेतला आणि आपल्या कपाळाला लावत म्हणाली, “ तूं साक्षात् शंकराचा अवतार आहेस नां रे! माझ्यासाठीं तर तूं ईश्वरच आहेस. माझी हरीवर श्रद्धा आहे तशीच ती हरावर सुद्धा आहे. हरी आणि हरात भेद नाही हे मी फार लहानपणा पासून ऐकत आले आहे. पण अनुभव कधी आलेला नाही. तूं अद्वैत सिद्धांत साऱ्या

जगाला सांगतोस. मग मला कां बरे त्याचा बोध करून देत नाहीस? माझी श्रीकृष्णावर भक्ती आहे. त्याचे दर्शन मला अंतकाळी व्हावे अशी माझी तीव्र इच्छा आहे. मला ते अद्वैत काही कळलेले नाही. तेवढे सामावून सांग. अरे कपिलमुनींनी नाही कां आपल्या आईला ज्ञान सांगितले? तसे तूं मला सांग. आतां ह्या भौतिकांतल्या कश्श्याकश्श्याची म्हणून इच्छा राहिलेली नाही. पण आपल्या सत्तेने संपूर्ण विश्व सांभाळणारा जो कोणी आहे, तो हर कीं हरी हे मला समजत नाही तरी त्याचे मंगलमय दर्शन तूं मला घडव. तुझ्या अङ्कावर माझे मस्तक घे! तुझी वाणी ऐकत आणि त्या ईश्वराला पहात मला शेवटचा श्वास घेऊ दे!”

आर्यांबा एका दमात हे बोलली. तिच्या नेत्रातून अश्रूधारा वाहू लागल्या. आचार्यांनी हळूवार पणे आपल्या बोटांनी तिचे अश्रू पुसले. आईचे मस्तक आपल्या मांडीवर घेतले. आपल्या मधुरवाणीने तिला म्हणाले, “ आई! तुझा त्याग अपूर्व आहे. संसारातल्या सुखदुःखापासून, त्यांच्या जाणिवांपासून अलिप्त राहण्याच्या योग तूं केंव्हाच साधला आहेस. तुला हे निश्चित ज्ञात आहे कीं हे शरीर अनित्य आहे पण आत्मतत्त्व नित्य आहे. तुझ्या ह्या मन:संयमामुळेच तुझे वैराग्य प्रखर झाले आहे. आतां तर तूं शरीरबंधातूनही मुक्त होण्यास आतुर झालेली आहेस. नित्य असणारे आत्मतत्त्व अखंडत्वाने चराचर व्यापून उरले आहे. तेच परब्रह्म! ना त्याला आकार ना त्याला विकार. ते व्यक्तही नाही कीं अव्यक्तही नाही. आपण आपल्या देहधारणेच्या व्यक्तत्वामुळे व्यक्ताची धारणा करतो म्हणून व्यक्त. पण देहधारण होण्यापूर्वी सुद्धा आपले अस्तित्व कुठें तरी होते म्हणूनच आपण अव्यक्तातून व्यक्त स्थितीत आलो नां? आणि अव्यक्त स्थितीतून व्यक्त स्थितीत आल्यावर त्याच अव्यक्ताला आपण वेगळे समजू लागलो. त्याची ईश्वर या भावनेने पूजा करू लागलो. हे द्वैत आपणच निर्माण केले नां? एकदां हे द्वैत निर्माण झाले कीं

भक्ती आलीच. कारण आपण विभक्त झालो. पण आत्मतत्त्वाने सर्वविश्वासह आपण एकरूप असल्याचे जाणणे म्हणजे अद्वैत. आई, अद्वैत अद्वैत जे म्हणतात ते देहांत असतानाच परब्रह्माशी तादात्म्य पावणे हेच आहे. त्यालाच कोणी मोक्ष म्हणतात, कोणी मुक्ती म्हणतात, कोणी साक्षात्कार म्हणतात. पण जिथे वाचाच उरत नाही तिथे शब्द कोणतेही वापरले तरी काय फरक पडणार? जे शब्दांच्या पलीकडले आहे जे केवळ अनुभूतीनेच जाणता येते ते निःशब्दाचे मूळ म्हणजेच परब्रह्म. हेच परब्रह्म रुद्राच्या रूपांत अवतीर्ण होते आणि तेच परब्रह्म श्रीकृष्णाच्या रूपातही अवतीर्ण होते. म्हणून तर हरी आणि हर यांच्यात भेद नाही. तेंव्हां त्या हराचे दर्शन तूं घे! असे म्हणून आचार्यांनी

"श्रीमन्महेश्वर कृपामय हे दयालो हे व्योमकेश शितिकण्ठ गणाधिनाथ |

भस्माङ्गराग नृकपालकलापमाल संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ||६||"

हा श्लोक म्हणताच आर्यांबेला रौद्रस्वरूपी रुद्र दर्शन झाले, पण ती आसुसली होती श्रीकृष्ण दर्शनाला. त्यामुळे तिच्या चेहऱ्यावरील भयभीत भाव पाहून आचार्यांनी अत्यंत मधुरस्वरांत भगवान् श्रीकृष्णाची प्रार्थना केली.

" यदा धर्मग्लानिर्भवति जगतां क्षोभकरणी

तदा लोकस्वामी प्रकटितवपुः सेतुधृदजः ।

सतां धाता स्वच्छो निगमगणगीतो व्रजपतिः

शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ८॥

धर्मग्लानी आल्यामुळे जगांत क्षोभ निर्माण होतो तेंव्हा हे वृंदावनपते श्रीकृष्णा तूं अजन्मा असूनही शरीर धारण करतोस. तूं शरणागत वत्सल असल्याचे गीत वेदही

गातात. अशा भक्तवत्सल श्रीकृष्णा आम्हाला तूं दर्शन दे. आचार्य भावविवश होऊन प्रार्थना करीत होते. त्याच क्षणी आर्यांबेला शंख, चक्र, गदा, पद्म व वैजयंती माला धारण केलेल्या भगवान् श्रीकृष्णांचे दर्शन भगवान् शिवाच्या ठिकाणी झाले. ती धन्य झाली ! हरी व हर यांच्यात भेद नसल्याची अनुभूती आर्यांबेला आली. कृतार्थ झलेल्या आर्यांबामातेचे दोन्ही हात आपोआप जुळले गेले. त्याच ठिकाणी असलेल्या चित्सुखाचार्यांनाही तीच अनुभूती प्राप्त झाली तीच त्यांच्या मुखातून शब्दरूपांत प्रवाही झाली.

इति हरिरखिलात्माराधितः शङ्करेण
श्रुतिविशदगुणोऽसौ मातृत्मोक्षार्थमाद्यः ।
यतिवरनिकटे श्रीयुक्त आविर्बभूव
स्वगुणवृत उदारः शण्खचक्राञ्जहस्तः ॥ ९॥

चित्सुखाचार्य म्हणाले, “आचार्यांनी भगवान् श्रीकृष्णांची आराधना केल्यावर वेदांनी गुणवर्णन केलेले ते परब्रह्म आचार्यांच्या मातेला तिचा मनोरथ पूर्ण करून परमसुख देण्यासाठी शङ्ख, चक्र, गदा, पद्म इत्यादी धारण करून प्रत्यक्ष प्रगट झाले. ” आर्यांबामातेने प्रसन्नतेने आचार्यंचा हात आपल्या हातात घेतला. आशिर्वादासाठी उजवा हात तिने उंचावताच आचार्य खाली वाकले. आर्यांबेने आचार्यांच्या मस्तकावर हात ठेवून “विजयी भव” असा आशिर्वाद दिला. आर्यांबामाता तृप्त नजरेने आपल्या पुत्राकडे पहात असतांनाच प्रसन्नतेने अनंताकडे झेपावली. चैतन्य चैतन्यांत विलीन झाले. अचेतन जड शरीर जागेवरच राहिले. आचार्यांच्या तेजस्वी टपोऱ्या नेत्रांतून ओघळलेली अश्रूंची मालिका

आर्यांबामातेच्या मस्तकावर विसावली. हा हृदय-द्रावक प्रसंग पाहाणाऱ्या चित्सुखाचार्यांनी आपली मान वळवली. आर्यांबामातेचे पर्व आतां संपले होते.

आचार्य आपला आवेग आवरून हळूच उभे राहिले. कालटीत ही वार्ता पसरली. अंत्यदर्शनासाठी लोक जमले. अंत्यसंस्कार करण्याच्या तयारीला आचार्य लागले. वैदिक ब्राह्मण पुढे सरसावले. सर्व तयारी झाली. आचार्य स्वत: अंत्यसंस्कारकरणार हे ऐकून जमलेले वैदिक ब्राह्मण चमकले. रूढी व परंपरा त्यांना स्वस्थ बसू देईना. त्यांनी आचार्यांना जाणीव दिली. आपण संन्यासी आहात. आईचा अंत्यसंस्कार आपण कसा करणार? ही अनिष्ट प्रथा पडेल. आपण हा विचार सोडा. वेळ प्रसंग फार कठीण होता. आचार्यांनी त्या ब्राह्मणांना आपण आईला दिलेल्या वचनाचा सविस्तर वृत्तांत सांगितला. पण ब्राह्मणांची समजूत पटेना. काळ कोणासाठीच थांबत नाही. समजावण्यात व सांगण्यात वेळ जात होता. ब्राह्मण विविधप्रकारे आचार्यांनाच समजावून सांगत होते. तथापि आचार्यांचा निश्चय कोणीच मोडू शकत नव्हते. हळू हळू एक एक काढता पाय घेऊन आपापल्या निवास्थानी गेला. गर्दी ओसरली. शुकशुकाट झाला. रूढी व परंपरा जोपासण्यात गावकऱ्यांनी धन्यता मानली. आर्यांबे जवळ आचार्य व चित्सुखाचार्य यांच्या खेरीज कोणीच उरले नाही. आचार्य उठले. परसदारी आले. भराभर चिता रचू लागले. चित्सुखाचार्य मदतीला धांवले! त्यांच्या भविष्याचा विचार करून आचार्यांनी त्यांना प्रतिबंध केला. चित्सुखाचार्य फक्त साक्षित्वाने पण जडअंतःकरणाने पहात राहिले. बराच वेळ होऊन गेला होता. आर्यांबाचा जडदेह आता बराच जड झाल्यामुळे आचार्य एकटे उचलू शकत नव्हते. त्यांनी मृत्युंजयाचे स्मरण केले. आईच्या देहाचे तीन तुकडे केले. सरणावर नेऊन ठेवले. स्वत:च्या योगसामर्थ्याने त्या चितेला अग्नी दिला. आपल्याच हाताने मातेचे दहन केले.

आईला दिलेले वचन तंतोतंत पाळले. आचार्य धगधगलेल्या चितेकडे पहात होते. मनांत भावनांचा कल्लोळ झाला तो शब्दरूप धारण करून बाहेर आला.

आस्तां तावदियं प्रसूतिसमये दुर्वारशूलव्यथा

नैरुच्यं तनुशोषणं मलमयी शय्या च सांवत्सरी ।

एकस्यापि न गर्भभार भरण क्लेशस्य यस्य क्षमः

दातुं निष्कृतिमुन्नतोऽपि तनयः तस्यै जनन्यै नमः ॥

प्रसूतीकालच्या असह्य वेदना, गर्भारपणात तोंडाची चव जाणे, शरीर वाळणे, पोटांत वाढणाऱ्या गर्भाच्या मल मुत्राची वर्षभर शय्या होऊन राहणे, अशा अनेक त्रासांपैकी एकाही त्रासाची परतफेड करणे मुलाला आयुष्य वेचूनही जमणारे नाही. आनंदाने हे त्रास सहन करणाऱ्या माझ्या मातेला त्रिवार वंदन असो. . . आचार्यांचे सांत्वन कोण करणार? दिवस अस्तास गेला.

आईचे दिवस करण्यासाठीसुद्धा कोणी ब्राह्मण येईना. आचार्यांनी विविध प्रकारे प्रार्थना केली. पण व्यर्थ! त्याच वेळी कालटीमध्यें तीन ब्राह्मण अतिथी म्हणून आचार्यांच्या वाड्यात आले. कालटीत येताच आचार्यांचा सर्व वृत्तांत त्यांना समजला होता. . गावातून कोणी येण्याची शक्यता नव्हतीच. पण हे आलेले ब्राह्मण अत्यंत तेज:पुंज दिसत होते. आतां आचार्यांचा वाडा रोज वेदघोषाने दणाणून जाऊ लागला. त्यांनी आचार्यांना श्राद्धविधी, दहावा, बारावा, तेरावा इत्यादी सर्व यथासांग करून दिले. आलेले तेज:पुंज व तपस्वी दिसणारे ब्राह्मण कोण? कुठले? हे कुतूहल कालटीतल्या वैदिकांत निर्माण झाले. हे काय अघटीत आहे? कालटीतल्या काही अधिकारी वैदिक ब्राह्मणांनी चित्सुखाचार्यांना प्रार्थना केली. आचार्यांच्या कृपेने चित्सुखाचार्यांना त्या ब्राह्मणांचे दर्शन साक्षात् ब्रह्मा, महेश व

परशुराम यांच्या मूळ स्वरूपात झाले होते. त्यामुळे चित्सुखाचार्यांच्या कडून सत्य समजताच आचार्यांचा अधिकार सर्व वैदिकब्रह्मवृंदाला ज्ञात झाला. ते तीन ब्राह्मण आले तसे निघूनही गेले. कोठून आले कोठे गेले हे कोणालाही समजले नाही.

केरळनरेशांपर्यंत आर्यांबेच्या निधनाची व आचार्य कालटीत आल्याची वार्ता गेली. केरळनरेश तांतडीने कालटीत आचार्यांच्या दर्शनास आले. कालटीत आल्यावर केरळनरेशांना सर्व वृत्तांत समजला. त्यांनी कालटीतल्या सर्व ब्रह्मवृंदाला पाचारण केले. घडलेल्या प्रकाराबद्दल आचार्यांची जाहीर क्षमा मागितली. इतकेच नाही तर आपल्या सर्व प्रजेला आदेश दिला कीं इत:पर आपल्या मृत नातेवाईकांचे दहन घराच्या मागील बाजूस करावे. त्यामुळे केरळात तशीच प्रथा पडली. ब्रह्मा, महेश व परशुराम यांचे एक मंदिरही बांधण्यात आले. ते केरळमधील ह्या प्रसंगाचे सतत स्मरण राहावे म्हणून! हे मंदिर केरळात त्रिवेन्द्रम जवळ तिरुवल्लभ येथे आहे. आजही केरळीय लोक आपल्या मृतपूर्वजांना श्रद्धांजली वाहण्यासाठी तेथे येतात.

प्रकरण १२ वे

# गुरुगोविंदयतींचे निर्याण

कालटीतले वास्तव्य संपवून आचार्य चित्सुखाचार्यांसह काशीकडे निघाले. त्याचवेळी पद्मदाचार्य कालटीत आचार्यांकडे आले. आपल्या गुरूंना वंदन करून म्हणाले, “ प्रभो आपण बद्रीनाथ सोडले आणि आपले गुरु गोविंदयती हे पण आपल्या नर्मदातीरावरील आश्रमांत गेले. त्यांच्या एका शिष्याने बदरीनाथला येऊन मला त्वरित गुरुगोविंदांच्याकडे येण्यास सांगितले. सहकाऱ्यांवर मंदिराच्या बांधकामाची व्यवस्था सोपवून मी गुरु गोविंदयतींच्या आश्रमात आलो. त्यांची प्रकृती खालावत चाललेली दिसली. त्यांनी आपल्याला भेटण्याची इच्छा माझ्याजवळ व्यक्त केली. म्हणून मी तांतडीने आपणास भेटायला इथे आलो आहे. ” हे ऐकतांच आचार्य त्या दोघांसह गुरु गोविंदयतींना भेटण्यासाठी निघाले. चित्सुखाचार्य थोडे आश्चर्याने आचार्यांकडे पाहू लागले. त्यांचा भाव आचार्यांना समजायला काय वेळ लागणार? चित्सुखाचार्यांना समजावे म्हणून आचार्य उद्गारले,

“क्षमा मंडले भूपभूपालवृंदैः सदा सेवितं यस्य पदारविन्दम् |
गुरोरङ्घ्रिपद्मे मनश्चेन्न लग्नं तत: किं तत: किं तत: किम् ||”

भूमंडलातील सर्व राजे जरी नमस्कार करीत असले तरी ज्याचे मन गुरुपदी रमलेले नसेल त्याला त्या गुरुकृपेचा काय लाभ? गुरु म्हणजे आत्मा. गुरु म्हणजे प्राण. गुरु म्हणजे सर्व. साक्षात् श्रीगुरूंनी पाचारण केल्यावर त्यापेक्षा अधिक महत्वाचे काय असू शकते? अरे पद्मपादा, अरे चित्सुखा! पुराणातल्या गोष्टीत एक संदिपकाची गोष्ट आहे ती आठवा. साक्षात् भगवान् श्रीशिवशंकर त्याच्या गुरुभक्तीवर प्रसन्न होऊन त्याला वरदान देण्यासाठी त्याच्या समोर प्रकट झाले. पण गुरुंच्या मनास येत नाही म्हणून संदिपकाने वरही मागितला नाही. ह्या अशा गोष्टीची सत्यता जीवनात अनुभवायची असते ती स्वत: तसे आचरण करून. अशा अनेक गोष्टी पुराणात सांपडतील पण त्या खऱ्या कीं खोट्या ह्याच्या साठी जडातले संदर्भ व पुरावे तपासत बसून आयुष्य व्यर्थ घालवण्या पेक्षां सद्गुरूंवर पूर्ण श्रद्धा

ठेवून भक्तिमार्गाची कास धरणे व अनुभव घेणे हे श्रेयस्कर आहे. नाहीतर “एकोऽहम् बहु स्याम्” ह्या तैतरीय ब्रह्मवल्लीतल्या सूत्राचा प्रत्यय कसा घेणार? ऐतिहासिक पुरावा मिळण्याची सुतराम शक्यता नाही. इथे जसे तरतमभावाने तर्क शुद्धतेने जगदांतर करून आपण एका जोडप्या पर्यंत येऊन थांबतो, त्यावेळी लक्षात येते कीं ह्या जोडप्याच्या पलीकडे जी सृष्टी आहे ती शरीरापासून शरीर उत्पन्न होणारी नाही. म्हणून चित्सुखा तूं हे लक्षांत ठेव कीं पुराणे खरी कीं खोटी ह्याचा विचार न करतां त्यातल्या प्रत्येक कथेत दिलेले ज्ञान अत्यंत महत्वाचे. ते आपण आचरणांत आणून अनुभवू शकतो. मग त्या पुराणांचा समाजरचना, समाजस्थिरता, सुधारणा, कला, सौख्यमय सहजीवन, इत्यादी भरघोस उपयोग होत असेल तर सूज्ञांनी तोंच करून घेणे योग्य नाही कां?”

आचार्य बोलत होते आणि चित्सुखाचार्य अनुभवत होते कीं मनांत उत्पन्न झलेली शंका आचार्य सहजतेने फेडून टाकत आहेत. तरी चित्सुखाचार्यांच्या मनांत अनेक शंका येतच होत्या. ह्या सगळ्या संकांचे निरसन होणार कां? ही पण शंका त्यांच्या मनात होती! पण चित्सुखाचार्यांची सर्वात मोठी शंका अशी होती कीं आचार्यांनीच असे म्हटले आहे “गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तुच्छिन्न संशय:” मग आपल्याला वाणीने का बरे सांगत आहेत? आपण नेमके कुठे कमी पडतो? नेमक्या ह्याच प्रश्नाचे उत्तर आचार्य देऊ लागले. आचार्य म्हणाले, “ जो पर्यंत शिष्य ‘मी आणि माझे’ ह्या भावनांच्या उपाधींना चिकटून असतो तोवर त्याला गुरूंचे मौनातले म्हणजे परावाणीतले बोलणे श्रवण करता येत नाही. मग शंका निरसन कसे होणार? अंत:करण जो पर्यंत मी व माझे ह्या आठवणीने भरलेले असते तो पर्यंत तिथे संन्यास्त वृत्ती खऱ्याखुऱ्या अर्थाने उत्पन्न होत नाही. बाह्य संन्यास अंतरंगात उतरवण्यासाठी ‘मी आणि माझे’ विसरले पाहिजे. गुरुस्मरण व गुरुचरणी आत्मार्पण हा त्याचा पाया आहे. आपल्या शरीरासह जे काही आहे ते सर्व गुरूंचे आहे ही अव्यभिचारी धारणा झाल्याशिवाय खरा संन्यास अनुभवता येत नाही. इतके बोलून आचार्य शांतपणे भराभर पाउले टाकीत चालू लागले. त्यांच्या कायेला, पाऊलांना, मनाला ओढ लागली होती ती सद्गुरुंच्या दर्शनाची. आई नंतर

भौतिकातला फक्त सद्गुरुंचाच भावना पाश आता शिल्लक होता. केंव्हा तरी तोही हरपणारच हे जरी आचार्य जाणून होते तरी सद्गुरुंचा देहान्त समयीचा देहात असतानाचा अखेरचा आशिर्वाद आचार्यांना फार महत्वाचा वाटत होता. आचार्यांची अशी दृढ धारणा होती कीं हे सर्व सद्गुरुकृपेचे फळ आहे. यात आपले काहीच नाही. आचार्य फारच भराभर चालत होते. चित्सुख व पद्मपाद त्यांच्या पाठोपाठ लगबगीने चालत असत.

ॐकारमांधाताच्या गुरुगोविंदयतींच्या आश्रमांत त्यांच्या शिष्यांची अथक सेवा चालू होती. गुरुगोविंदयती अत्यंत खंगले होते. देहभानावर नव्हतेच. शांत पडून होते. सभोवती काय घडते आहे ह्याचे त्यांना भानच नव्हते. त्यामुळे आचार्य, चित्सुखाचार्य व पद्मपादाचार्य आश्रमात येऊन त्यांच्या जवळ बसले तरी त्यांना समजले नाही. मग आचार्यांनी आपल्या मधुर वाणीने भावपूर्ण गुरुस्तुति आरंभली.

“विषमिव विषयान् यो मन्यमानो दुरन्तान् |
जयति परमहंसो मुक्तीभावं समेति ||”

आचार्यांच्या मुखातून निघालेल्या प्रभावी वाणीचा परिणाम म्हणा अथवा गुरुगोविंदयतींची ह्या अलौकिक शिष्याला भेटण्याची दुर्दम्य इच्छा म्हणा परिणाम असा झाला कीं गुरुगोविंदयती देहभानावर आले. त्यांनी डोळे उघडले आणि चरणसेवा करीत असलेल्या त्यांच्या परमप्रिय शिष्याला पाहिले. त्यांच्या शरीरात नवचैतन्य निर्माण झाले. ते पटकन उठून पद्मासनात बसले. त्यांना हे पूर्ण ज्ञात होते कीं आपल्याला काही क्षणांतच आतां अनंतात विलीन व्हावयाचे आहे. पण शेवटचे एक कार्य त्यांना करावयाचे होते. त्यासाठीच त्यांनी आपले प्राण रोखून धरले होते. अविलंबे त्यांनी आपल्या सर्व शिष्यांना जवळ बोलावले आणि संन्यासाश्रमाचे नियम पुन्हां एकदा सांगितले.

“भिक्षाटनं जपो नित्यं शौचं स्नानं ध्यानं सुरार्चनम् |
कर्तव्यानि षडेतानि सर्वदा नृपदण्डवत् ||”

जनलोकांचे निरीक्षण करण्यासाठी भिक्षाटन करणे, शरीर शुद्धीसाठी शौच, स्नान, अंत:करण शुद्धीसाठी नित्य ध्यान, जप, देवातापूजन ही सहा कर्तव्ये, हाती

दंड धरून राजा जसा प्रजापालनाचे कर्तव्य पार पाडतो तद्वत संन्याशाने दण्ड धारण करून समाज कल्याणासाठी आचरावी. इतके सांगून पुढे म्हणाले, “माझ्या नंतर सर्वजण ह्या शंकराला आपला गुरु माना. त्याच्या आज्ञेचे यथायोग्य पालन करा. इतके सांगून नमस्कारासाठीं नतमस्तक झालेल्या शंकराचार्यांच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेऊन म्हणाले, “विजयी भव!”

गुरुगोविंदयतींनी त्यानंतर आपले दोन्ही हात आपल्या गुडघ्यावर ठेवले. पद्मासनाची विशेष मुद्रा केली. एक दीर्घ श्वास घेतला. मुखातून ॐकाराचा कर्णमधुर ध्वनी उमटला. आणि त्यांच्या प्राणज्यातीसह अनंतात विलीन झाला. त्यावेळी आल्हाददायक प्रकाश आसमंत उजळून गेला. शिष्यांच्या कानांत मात्र तो ॐकाराचा ध्वनी काळजाचा ठाव घेत अंतरात गेला. तो शेवटचा ध्वनी त्यांच्या अंत:करणात विरला. ते धन्य झाले. आचार्यांचा शेवटचा भावबंध संपला. ॐकारमांधाताचा आश्रम ॐकाराने इ. स. पूर्व ४९४ च्या कार्तिक पौर्णिमेला पूर्ण भारावला.



प्रकरण १३ वे

# पंचायतन पूजेचा उदय

ॐकारमांधाता येथे आपल्या गुरुंच्या समाधीची सर्व व्यवस्था करून आचार्य मनोमन आपल्या गुरूंना वंदन करून निघाले. त्यांना आपल्या गुरूच्या आज्ञेचे पालन करावयाचे होते. आचार्यांनी प्रथम काशीला जाऊन काशी विश्वेश्वराचे दर्शन घ्यायचे ठरवले. बरोबर चित्सुखाचार्य व पद्मपादाचार्य हे दोघेही निघाले. काशीत येतांच काशीच्या ब्रह्मवृंदाने त्यांचे मन:पूर्वक अपूर्व स्वागत केले. काशीचा श्रोतृवर्ग आचार्यांची प्रवचने श्रद्धा, भाव व भक्तीने श्रवण करून स्वत: ईश्वराभिमुख होऊ लागला. विद्वानांची मने तृप्त होऊ लागली.

ज्या काशीत महर्षी व्यासांनी आचार्यांना आशिर्वाद दिला होता त्याच काशी पासून आचार्यांनी प्रस्थानत्रयीवर प्रवचने सुरु केली. काशीच्या विद्वानांची मने तृप्त झाली. त्या सर्व विद्वानांचे आशिर्वाद व सद्भावना घेऊन आचार्य प्रयागला जाण्यास निघाले. चालताना चित्सुखाचार्यांच्या मनांत सहज प्रश्न आला कीं ह्या स्थानाला प्रयाग नाव कां बरे पडले असेल? मागे आचार्यांनी काशीच्या नावाचा खुलासा केला होता तसा ह्या नावाचा खुलासा विचारावा कां? असे चित्सुखाचार्यांच्या मनात आले. आपल्या शिष्याच्या मनांत हा विचार येतांच आचार्य सहज म्हणाले, ‘‘आपण ज्या प्रयागला जात आहोत त्या प्रयागा वद्दल स्कंद पुराणांत प्रयाग हे नाव कां पडले ते सांगितले आहे,

"प्रकृष्ट: सर्व यागेभ्य: प्रयाग मिती गीयते |

प्रयाग इति तन्नाम कृतं हरीहारादिभि: ||"

आचार्य पुढें म्हणाले 'प्र' म्हणजे प्रगत 'याग' म्हणजे महायज्ञ, प्रजापती ब्रह्मदेवाने गंगा-यमुना-सरस्वती या तीन नद्यांच्या संगमस्थानी अनेक प्रगत याग केले म्हणून भगवान् विष्णू व शिव यांनी त्या स्थानाला प्रयाग हे नाव दिले. चित्सुखांच्या अंत:करणात आपल्या सद्गुरूच्या सर्वज्ञतेची साक्ष कोरली गेली. त्यांना हे पावलो पावली जाणवू लागले कीं मनुष्याचा भाव व श्रद्धा वाढवण्याचा आचार्य सर्वांगाने प्रयत्न करीत आहेत. अशा प्रकारे अत्यंत अद्भुत अनुभव घेत चित्सुखाचार्य व पद्मपादाचार्य आचार्यांसह तीर्थराज प्रयागला आले.

प्रयागच्या तीर्थात स्नान करून तिघेही बाहेर आले. त्याच ठिकाणी आचार्यांनी मत्स्य पुराणातील 'प्रयागाष्ट्काने' प्रयागाची स्तुती केली.

" सितासिते यत्र तरङ्गचामरे नद्यौ विभाते मुनिभानुकन्यके ।

लीलातपत्रं वट एक साक्षात्स तीर्थराजो जयति प्रयागः ॥ ९||"

मुनी आणि सूर्य यांच्या कन्या असलेल्या गंगा-यमुना दोन नद्यारुपी पांढऱ्या व काळया चवऱ्या ज्याच्यावर सदैव ढाळल्या जातात व ज्याच्यावर अक्षयवटाचे छत्र आहे तो तीर्थराज प्रयाग विजयी होवो. आचार्यांची वाणी स्त्रवत होती आणि ऐकणारा मंत्रमुग्ध होत होता. तिथे जमलेल्या अनेक सश्रद्ध भाविकांचे चित्त आचार्यांच्याकडे आकर्षित न होते तरच नवल. आचार्य कितीही सोप्या भाषेत व सामान्य मनुष्याला सहज समजेल अशी भावपूर्ण व प्रासादिक स्तोत्रे करीत होते तरी प्रयागातले आचार्यांचे काम तितके सोपे नव्हते. काशितली परिस्थिती वेगळी होती.

याचे मुख्य कारण काशींत काशीविश्वेश्वराला मानणारा, वैदिकपरंपरा जोपासणारा वर्ग अधिक होता. त्या ठिकाणी सनातन वैदिक संस्कृतीची पाळेमुळे खोलवर रुजलेली होती. त्यात कर्मठपणा येऊन वैदिक परंपरा मानणारा वर्ग बहिर्मुख झालेला होता. वेदविद्या ही पोटार्थी असल्याची धारणा दृढ होऊ लागली होती. सर्वजण भौतिक सौख्य मिळवण्याच्या प्रयत्नांत व्यस्त झाले होते. आचार्यांनी त्यांना ईश्वराभिमुख करून ऐश्वर्यासह परमार्थ कसा करावा हे शिकवले होते. आचार्यांनी वैदिक सनातन संस्कृतीचे पुनरुज्जीवन केले ते ती आध्यात्मिकदृष्ट्या जीवन जगण्याचा मार्ग दाखवण्यासाठी. त्यात भक्तिमार्ग, ज्ञानमार्ग, योगमार्ग इत्यादी सर्वांचा समावेश होता. त्यांत अगदी सामान्य मनुष्यही आचार्यांनी अपवाद केलेला नव्हता. जे त्यांच्याकडे आलेच नाहीत पण आचार्यांना जे दिसले त्यांना सुद्धा आचार्यांनी घासून पुसून लख्ख केले. काशीत असताना आचार्य पहाटेच गंगेवर स्नानास जात असत. रोजच वेगवेगळ्या मार्गातून त्यांचा संचार असे. एकदा असेच पहाटे स्नानास जात असताना एक जराजर्जर गृहस्थ ओटीवर दिवटीच्या प्रकाशात व्याकरण पाठ करीत बसला होता. त्यांत तो 'डु कृं' असा अगदी क्षीण उच्चारात पाठ करीत होता. आचार्य थांबले. त्यांना त्याची दया आली. क्षणाचाही विलंब न लावता त्यांनी तो पाठ थांबवायला लावला व हरीनाम घेण्याचा उपदेश केला. आपल्या हृदयस्पर्शी वाणीने ते त्याला म्हणाले,

"भजगोविन्दं भजगोविन्दं गोविन्दं भज मूढमते ।

सम्प्राप्ते सन्निहिते काले नहि नहि रक्षति डुकृञ्करणे ॥ १||"

बाबारे! हे तुझे व्याकरण पाठ करणे काही तुला सद्गती देणार नाही. आतां तुझे वय झालेले आहे. मृत्यू केंव्हां झडप घालील ते माहित नाही. अशावेळी तूं हे

व्याकरण कशासाठी बरे पाठ करतो आहेस. त्या ऐवजी तूं नामस्मरण कर. त्यामुळे तुला सद्गती तरी प्राप्त होईल! अशा आशयाचे सुंदर स्तोत्र आचार्य म्हणाले. त्या गृहस्थाला फार आनंद झाला. त्याने आचार्यांना साष्टांग नमस्कार घातला. आचार्यांना शरण जाऊन हरिनामाची दीक्षा प्राप्त करून घेतली. आचार्यांनी रचलेले स्तोत्र त्याला फार आवडले. त्याने विचारले "आपण केलेल्या उपदेशाच्या स्तोत्राचे नाव काय आहे बरे?" आचार्य त्याच्या तोंडाचे बोळके झालेले पाहून हसत हसत म्हणले, "चर्पटपंजरी" ! चर्पट म्हणजे खमंग व पंजरी म्हणजे कुटून बारीक केलेलं खाद्य. अशा प्रकारे आचार्य लोभस बोलून सहजतेने लोकांना ईश्वराभिमुख करीत होते. काशीत हे खूपच सोपे होते. कारण सामान्य मनुष्य वैदिक परंपरांचा आदर राखत होता. अज्ञानामुळे परमार्थाला मुकला होता. त्याला आचार्य भक्तिमार्ग दाखवीत होते. विद्वानांना अद्वैत सिद्धांत पटवून देत होते. विद्वानवैदिकांना "ब्रह्मसूत्राच्या भाष्याने" प्रभावित करून परमार्थी बनवीत होते.

प्रयाग मधली स्थिती खूपच वेगळी होती. वैदिकपरंपरेत त्याकाळी अनेक पंथ निर्माण झाले होते. जैन, बौद्ध, मांत्रिक, तांत्रिक, कर्मठ, भैरव, शैव, वैष्णव असे अनेक पंथ निर्माण होऊन जो तो फक्त भौतिक सौख्याच्या मागे लागलेला होता. त्या त्या पंथाच्या संस्थापकांनी घालून दिलेले तारतम्य लोप पावलेले होते. नियमांचे पालन करताना सहिष्णुते ऐवजी कर्मठपणा वाढीला लागला होता. मतमतांतरांच्या गलक्यात सामान्य मनुष्य भांबावला होता. जो तो आपल्या पंथाचा अभिमान उराशी बाळगून इतरांना कनिष्ठ समजत होता. सामुहिक सहजीवनांत रुजवलेली सनातन वैदिक संस्कृतीची सामुहिक सहकाराची जागा द्वेष, मत्सर, स्वार्थ ह्यांनी घेतली होती. आचार्यांना नेमके हेच नाहीसे करायचे होते. ईश्वर एकच आहे. तो मानणाऱ्यांचा आहे व न मानणाऱ्यांचासुद्धा आहे. त्यामुळे आचार्यांच्या प्रवचनाला ह्या सर्वांची गर्दी वाढू

लागली. समाजाच्या एकजुटीची तीव्र ओढ आचार्यांना लागली होती. धार्मिक सहिष्णुतेखेरीज पर्याय नव्हता. आचार्य तारतम्याने प्रत्येक गोष्ट सहजतेने सांगत होते. त्यामुळे सामान्य जैन, बौद्ध, शैव वा वैष्णव इत्यादी विविध पंथातून अनेकांनी त्यांना आपले गुरु मानले. आचार्यांना खरा मुकाबला करायचा होता तो त्या त्या पंथाच्या मिमांसकांशी. तिथें बुद्धिवाद व बुद्धिविलास करणारेच खूप होते. आपली विद्वत्ता वाद विवाद करण्यासाठी वापरून समाजांत आपणच श्रेष्ठ आहोत हे सिद्ध करण्यातच हा वर्ग धन्यता मानत होता. आचार्यांना जशी सामान्य माणसाची काळजी होती तशीच ती ह्या विद्वान व वादपटुत्व प्राप्त झालेल्या विद्वानांबद्दलही होती. वेदाच्या आधारे कितीही वाद घालता येतो हे काय आचार्य जाणत नव्हते असे थोडेच होते. पण बौद्धिक घेण्यात कुशल असलेले आचार्य व्यवहार कुशलही होते. प्रत्येकाचे स्वातंत्र्य गृहित धरून होते. ते आपले मत कुणावरही लादत नसत. तर समोर असलेल्या व्यक्तीचे मतपरिवर्तन करीत असत. त्याकाळी घरा-घरांतून पिता-पुत्रांच्या सुद्धा उपासना पद्धती भिन्न असल्याचे त्यांना जाणवले. आधी कुटुंबात सहिष्णू भाव निर्माण करण्यासाठी आचार्यांनी “देवपूजा” या विषयावर म्हणजे मूर्तीपपूजेवर प्रवचने केली. त्या प्रवचनात त्यांनी देव जरी एक असला तरी विविध रूपे धारण करून तो सर्व विश्वसंचालन करीत असतो. सत्व, रज व तम या तीन गुणांच्या आधारे विष्णू-ब्रह्मा व महेश यांचा अवतार झाला असल्याचेही समजाऊन सांगितले. त्याच अनुषंगाने घराघरांतले वाद नष्ट होऊन एकोपा नांदवा म्हणून पंचायतन पूजेची संकल्पना भक्तिमार्गीयांना सांगितली. ती अत्यंत यशस्वी झाली. त्याकाळापासून आजही घराघरांतून पंचायतन पूजनाची प्रथा चालू आहे. त्याचा परिणाम भ्रातृभाव वाढण्यात झाला. आचार्यांच्या प्रभावाने सामान्य मनुष्य जसा दिपून जात असे तसाच ज्ञानमार्गाचा कट्टर पुरस्कर्तासुद्धा दिपून जात असे. अशा ज्ञानमार्गीयांच्या पुढें आचार्य

आपल्या अद्वैत तत्त्वज्ञानातली सूक्ष्मातिसूक्ष्म तत्त्वे मांडत असत. त्यामुळे आचार्यांना ते ज्ञानमार्गी सत्पुरुष मानत. त्यांना शांती मिळण्याचा मार्ग सांपडत होता.

उत्तरेकडे जैनपंथाने राजाश्रय मिळवून आपले वर्चस्व स्थापन केले होते. जैन हा जरी वैदिक पंथ होता तरी स्वत:च्या बुद्धीविलासातून त्यांनी सर्वसामान्य मनुष्याच्या मनात परंपरेने उत्पन्न झालेल्या सगुण ईश्वरोपासनेला धक्का दिला होता. त्यामुळें अनेक सामान्यलोकांचा गोंधळ झाला होता. विश्वाला निर्माताच नाही. ते शून्यातून आपोआप निर्माण झाले आहे. त्यामुळे सर्वसामान्यांच्या सगुण ईश्वरावर असलेल्या श्रद्धायुक्त कल्पनांना धक्का बसला. राजाश्रय मिळालेल्या पंथाकडून तसा बुद्धिभेद व्हायला तसा वेळ लागत नाही. सामान्यत: कर्माचा कंटाळा असणाऱ्यांना जैन व बौद्ध पंथ अतिशय सोयीचा वाटू लागला. त्यांच्या विचारप्रणालीने ते भारावून गेले. त्याचे महत्वाचे कारण असे होते कीं सनातन वैदिक विद्वान केवळ कर्मकांडावर भर देऊन ते न करणाऱ्यांना पाखंडी म्हणून संबोधू लागले होते. सर्वसामान्य मनुष्य कर्मकांडात प्रवीण होणे शक्य नव्हते. त्यामुळेही बराच समाज जैन व बौद्ध पंथाकडे आकर्षित झाला. आचार्य कोणावरही टीका न करतां आपले म्हणणे शांतपणे मांडत असत. ते फक्त अज्ञान दूर होईल असेच संभाषण करीत असत. लोकांना अध्यात्म अत्यंत सोप्या पद्धतीने केवळ नामसंकीर्तनाने कसे साध्य होऊ शकते ते समजावून सांगत असत. हळूहळू आचार्यांच्या भोवती हजारो भाविक गोळा होऊ लागले. त्यांची दीक्षा घेऊ लागले. प्रचंड संख्येने लोक त्यांना गुरुस्थानी मानू लागले. बौद्ध पंथातले लोकही त्याला अपवाद नव्हते. बौद्ध मीमांसक ज्यावेळी आचार्यांशी वाद विवाद करीत त्यावेळी आचार्य अत्यंत तर्क कठोर असत हे जितके खरे तितकेच ते वृत्तीने कोमल होते. त्यांची सहिष्णुता सर्वानुमते मान्य होत असे. त्यांनी जेव्हा पंचायतन पूजेचा पायंडा पाडला, त्यावेळी त्यांनी भैरवाला शिवांचा सेवक म्हणून

वेगळे स्थान दिले नव्हते. त्यामुळें अनेक भैरवपंथी अस्वस्थ झाले होते. भैरवपंथीयांच्या नित्यपाठांत आचार्यांनी रचलेले "भैरवाष्टक" श्रद्धेने सामावून घेतले होते. कारण आचार्यांनी केलेली भैरवाची स्तुती भावजागृत करणारी व अनुभूती देणारी होती. त्यामुळे अनेक भैरवपंथी आचार्यांना भेटले. आचार्यांना त्यांनी विनंती केली कीं पंचायतनांत भैरवाची उपासना करणाऱ्यांची सोय करा. असंख्य भैरवपंथी त्या भागात असल्याचे आचार्यांना जाणवले. आचार्यांनी समतोल वृत्तीने त्यांच्या आग्रही भूमिकेचा विचार केला आणि भैरवाचा उपास्यदेवता म्हणून समावेश केला. त्यामुळें भैरवाचे अध्वर्यू अत्यंत खुश झाले. त्यांनी आचार्यांना 'षण्मतस्थापनाचार्य' म्हणजे 'सहा देवतांचा उपासनामार्ग निर्माण करणारे गुरु' अशी पदवी बहाल केली.



प्रकरण १४ वे

# प्रभाकरध्वरींची शरणागती

आचार्य प्रयाग मध्यें अद्वैताचा प्रचार करताना आतां "षण्मतावर" आधारित प्रचार करू लागले. नित्य शेकडो शिष्य आचार्यांच्या बरोबर गंगास्नान व अक्षयवट यांच्या दर्शनास जाऊ लागले. एक दिवस अक्षयवटाच्या दर्शनास आचार्य गेले असता त्यांना कोणी एक कुष्ठरोगी अक्षयवटाच्या फांदीला दोर बांधून गळफास लावून घेण्याच्या तयारीत दिसला. गळयांत दोर अडकवण्या पूर्वीच आचार्यांनी आपल्या कणखर आवाजांत त्याला "थांब ! गळफास लावू नकोस! क्षणभर उभा रहा."असे सांगितले. आचार्यांचे ते शब्द ऐकतांच तो कुष्ठी तरुण थबकला. आचार्यांकडे पाहू लागला. आचार्यांच्या बरोबरचे शिष्य जागीच थबकले. आचार्य धीरगंभीर पावले टाकीत त्या कुष्ठी तरुणाजवळ आले. त्याचा चेहरा पूर्ण विद्रूप झालेला होता. त्याच्या डोळयांना सूर्यप्रकाश सहन होत नव्हता. पण आचार्यांना पाहून त्वरेने तो त्यांच्या समोर आला. आचार्यांच्या चरणी त्याने साष्टांग दंडवत घातले. भुतासारख्या दिसणाऱ्या त्या तरुणाला आचार्यांनी अत्यंत प्रेमाने उठवले. त्याच्या पाठीवरून आपला प्रेमळ हात फिरवला. आधीच भेदरलेले शिष्य दूरच थांबले होते व आचार्य काय करतात हे कुतुहलाने भय-युक्त नजरेने पाहत होते. आश्चर्य असे घडले कीं तो तरूण पूर्णपणे व्याधीमुक्त होऊन पूर्ववत् झाला होता. त्या तरुणाला आचार्य साक्षात् शिवशंकरच वाटले. परमानंदाने त्याने पुन्हां पुन्हां आचार्यांना वंदन केले. बरोबर असलेल्या चित्सुखाचार्यांनी आचार्यांचा जयघोष केला. तो बरोबरच्या शेकडो शिष्यांनी प्रतिसादाच्या रूपाने आसमंतात निनादत ठेवला. काही काळ आचार्य स्तब्ध राहिले. जयघोष थांबल्यावर तो तरूण हात जोडून आचार्यांना म्हणाला, " हे प्रभो! हे दयानिधे! हे भगवंता, मी तरुणपणीच घरदार सोडून मोक्षाच्या इच्छेने सद्गुरुंच्या शोधांत निघालो. पण सद्गुरूप्राप्ती ऐवजी मला ह्या घाणेरड्या व्याधीने पछाडले. व्याधी भराभर वाढतच चालली. त्यामुळे निराश होऊन ह्या अक्षयवटाखाली जीवन संपवून मोक्षप्राप्ती करून घेण्याच्या

निर्धाराने इथे आलो. आपल्या दर्शनाने व स्पर्शाने व्याधिमुक्त झालो खरा पण भवसागरांतून मुक्त झालो नाही. आपले ऋण मी कशानेच फेडू शकणार नाही. माझ्या अंत:करणातला भाव आपल्या खेरीज कोण जाणू शकणार आहे? आपणच माझ्यावर कृपा करा व मला ह्या भवसागरातून पार होण्याचा मार्ग दाखवा. मी माझे जीवन आपल्या चरणी समर्पण केले आहे. ”

त्या तरुणाची शिष्यप्रज्ञा तीव्र झालेली पाहून आचार्यांनी त्याला विचारले,

“किं ज्योतिस्तव?” - तूं कोणत्या प्रकाशाने विश्व पहातोस बरे? - तरुण उत्तरला, “भानुमानअह्निमे | रात्रौ प्रदीपादिकम् |” – दिवसा सूर्यप्रकाशाने व रात्री दीपादिकांच्या प्रकाशाने! – आचार्य म्हणाले, “स्यादेवं रविदीपदर्शनविधौ किं ज्योतिराख्याहि मे |” – ते खरे आहे पण सूर्य व दीप ह्या गोष्टी तूं कशाने पाहतोस?- तो तरुण उत्तरला, “चक्षु:” – डोळयांनी – आचार्य म्हणाले, “ तस्य निमीलनादिसमये किम्|” – डोळे मिटल्यावर कोणत्या साधनाने पाहतोस? – इथें तो तरुण क्षणांतच अंतर्मुख झाला. त्याला तत्क्षणी भगवद्गीतेतला दहाव्या अध्यायातला दहावा श्लोक आठवला “ तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् | ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ||१०||” विचारांची आवर्तने क्षणांत झाली आणि तो तरुण उत्साहाने उत्तरला, “धी:”! – बुद्धीने – त्यावर आचार्य म्हणाले, “धियो दर्शनेकिम्?” – बुद्धीचे दर्शन कशाच्या माध्यमातून होते? – तरुण म्हणाला, “ तत्राहम्” – ते करणारा मी आहे. – हे उत्तर देत असतानाच त्याच्या मनांत “अहं ब्रह्मास्मि” ची आवर्तने त्रयस्थपणे निर्माण झाली. त्याच्यातला देहाहंकार पूर्ण विरून भगवत्स्वरूपाशी एकरूप झाला. त्याच्या संपूर्ण शरीरात आत्मतत्त्वाचा भाव प्रवाही झाला. आतां आचार्य काय विचारतात हे तो कानामनाला एक करून ऐकू लागला. आचार्य सहज उद्गारले, “अतो भवान् परमकं ज्योति: |” – अरे म्हणजे परमज्योती म्हणतात ती तूंच आहेस कीं! – आनंदलहरींच्या सर्व शरीरभर पसरणाऱ्या संवेदनांचा अनुभव घेता घेता सद्गद झालेला तो तरुण “तदस्मि प्रभो |” – होय प्रभो ! ती परमज्याती मीच आहे!” असे म्हणून मुक्त झालेला तो तरुण अष्टसात्विक भाव जागे होऊन

आचार्यांच्या चरणावर साष्टांग दंडवत घालून आचार्यांचे चरण अश्रुनी प्रक्षालन करू लागला. तटस्थ झाला. रोमांचित झाला. सद्गद झाला. कांती विवर्ण झाली. त्याला क्षणकाल तसाच राहू देऊन आचार्यांनी खाली वाकून हळुवार हांक मारली “उदंका” व खांद्यांना धरून उठवीत म्हणाले, “उठ, उदंका! उठ!” उदंक म्हणजे सर्व कलंक नष्ट झालेला, निष्कलंक! उदंकाला नवजीवन प्राप्त झाले. “सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम्” ची अनुभूती प्राप्त झाली. देहांत राहूनही विदेही होण्याची किमया घडली. मन, बुद्धि, चित्त व अहंकार हे अंत:करण चतुष्टय सद्गुरुमय झाले. मग तिथे अहंकारचे काविरे कसे उरणार? म्हणून तो निष्कलंक झाला. कृतार्थ झाला. आचार्यांनी त्याला संन्यास दिला. चित्सुखाचार्य हा संवाद ऐकत होते. कैलास पर्वताच्या पायथ्याशी त्यांनी जी अनुभूती घेतली होती तीच पुन्हां इथे मिळाली. त्यांनी हा संवाद श्लोकाच्या स्वरूपांत लक्षात ठेऊन मनात त्याची पुनरावृत्ती करू लागले. . . . . .

किं ज्योतिस्तव भानुमान् अहनि मे रात्रौ प्रदीपादिकं
स्यादेवं रविदीपदर्शनविधौ किं ज्योतिराख्याहि मे ।
चक्षुस्तस्य निमीलनादिसमये किं धीर्धियो दर्शने
किं तत्राहमतो भवान् परमकं ज्योतिस्तदस्मि प्रभो ॥

अशाप्रकारे आचार्यांची कीर्तीजवळपासच्या आश्रमांतून, गावांतून, पंचक्रोशीतून पसरत पसरत भारतभर पसरू लागली. जनसमुदाय आचार्यांना सर्वेसर्वा मानू लागला. त्यांतच श्रीवल्ली नामक ग्रामी प्रभाकर हे वैदिक विद्वान राहात होते. त्यांच्या पत्नीला आचार्यांनी उदंकाला बरे केल्याची समग्र हकीकत समजली. तिच्या मनात आचार्यांबद्दल आदर निर्माण झाला. हे प्रभाकर यज्ञ करणारे म्हणून “प्रभाकरध्वरी” असे प्रसिद्धी पावलेले नामवंत व श्रीमंत याज्ञिक होते. पद्मपादाचार्यांचा मामा दिवाकर ह्या ‘प्रभाकरध्वरी’चा शिष्य होता. प्रभाकरांना अनेक शिष्य होते. त्या सर्वांच्याच कानावर आचार्यांची कीर्ती जात होती. प्रभाकरांच्या शिष्यांना आचार्यांच्या दर्शनाची ओढ लागली होती. पण प्रभाकरांना ते

तसे सांगू शकत नव्हते. कारण प्रभाकर हे अत्यंत कठोर कर्मकांड करणारे तपस्वी म्हणून मान्यता पावले होते. त्यामुळे शिष्यांना ते अत्यंत कठोरतेने वागवीत असत. त्यामुळे त्यांच्यात व शिष्यांत संवाद होत नसे. कुमारील भट्ट हे प्रभाकरांचे गुरु होते. पण श्रीवल्ली नावाचे गांव प्रभाकरांना यज्ञयाग करण्यास इनाम मिळाले होते. त्यामुळें प्रभाकर धनवान झाल्यावर आपल्या गुरुंनाही जुमानीनासे झाले होते. इतके ते उन्मत्त झाले होते. मान सन्मान व स्वत:ची प्रतिष्ठा याखेरीज त्यांना काहीच दिसत नव्हते. त्यांना एक मुलगा होता. तो वयाच्या पांचव्या वर्षा पासून मुका झाला होता. ते शल्य प्रभाकर व त्यांची पत्नी यांना होतेच. प्रभाकर स्वत: यज्ञयाग प्रवीण असल्यामुळे आपल्या पुत्राचे मुकेपण घालवण्यासाठी प्रभाकरांनी विविध देवतांना प्रसन्न करून घेण्यासाठी अथक प्रयत्न केले होते. पण ते सर्व विफल झाले होते. त्यांतून उदंकाची कुष्ठरोगातून मुक्तता झाल्याचे समजल्यापासून प्रभाकरांच्या पत्नीने आचार्यांना भेटण्याचा लकडा लावला होता. पण प्रभाकर स्वत:ला फार श्रेष्ठ समजत असल्यामुळें त्याला स्वत:ला जावेसे वाटत असूनही अहंकारामुळे जात नव्हता. पद्मपादांकडून आचार्यांना प्रभाकरां विषयी सर्व माहिती मिळालीच होती. प्रयाग व प्रयागच्या परिसरातील नियोजित कार्यक्रमांमुळे आचार्यांना बरेच दिवस श्रीवल्ली येथे जाता आले नव्हते. सर्व कार्यक्रम आटोपल्यावर आचार्यांनी श्रीवल्ली येथे जाऊन प्रभाकरांची भेट घेण्याचा मनोदय चित्सुख व पद्मपाद यांच्याकडे व्यक्त केला.

ही बातमी लगेच श्रीवल्लीत प्रभाकरांकडे पोहोचली. प्रभाकर खुश होऊन आपल्या पत्नीला म्हणाला, “ बघ शेवटी ह्या संन्याशाला माझे माहात्म्य पटले. ” ह्यावर पत्नी काहीच बोलली नाही. प्रभाकर पुढें म्हणाला, “ मी न बोलावताच येतोय. म्हणजे मला शरण येण्यासाठीच येत असणार. ” नवऱ्याची ही दर्पोक्ती तिला जराही आवडली नाही. ती काही एक न बोलता मान खाली घालून बसली. आचार्यांबद्दल आदरभाव बाळगून त्यांना मनोमन लवकर येण्याची प्रार्थना करून आचार्यांची आतुरतेने वाट पाहू लागली.

आचार्य श्रीवल्लीला यावयास निघाले. प्रभाकरांचे शिष्य व प्रभाकर स्वत: आचार्यांना पहाण्यास उत्सुक होते. प्रभाकरने आपल्या वैभवाची छाप आचार्यांवर पडावी म्हणून अत्यंत भरजरी वस्त्रे, अलंकार, अत्तरे, पादरक्षा इत्यादी धारण केले होते. आपला शिष्यपरिवार आपल्या मागे घेऊन आचार्यांना वेशी जवळ सामोरा गेला. झळाळणारी उंची वस्त्रे व अलंकार परिधान केल्याने प्रभाकर एखाद्या राजा सारखा दिसत होता. तर आचार्य भगव्या वस्त्रात असूनही ज्ञान व वैराग्य यांच्यामुळे अत्यंत तेजस्वी दिसत होते. आचार्यांना पाहून प्रभाकर दिपून गेला. अंत:करणाचा ठाव घेणारी नजर. तेजस्वी पाणीदार डोळे, शांत पण निश्चयी चेहरा, हसरी जीवणी, बांधेसूद शरीरयष्टी इत्यादी पाहून प्रभाकरांच्या मनात विचार चमकून गेला, केवळ भिक्षान्नावर राहून इतके तेज? आश्चर्य आहे! इतक्यात आचार्यांनी पुढें होऊन प्रभाकरांना आलिंगन दिले व नमस्काराच्या अडचणीतून वांचवले. आगतस्वागत झाल्यावर प्रभाकरांनी काही प्रश्न विचारण्याची इच्छा प्रदर्शित केली. प्रभाकराचा प्रश्न विचारण्याचा मूळ हेतू हाच कीं काही अवघड प्रश्न विचारून ह्याला अडचणीत आणायचा व आपले श्रेष्ठत्व सिद्ध करावयाचे. म्हणजे हा संन्यासी आला तसा निघून जाईल किंवा मला शरण येईल. म्हणून कर्मकांडाच्या प्रश्नातून आचार्यांना गोत्यात आणण्याच्या उद्देशाने प्रभाकरांनी आचार्यांना प्रश्न केला, “ आचार्य, आपण वेद प्रमाण मानता! मी “यज्ञकर्म” म्हणजेच क्रियारूप कर्म करतो. ह्या क्रियारूप “यज्ञकर्माचे” उत्पत्तीस्थान वेद हे आहे. त्यामुळेच पाउस, पिके, फळे इत्यादी जीवनावश्यक गोष्टींची उत्पत्ती होते. मानवी जीवनाला ते आवश्यक असते. मग असे असताना आपण नैष्कर्म्य, अद्वैत, अजातवाद, जगाचे मिथ्यत्व इत्यादी प्रतिपादन करीत हिंडता आहात ते कसे? त्याने पोटापाण्याचा प्रश्न कसा सुटणार?” इतके बोलून प्रभाकर ताठ मानेने सभोवारच्या आपल्या शिष्यांवर व सभेसाठी जमलेल्या विद्वानांवर नजर टाकून मग आचार्यांकडे पाहू लागला.

आचार्य म्हणाले, “ आपणही वेद प्रमाण मानता तर वेदाधारे असा निष्कर्ष आहे कीं आपण म्हणता त्याप्रमाणें यज्ञयागामुळे जलधारा, जलधारांमुळे अन्न

इत्यादी हे अगदी यथायोग्य आहे. मनुष्याला जगायला अन्न आवश्यकच आहे. हे ही अगदी खरे. पण वेदांत आवश्यक तेवढे स्वीकारा, अधिकाचा मोह ठेऊ नका. अधिकाचे दान करा. असेही सांगितले आहे. आपण वेदाची एक आज्ञा ऐकतो व दुसऱ्या आज्ञेकडे सोयीस्करपणे दुर्लक्ष करतो. त्याला भोगासक्ती एवढे एकच कारण आहे. स्वत:च्या परिवाराला निर्वाह पुरते ठेऊन अधिकाचे दान आपण करतो कां? उदाहरणार्थ आपलाच प्रश्न घ्या. आपल्या प्रश्नाचा रोख यज्ञकर्माची आवश्यकता असल्याचे समर्थन करण्याकडे आहे. वेदांनीच ते सांगितले आहे तर निर्विवाद सत्य आहे. पण आपण आपल्या विक्रमी वैभवशाली यज्ञाच्या समर्थनाचा मुद्दा विचारांत घेऊन बाकीचे प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न करू. आपण ज्या प्रकारे यज्ञ करता आहात त्या प्रकारचे यज्ञ आपले सर्व शिष्य करू शकतात कां? निश्चितच नाही. कां? तर त्यांना तुमच्या सारखे गांव काही इनाम मिळालेले नाही. आपल्या व्याख्ये प्रमाणें आपल्याच सारखे यज्ञ करावयाचे तर त्या प्रत्येक शिष्याला एक एक गांव इनाम मिळवावे लागेल. म्हणजेच प्रत्येक शिष्याला एक एक गांव इनाम मिळवण्याची पात्रता आली पाहिजे. आता गुरु या नात्याने शिष्यांची तेवढी पात्रता येण्याची जबाबदारी ओघानें आपल्यावरच येते नाही कां?”

इथे मात्र प्रभाकर चांगलेच क्षुब्ध झाले. एकतर शिष्यांना आपल्या तोडीचे करण्याची कल्पनाच त्यांना सहन होईना. शिष्य हा कायमचा शिष्य. त्यांच्यातला उन्मत्तपणा उफाळून वर आला. आचार्य आपल्या शिष्यांना चिथावणी तर देत नाहीत? मी माझ्या गुरुंच्या कडून शिक्षण घेतल्यावर स्वत:च्या परिश्रमाने ही विद्या वाढवली आहे. घनपाठ केला आहे. भरपूर अभ्यास केला. मंत्र, संहिता, प्रश्न, अनुवाक, ब्राह्मण इत्यादी सर्व कंठस्थ केले हे सर्व माझ्या स्वत:च्या परिश्रमाचे आहे. त्यानंतर मीमांसा वगैरे सर्व मी स्वत:च्या मेहनतीवर केलेले आहे त्यात गुरुंचा काय संबंध? विद्या वाढवून मी ती स्वकर्तृत्वाने टिकवली आहे. यशस्वीरीत्या वापरून यश मिळवले आहे. लोकांना आदर निर्माण झाला तो माझ्या स्वत:च्या उद्यमशीलतेमुळे. माझ्या जिभेला साही शास्त्रांचा सराव आहे. मी अस्खलित उच्चार करतो.

मोठमोठ्या यज्ञांची रचना मी करतो. त्याच माझ्या कर्तृत्वाचे हे फळ आहे. त्यामुळेच हे गांव राजाने मला इनाम दिले आहे. हे तर एकच आहे पण अशी अनेक गांवे मी इनाम मिळवण्याची माझी धमक आहे. मी ती मिळवीन सुद्धा. पण हा संन्यासी माझी ही कर्तबगारी विचारात न घेता माझ्याच शिष्यांच्या समोर मलाच अडचणीत आणण्याचा प्रयत्न करीत आहे. त्यामुळे सर्व शिष्यांच्या सामोरच याला आपल्या कर्तृत्वाची जाणीव द्यावी. त्यांतूनच माझ्या शिष्यांना माझी महानताही समजेल. ह्या हेतूने आचार्यांना थांबवीत प्रभाकर म्हणाले, "वा:! आचार्य! आपण सगळीच जबाबदारी माझ्यावर टाकण्याचा प्रयत्न करता आहात. पण त्या प्रत्येक शिष्याने स्वत:च मेहनत करून आपली विद्या वाढवली पाहिजे. माझ्या गुरुंच्या कडून मी विद्या शिकलो. ती वाढवली. त्यांच्या पेक्षा जास्त विद्या, धन, मानमरातब, लौकिक, इनाम इत्यादी स्वकर्तृत्वाने कमावले आहे. त्यांत माझ्या गुरूंचा काहीही संबंध नाही. मी स्वकर्तृत्वाने हे यश प्राप्त करून स्वत:च गुरुपदी बसलो आहे. त्यांत माझ्या गुरुंचा काहीही संबंध नाही. " हे ऐकताच आचार्य अत्यंत गंभीर झाले. प्रभाकर सभोवार विजयीमुद्रेनें पाहू लागले. इतक्यात आचार्य आपल्या खणखणीत व मधुर आवाजात प्रभाकरांना म्हणाले,

"षडंगादिवेदो मुखे शास्त्रविद्या
कवित्वादि गद्यं सुपद्यं करोति।
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे
ततः किं ततः किं ततः किं ततः किम्।।३।।
यशो मे गतं दिक्षु दानप्रतापात्
जगद्वस्तु सर्वं करे सत्प्रसादात्।
मनश्चेन्न लग्नं गुरोरंघ्रिपद्मे
ततः किं ततः किं ततः किं ततः किम्।।६।।

साही शास्त्रे जिभेवर खेळत असतील, गद्य, पद्य रचनेसाठीं विपुल शब्दसंपत्ती आहे रचना कौशल्य व प्रतिभा हे सुद्धां आहेत पण मन जर गुरुचरणी लीन नसेल तर त्या सर्वांचा काय बरे उपयोग?

माझा व्यवहार, माझा उद्योग, माझे यश, माझे दानशूरत्व, माझी दशदिशातली कीर्ती, माझ्या कृपेमुळे काहीही मिळू शकते असे म्हणणाऱ्याचे मन जर गुरुचरणी समर्पित नसेल व गुरुंच्या पेक्षा आपण श्रेष्ठ आहोत असे वाटत असेल तर ते सर्वच निर्थक नाही कां? आचार्यांचा शांत पण कणखर आवाज व अर्थपूर्ण रचना ह्यामुळे प्रभाकराचे शिष्यच काय पण प्रभाकर स्वत:च विचारात पडला. आपल्या बोलण्याचा परिणाम नेमका आपल्याच विरोधांत तो हतबुद्ध तर झालाच पण संपूर्ण शिष्य वर्गाने आचार्यांना जोडलेले हात पाहून तो अवाक् झाला. त्याच्या मनात विचारांचे आवर्तन झाले. आचार्यांच्या बोलण्यातला नितांत प्रामाणिकपणा प्रभाकराला जाणवला. आपण किती आत्मकेंद्रित झालो आहोत हे जाणवले. आचार्य विनयाने बोलत असल्याचे त्याला जाणवत होतेच. आचार्यांच्या बोलण्यात गर्व अथवा अभिमान यांचा लवलेशही नाही हे प्रभाकरला मनोमन जाणवले. आचार्यांच्या ह्या बोलण्यावर कोणताच बिनतोड युक्तिवाद त्याला स्मरेना. तो आचार्यांच्या शांत व तेजस्वी चेहऱ्याकडे ते पुढे काय बोलतात हे ऐकण्यासाठी केविलवाण्या नजरेने पाहू लागला. आचार्य बोलू लागले,

वदन्तु शास्त्राणि यजन्तु देवान्
कुर्वन्तु कर्माणि भजन्तु देवताः ।
आत्मैक्यबोधेन विनापि मुक्तिः
न सिध्यति ब्रह्मशतान्तरेऽपि ॥ ६ ॥

चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये ।
वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित्कर्मकोटिभिः ॥ ११ ॥

प्रभाकर आपण म्हणता साही शास्त्रे आपल्या जिभेवर खेळतात. आपण यज्ञयाग यशस्वी करता हे सर्व आपण फलप्राप्तीसाठी, भौतिक सौख्यासाठी

अनंतकाल जरी करीत राहिला तरी त्यामुळे आपल्याला खरे समाधान मिळणार आहे कां? भौतिक सौख्य त्या त्या काळापुरते मर्यादित सौख्य देते पण चिरकालीन सौख्य-आनंद कशामुळे प्राप्त होतो याचा कधी विचार केला आहे कां? वेदप्रणित कर्म हे चित्तशुद्धी साठी असते. भौतिक सौख्य उपभोगण्यासाठी ते करावयाचे नसते. तो भोग त्यामधून आपोआप मिळत असतो हे जरी खरे असले तरी त्या कर्माचे ते उद्दिष्टच नाही. आपण ज्याला कर्तृत्व कर्तृत्व म्हणता त्याला भगवद्गीतेत भगवान् श्रीकृष्ण असे म्हणतात,

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः |
अहङ्कारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ||३-२७||

सत्व-रज-तम ह्या त्रिगुणांच्या साम्यावस्थेला प्रकृती असे संबोधले जाते. त्याच गुणांकडून कर्मे घडवली जातात. ती लौकिक व शास्त्रीय अशी दोन्ही प्रकारची असतात. पण देहेन्द्रियांना अहंकाराने 'मी कर्ता आहे' अशी भावना उत्पन्न होते व केलेल्या कृतीला तो "स्वकर्तृत्व" समजण्याचा मूर्खपणा करतो. आपण मला नैष्कर्म्य म्हणजे काय हे विचारले याचा मला आनंदच आहे. नैष्कर्म्य मी प्रतिपादन करीत नाही. ते भगवान् श्रीकृष्ण प्रतिपादन करतात ते ही वेदाधारेच. नैष्कर्म्य म्हणजे फलासक्ती सोडून ब्रह्मार्पण केलेले कर्म! नाही तरी प्रत्येक क्रिया-कर्म, यज्ञयाग इत्यादी पूर्ण केल्यावर आपणही "तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु" असे म्हणताच ते काय केवळ उपचार म्हणून? पण त्याच म्हणण्यात खरा भाव निर्माण झाला व मानसिक अवस्था तशीच झाली तर तेच "नैष्कर्म्य" होईल. अद्वैत म्हणजे भगवन्ताशी केलेला ऐक्य भाव. आपली उत्पत्ती भगवंतापासून झालेली आहे. पण आपण म्हणजे भगवंत नाही. जसे लाटा जरी समुद्रापासून झालेल्या असल्या तरी त्यांना कोणी समुद्र म्हणत नाहीत तर समुद्राच्या लाटा असेच म्हणतात. तसेच आपले आहे लाटा जशा समुद्राशी एकरूप असतात म्हणजे वेगळ्या नसतात तसेच आपण आपले वेगळेपण विसरून भगवंताशी एकरूप होणे हे अद्वैत. समुद्रावरच्या लाटा म्हणजे समुद्रावरचे अनेक तरंग. त्या प्रत्येक तरंगात समुद्राचेच पाणी असते तरी प्रत्येक तरंग वेगळा

दिसतो. तद्वत आपण एका भगवंताचेच तरंग आहोत पण गुणाधिक्यामुळे विविध भावाने वावरत असतो. सर्वांचे आत्मतत्त्व एकच असते. सोन्याचे अनेक दागिने बनतात. त्या प्रत्येक दागिन्यात सोनेच असते. पण म्हणून अंगठीला अंगठीच म्हणतात. बांगडीला बांगडीच म्हणतात. फार तर सोन्याची बांगडी म्हणतात. तसेच आपण भगवंताचे आहोत. आपण जरी अनेक दिसत असलो तरी मूळ भगवत्कृपा जाणीवेत ठेवणे ह्याचे नाव अद्वैत. हि भावना सरावाने अंत:कारणांत एकदा दृढ झाली कीं मग “अद्वैतातूनच नैष्कर्म्य” प्राप्त होते. कारण तिथें जीवाचे जीवपण लोप पावलेले असते. जसे सोन्याचा कोणताही दागिना वितळवला कीं त्याचे निखळ सोनेच होते. तद्वतच जीवाचे जीवपण लोप पावले कीं तो भगवत्स्वरूप होतो. तेच अद्वैत. त्या अवस्थेत “यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं प्रभो तवाराधनम्|” ही धारणा दृढ होऊन ज्ञानाचा म्हणजे आत्मज्ञानाचा उदय होतो. तो परिपक्व झाला कीं त्याला हे समजते “न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधक: | न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ||३२||” इथे प्रलय नाही, उत्पत्ती नाही, कोणी बद्ध नाही कीं साधक नाही, कोणी मुमुक्षु नाही कीं मुक्तही नाही हाच खरा परमार्थ आहे. ह्यालाच अजातवाद म्हणा, परमार्थ म्हणा की आणिक काही म्हणा. “अगा जे घडलेची नाही त्याची वार्ता पुससी काई” अशी अवस्था असल्यावर जे काय समजते ते शब्दांच्या पलीकडले असते. वर्णनाच्या बाहेरचे आहे. त्यामुळे दिसणाऱ्या प्रत्येक वस्तुत परब्रह्म आहे ते अखंड आहे. अतूट आहे. ते एकही नाही अथवा शून्यही नाही. तेच एक सत्य आहे हे कळल्यावरच सृष्टीचे मिथ्यत्व अध्यात्मिक पातळीवर समजणार. प्रभाकरा! आपण नीट विचार करा. आपल्याला वेदांचे शब्दज्ञान विपुल आहे. ते जर मननासाठी विचारांत घ्याल तर सर्व प्रश्नांची उकल आपोआपच होईल. ”

इतके बोलून आचार्य थांबले. प्रभाकरांचे सर्व शिष्य हे ऐकत होते. त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले होते. आनंदातिशयाने त्यांनी एका सुरांत “आचार्य देवो भव” असा जयजयकार केला. प्रभाकर उठून उभे राहिले. त्यांनी आचार्यांना

नम्रतापूर्वक वंदन केले. प्रभाकरांनी आचार्यांचे शिष्यत्व पत्करले. शिष्यप्रज्ञा म्हणजे काय हे त्यांना कळले.

इतक्यात घरातल्या आतल्या बाजूस हालचाल झाली. शिष्य भराभर दुतर्फा झाले. प्रभाकरांची पत्नी आपल्या आठ वर्षाच्या मूक मुलाला घेऊन येत होती. ती आचार्यांच्या समोर आली. त्यांना वंदन करून अश्रुपूर्ण नेत्रांनी आपल्या पुत्राला तिने आचार्यांच्या समोर उभे केले. ती इतकी भावविवश झाली होती कीं तिच्या मुखातून शब्द फुटत नव्हता. ती काही बोलण्याच्या मन:स्थितीत नव्हती. आचार्यांनी तिचे मनोगत जाणले. त्या बालकाच्या मस्तकावरून हात फिरवून म्हणाले,

**"कस्त्वं शिशो कस्य कुतोऽसि गन्ता किं नाम ते त्वं कुत आगतोऽसि |**
**एतन्मयोक्तं वद चार्भकत्वं मत्प्रीतये प्रीति विवर्धनोऽसि ||"**

"बाळा! तूं कोण आहेस? कोणाचा पुत्र आहेस? आणि कुठें निघाला आहेस? तुझे नाव काय? कोठून आला आहेस? बाळा माझ्या मनांत तुझ्याबद्दल प्रेम उत्पन्न झाले आहे म्हणून तूं मला ह्या प्रश्नांची उत्तरे दे!" त्या बालकाने तत्काळ उत्तर दिले,

**"नाहं मनुष्यो न च देव यक्षो न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः |**

**न ब्रह्मचारी न गृही न वनस्थो भिक्षुर्न नाहं निजबोधरूपः ||"**

मी मनुष्य नाही, देव नाही, यक्ष नाही, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र सुद्धा नाही. ब्रह्मचारी वा गृहस्थी नाही, वानाप्रस्थी वा संन्यासी पण नाही तर मी निज्बोधाने परिपूर्ण ब्रह्मरूप झालेला नित्य व सत्यस्वरूपी आत्मा आहे!"

"समस्तेषु वस्तुष्वनुस्यूतमेकं समस्तानि वस्तूनि यन्न स्पृशन्ति ।
वियद्वत्सदा शुद्धमच्छस्वरूपं स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥"

जे सर्व वस्तूंमध्ये एकवटले आहे पण एकही वस्तू त्याला स्पर्श करू शकत नाही. ते आकाशाप्रमाणे शुद्ध व मल रहित असलेले आत्मतत्त्वच माझे स्वरूप आहे. असे बोलून त्याने आचार्यांच्या चरणाला मिठी मारली. त्याचा त्या वेळचा भावावेग इतका प्रभावी होता कीं तिथे उपस्थित असलेल्या प्रत्येकालाच आचार्यांच्या चरणी

लोळण घ्यावीशी वाटत होती. मग थोड्यावेळाने भावावेग कमी झाल्यावर त्या बालकाने आचार्यांकडे संन्यास घेण्याची इच्छा व्यक्त केली. तशी प्रार्थना केली. आचार्यांनी त्याला संन्यास दिला व त्याचे नाव “हस्तामलक” (म्हणजे तळहातावरील आवळया सारखे विश्व पाहणारा!) असे ठेवले. प्रभाकर व त्याची पत्नी यांना आसमान ठेंगणे वाटू लागले.

आचार्यांची विजयपताका प्रयागच्या चारी दिशांना फडकू लागली. प्रभाकरा सारख्या सुविख्यात मिमांसकानेही आचार्यांचे शिष्यत्व पत्करल्याची वार्ता सर्वत्र पसरली. त्यामुळे सर्व सामान्यच काय पण वेदान्तीही आचार्यांकडे येऊन त्यांना आपले मोक्षगुरु मानून दीक्षा घेऊ लागले. घरोघरी अनेक चित्रकारांनी आचार्यांची विविध चित्रे रंगवायला सुरुवात केली. परिणाम असा झाला कीं प्रयागच्या सर्व परिसरांत आचार्यांचा जयघोष आकाशांत दुमदुमू लागला. घरोघरी आचार्यांचा प्रतिमा स्थापन होऊन त्यांनी राचालेली विविध स्तोत्रे भक्ती भावाने गायली जाऊ लागली. परमेश्वराच्या भक्तीचा पूर लोटू लागला तो आचार्यांच्या स्तोत्रांनी! वैदिकधर्माचे पुनरुज्जीवन झाले. अनेक बुद्धपंथीय वेद प्रमाण मानून आचार्य जे सांगतात ते प्रमाण मानू लागले.

प्रकरण १५ वे

# कौशांबीतला चमत्कार

आचार्य श्रीवल्लीहून कौशंबीकडे निघाले. कौशंबीला त्या काळांत अनन्य साधारण महत्व प्राप्त झालेले होते. कारण युधिष्ठिराच्या नंतर आठव्या पिढीत नेमिचक्र हा राजा हस्तिनापुरांत राज्य करीत होता. त्याच्या कारकिर्दीत यमुनेला प्रचंड महापूर आला व त्या पुराने संपूर्ण हस्तिनापुर उध्वस्थ झाले. म्हणून नेमिचक्र राजाने आपली राजधानी कौशांबीला स्थापन केली. पुढे नेमिचक्रच्या चवथ्या पिढीत सुषेण नामक महापराक्रमी राजा झाला. तो चक्रवर्ती म्हणून मान्यता पावला. त्यामुळे कौशांबी भरभराटीस आली. क्षेमक हा कुरुकुलातला शेवटचा राजा. त्यानंतर कौशांबी जरी राजधानी राहिली नव्हती तरी ते एक महत्वाचे शहर गणले जाऊ लागले. त्या कौशांबीत आचार्य आले. प्रथम ते कौशांबीच्या ग्रामदेवतेचे म्हणजेच मुकांबिकेच्या मंदिरात आले. मुकांबिकेला त्यांनी भक्तिभावाने पण नि:शब्द वंदन केले. कोणतेही नवीन स्तोत्र न करता केलेले हे पहिलेच वंदन होते. बरोबर असंख्य शिष्य होते. त्यांना मोठे आश्चर्य वाटले. आचार्य प्रदक्षिणा करून पुन्हां एकवार साष्टांग नमस्कार करून बाहेर बाहेर पडले.

कौशंबीच्या एका गल्लीतून जाताना त्यांच्या कानावर अत्यंत करुण विलापाचा ध्वनी आला. ज्या घरातून तो विलाप येत होता तिथे ते क्षणभर थांबले. करुण स्वरांत कोणी तरी मुकांबिकेला म्हणत होते “आई मुकांबिके कां अशी निष्ठुर झालीस. आम्ही तुझ्या चरणी आश्रय घेतला. तो तुझ्या कृपेसाठीच नां? मग अशी अवकृपा होण्या इतपत आमचा काय अपराध झाला? हे कृपावंते तूंच जर अशी निष्ठुर झालीस तर आम्ही कोणाला आळवायचे?” आणि अत्यंत करुण स्वरांत तो वृद्ध गृहस्थ रुदन करू लागला. देवीशी अशाप्रकारे बोलून विलाप करणाऱ्याचे दुःख

तरी काय असावे हे जाणून घ्यावे म्हणून आचार्य घरांत जाऊ लागले. जमलेल्या व खिन्न झालेल्या इतर लोकांनी आदराने आचार्यांना वाट करून दिली. "भूतदयां विस्तारय____" अशी प्रार्थना करणाऱ्या आचार्यांना दया उत्पन्न होणे अगदी स्वाभाविकच होते. आत येतांच त्यांना एक वृद्ध दंपती शोक करताना दिसली. मुकांबिकेच्या कृपेने त्यांना वृद्धापकाळात पुत्ररत्न प्राप्त झाले होते. पण बालपणीच त्याला मृत्यू आलेला होता. त्या पुत्राचे प्रेत समोरच पडले होते. आचार्य गंभीर होते. सांत्वना देण्यासाठी आचार्य त्या बालकाच्या पित्याला म्हणाले, " अरेरे! फारच दुर्दैवी घटना आहे. प्रारब्ध बलवत्तर असते. आपण किती काल शोक करणार? घडलेली घटना खरेच दुर्दैवी आहे! आपण शोक आवरा. " आचार्य हे त्यांत हळुवारपणे व प्रेमाने म्हणाले. त्यावर तो वृद्ध गृहस्थ किंचित् काल आचार्यांकडे पाहून म्हणाला, "प्रभो! आपण संन्यासी आहात. आपण अत्यंत तेजस्वी आहात. माझ्या समोर जणू भगवान् शिवशंकरच्या स्वरूपांत आपण आला आहात. पण प्रारब्ध म्हणून माझे कसे समाधान होणार? प्रारब्धाचा क्षय व्हावा म्हणूनच भगवद्भक्ती वेदशास्त्रांत प्रमाण मानली आहे. मला मुल नव्हते. ते मुकांबिकेच्या कृपाप्रसादाने उशिरा कां होईना पण प्राप्त झाले. तिच्याच कृपेचे हे फळ. पुत्र पौत्र धनंधान्यं हस्त्यश्वादिगवे रथम् | प्रजानां भवसी माता आयुष्मन्तं करोतु मे || हे श्रीसूक्तातच आहे नां? त्यांतच "भवन्ति कृतपुण्यानां भक्तानां श्रीसूक्तं जपेत् ||" असेही म्हटले आहे. मग हे पुण्य काय उपयोगाचे? त्यांतच शेवटी असा आशीर्वादही दिला आहे "श्रीवर्चस्वमायुष्यमारोग्यमाविधाच्छोभमानं महीयते | धान्यं धनं पशुं बहुपुत्रलाभं शतसंवत्सरं दीर्घमायु: ||" देवा! फक्त प्रारब्धच प्रमाण मानायचे असेल तर मग ही असली स्तोत्रे व देव-देवतांची मन:पूर्वक पूजा करण्याची तरी काय गरज होती? मी व माझ्या पत्नीने सद्धर्म व सदाचार कधी सोडलेला नाही. " पुन्हां उसासा टाकून तो वृद्ध म्हणाला, "हे प्रभो! ज्या दुःखात मी व माझी पत्नी आहोत त्या

दुःखाने आमची आतडी पिळवटली जात असताना प्रारब्ध कसे प्रमाण मानू? आपल्या शास्त्रांत अनेक फलश्रुती सांगितलेल्या आहेत. बालपणापासून त्या मनावर ठसल्यावर प्रारब्ध उणे असल्यावर त्या त्या काम्यव्रतांना अनुसरणे हे अयोग्य मानायचे कां? अहो मला मृत्यू येता तर काही प्रश्न नव्हता. कारण अचेतन देहाला काही संवेदना उरत नाहीत. पण ज्याच्या बाललीलांनी मन हर्षित होत होते, जो कुलदीपक म्हणून वावरत होता. सुखवीत होता. आतां आपल्या मृत्यूनंतर आपले और्ध्वदेहिक करण्यास कोणी तरी आहे ही धारणा आमच्या मनांत बळावली होती. त्या भावनेलाच आई मुकांबिकेने तडा दिल्यावर आपण सांगत असलेला प्रारब्धाचा वेदांत कसा बरे रुचावा? आपण मला क्षमा करा. . . " असे म्हणून पुत्राच्या अंगावर पडून तो वृद्ध "बाळा! अरे, असा कसा निष्ठुर झालास रे? एकदा अगदी फक्त एकदां तरी मला घट्ट मिठी मार रे. . . . . "त्या वृद्धाचे सगळे अंग गदागदा हालत होते. बालकाचा नुकताच मृत्यू झालेला होता. त्याची ती करुण अवस्था पाहून आचार्यांच्या नेत्रांतूनही अश्रू टिपकले. त्यांना "अहंन्यम्ब रात्रिसमये समयांतरे वा. . . " हा संवाद आठवला. आचार्य भावविवश झाले. आचार्यांच्या मनांत त्या वृद्ध दम्पती बद्दल करुणा उत्पन्न झाली आणि ते मुकांबिकेची प्रार्थना करू लागले,

भवानि स्तोतुं त्वां प्रभवति चतुर्भिर्न वदनैः
प्रजानामीशानस्त्रिपुरमथनः पञ्चभिरपि।
न षड्भिः सेनानीर्दशशतमुखैरप्यहिपति-
स्तदामन्येषां केषां कथय कथमस्मिन्नवसरः॥१॥

हे आई भवानी, तुझी स्तुती जिथे चतुर्मुख ब्रह्मा, पंचमुखी शिव, षण्मुखी कार्तिकेय व सहस्त्रमुखी शेष ह्यांनाही जमत नाही तिथें ती इतरांना कशी जमेल बरे? पण

कृपापाङ्गालोकं वितर तरसा साधुचरिते
न ते युक्तोपेक्षा मयि शरणदीक्षामुपगते।
न चेदिष्टं दद्यादनुपदमहो कल्पलतिका
विशेषः सामान्यैः कथमितरवल्लीपरिकरैः॥१०॥

हे सदाचारी सज्जनांचे कल्याण करणाऱ्या माते, मी तुला शरण आल्यावर तूं माझ्याकडे दुर्लक्ष करणे योग्य नाही. तूं तत्काळ तुझ्या कृपेचा कटाक्ष माझ्यावर टाक. (हा ब्राह्मण म्हणतो त्या प्रमाणें) इच्छिलेली गोष्ट जर तूं देणार नसशील तर कल्पतरू व इतर झुडपे यांत काय फरक आहे बरे?

वसन्ते सानन्दे कुसुमितलताभिः परिवृते
स्फुरन्नानापद्मे सरसि कलहंसालिसुभगे।
सखीभिः खेलन्तीं मलयपवनान्दोलितजले
स्मरेद्यस्त्वां तस्य ज्वरजनितपीडापसरति॥२०॥

वसंतऋतूने बहरलेल्या वेलींनी वेढलेल्या, कलहंसांच्या रांगांनी भालेल्या विविध कमले फुललेल्या आणि मलयपर्वतावरून येणाऱ्या वाऱ्याने निर्माण होणाऱ्या लाटांच्या मानससरोवरांत तूं आपल्या सख्यांसह क्रीडा करीत असतेस, अशा तुझे स्मरण करणाऱ्यांची संसारतापापासून होणारी पीडा दूर होते. (ती तूं ह्या वृद्ध दंपतीचे दुःख जाणून दूर कर. ) आचार्यांनी अशी प्रार्थना करून त्या बालकावरून आपली अमृत दृष्टी फिरवली. त्याबरोबर ते बालक झोपेतून जागे व्हावे तसे जागे झाले व आपल्या पित्याला त्याने घट्ट मिठी मारली. त्या वृद्ध दम्पतीच्या नेत्रांतून वाहणाऱ्या दु:खाश्रूंचे आनंदाश्रूत रुपांतर झाले. त्या दंपतिने आपल्या पुत्रासह आचार्यांच्या चरणावर मस्तक ठेवले.

प्रकरण १६ वे

# कुमारीलभट्ट व आचार्य भेट

हा हा म्हणता ही बातमी कौशांबित पसरली. अनेक विद्वान व अधिकारी आचार्यांच्या दर्शनास आले. आचार्य वैदिक सनातन धर्माचे पुनरुज्जीवन करीत असल्याचे लक्षांत घेऊन त्यांतल्या काही अधिकारी लोकांनी आचार्यांना सिद्धपुरला जाऊन कुमारील भट्ट यांना भेटण्याची प्रार्थना केली. कारण कुमारील भट्ट यांनी राजा सुधन्व्याच्या द्वारकेच्या दरबारांत जैनपंथीय आचार्यांचा पराभव करून राजाला वैदिक धर्माचे महत्व पटवून दिले आहे. त्यामुळे राजाश्रय प्राप्त झाला आहे. पण आता कुमारील भट्ट हे तुषाग्निभक्षण करण्याच्या तयारीत असल्याचे समजते. आपण त्यांचे मतपरिवर्तन करून त्यांना वाचवावे.

आचार्यांनी तत्काळ सिद्धपुरला जाण्याचा निर्णय घेतला. कौशांबीतील अनेक विद्वान मंडळी आचार्यांसह निघाली. पद्मपादाचार्य व चित्सुखाचार्य हे आचार्यांना क्षणभरही अंतर देत नव्हते कारण आचार्यांमुळे वैदिक सनातन चर्माचे होणारे पुनरुज्जीवन जैन आचार्यांना अस्वस्थ करू लागले होते. त्यांना अनेक विरोधक निर्माण झाले होते. पद्मपादाचार्य हे बालपणापासून नृसिंहाचे उपासक होते. त्यांची नृसिंहउपासना उत्तरोत्तर वाढतच चालली होती. आपल्या उपास्यदेवतेची प्रार्थना करताना पद्मपादाचार्य न विसरता आचार्यांना संरक्षण देण्यासाठी नृसिंहांची प्रार्थना करीत असत. पद्मपादाचार्य यांचे मामा दिवाकर हे प्रभाकराचार्य यांचे शिष्य. प्रभाकराचार्य हे कुमारील भट्ट यांचे शिष्य. त्यामुळे पद्मपादाचार्यांना कुमारीलभट्ट यांच्या बद्दल बरीच माहिती होती. त्यांत काशी-प्रयाग-श्रीवल्ली इत्यादी ठिकाणाहून व विशेषत: कौशांबीतील कुमारील भट्टांच्या अनेक शिष्यांकडून खूपच माहिती मिळाली होती. ते आज ६४ वर्षांचे असून आचार्यांपेक्षा ४८ वर्षांनी वडील आहेत. कुमारील भट्ट यांनी अलौकिक कार्य केले होते. कुमारील भट्ट यांना वैदिक सनातन धर्मच अभिप्रेत होता. प्रथम त्यांनी वेदाध्ययन करून कर्मकांड-मंत्र-तंत्र आत्मसात

केले. त्यांच्या काळात उत्तरेकडे जैनांचे प्राबल्य खूपच वाढलेले होते. त्यांना जैन पंथाचा जराही द्वेष नव्हता. कारण जैन वैदिक मंत्राचेच पठण करीत असत. पण तेच मंत्र ते निरीश्वरवादासाठी वापरून आकारण चातुर्वण्यावर हल्ला चढवीत असत. अहिसेच्या नावाखाली यज्ञाला विरोध करीत असत. त्यामुळे सामान्यजन संशयग्रस्त होई. पूर्वीच्या जैन आचार्यांनी राजे लोकांवर छाप पाडून जैनपंथाला राजाश्रय मिळवून दिला होता. त्यामुळे अधिकच गोंधळ होऊ लागला. त्यांतलाच राजा सुधन्वा. हा भगवान् श्रीकृष्णांच्या द्वारकेचा राजा. कुमारील भट्ट यांनी आपल्या तपश्चर्ये नंतर मुद्दाम जैनपंथांच्या गुरूकडे जाऊन जैनपंथात प्रवेश केला होता. त्याकाळांत जैनपंथाच्या सर्वश्रेष्ठ गुरूंना महावीर मानत असत. आतां कुमारील भट्ट यांनी महावीरांचे शिष्यत्व स्वीकारले. त्यावेळी कुमारील भट्ट त्या महावीरांचे पट्टशिष्य झाले. पण काही काळानी त्या महावीरांचे निर्वाण झाले. त्यांच्या जागी दुसरे महावीर आले. ते आधीपासूनच कुमारील भट्टांचा द्वेष करीत होते. आता तर काय कुमारील भट्ट आयतेच त्यांच्या तावडीत सांपडले. त्यांनी कुमारील भट्ट यांना छळायला सुरुवात केली. ते कुमारील भट्ट यांना पटेना. कारण छळ म्हणजे हिंसाच असा महावीरांचाच सिद्धांत ते महावीरांना पटवून देण्याचा प्रयत्न करीत. त्यामुळें त्या महावीरांनी कुमारील भट्ट यांची जैन पंथातून हकालपट्टी केली. पण कुमारील भट्ट यांनी जितका काल जैनपंथात काढला होता तेवढ्या काळात त्यांनी जैनपंथांचे मूलभूत ग्रंथ अभ्यासले तेंव्हा त्यांच्या हे सहज लक्षांत आले कीं ही सर्व उपनिषदेच आहेत. ह्या उपनिषदां खेरीज वेगळ्या पद्धतीचे तत्त्वज्ञान प्रतिपादन करून लोकांना आपल्याकडे आकर्षित करण्याची कलाही इथे शिकवली जाते हे त्यांनी जाणले. ह्या सर्व गोष्टी लक्षांत आल्यावर त्या पंथात खरे नवीन शिकण्या सारखे काहीच नसल्याचे त्यांना कळले. त्यामुळे झालेली हकालपट्टी कुमारील भट्ट यांच्या पथ्यावरच पडली. कारण त्यांना जैन पंथाचे उच्चाटन करण्याची संधी हवी होती. आतां जैनपंथ सोडल्यावर मुक्त झालेले कुमारील भट्ट द्वारकेच्या राजा सुधान्व्याकडे गले. राजा सुधन्वा हा अत्यंत प्रजाहितदक्ष व विद्वानांचा आदर करणारा होता. तो

जैनांच्या प्रभावाखाली वाढला होता. कारण आधीच्या राजांनी जैन आचार्यांना मान देऊन दरबारांत त्यांची प्रतिष्ठा वाढवलेली होती. तीच परंपरा पुढे चालू राहिली. त्यामुळे सुधन्वा त्यांच्याच प्रभावाखाली वाढला. वैदिक धर्माचा आधारस्तंभ ठरलेल्या कुमारील भट्ट यांची कीर्ती त्यानेही ऐकली होती. त्यामुळे कुमारील भट्ट यांचे स्वागत केले. दरबारातच त्याने जैनयतींच्या समोर वैदिक धर्म व जैन पंथ याच्या तत्त्वां विषयी भट्टपादांशी चर्चा केली. त्यांत जैनयतींनी हिरीरीने भाग घेतला. राजा सुधन्व्यावर भट्टपादांची चांगलीच छाप पडली. बारीक लक्ष ठेवणाऱ्या भट्टपादांच्या नजरेतून ही गोष्ट सुटली नाही. त्यांनी राजा सुधन्व्याला उद्देशून कोकिला न्यायोक्तीने एक श्लोक म्हटला.

"मलीनश्चेन्न संगस्ते नीचैः काककुलैः पिक |
श्रुतिदूषकानिनिऱ्हादैः श्लाघनीयस्तदा भवे ||"

"हे कोकीळा! ह्या कर्णकटू गोंगाट करणाऱ्या नीच श्रुति दूषक कावळ्यांशी तुझा संपर्कच नसता तर तूं किती प्रशंसनीय झाला असतास!" हे ऐकून राजा सुधन्वा किंचित हसला. त्याच क्षणी जैन यती अत्यंत संतप्त झाले. त्यांनी ओरडून आपला निषेध व्यक्त केला. राजाला सांगून भट्टपादांना वाद-विवादासाठी आव्हान दिले. भट्टपादांनी ते लगेच स्वीकारले आणि वाद-विवादांत भट्टपादांनी सर्व जैनयतींची दाणादाण उडवून दिली. जैनयती चांगलेच गोंधळात पडले व त्यांची आपसातच चर्चा सुरु झाली. ह्या संधीचा फायदा भट्टपादांनी घेतला व राजाला सनातन वैदिक धर्माचे विचार पटवून दिले. राजाच्या प्रत्येक प्रश्नाचे समर्पक व निःसंदिग्ध उत्तर देऊन राजाचे पूर्ण समाधान केले. राजा अत्यंत प्रसन्न झाला. आपल्याला ह्या जैनयतींनी चक्क पाखंडी बनवल्याचे त्याच्या लक्षात आले. तो मनातून अत्यंत संतापला. पण विवेकाने आपला संताप आवरला. दरबारांत जैनांचा असाधारण प्रभाव असल्याचे लक्षांत घेऊन त्याने या वादाचा निकाल वेगळ्या पद्धतीने लावायचा ठरवला. प्रथम राजाने दरबारांत शांतता प्रस्थापित केली. आपल्या प्रधानाला बोलावून गुप्तपणे एका घागरीत एक विषारी सर्प घालून ती घागर दरबारांत सिहासनासमोर पालथी ठेवायला

सांगितली. तशा प्रकारे दरबारात सिंहासना समोर घागर पालथी घालण्याचे कार्य प्रधानाने अत्यंत गुप्तपणे पार पाडले. मग राजाने विचारले कीं जैनयती व कुमारील भट्ट यांनी केलेल्या वादाचा निर्णय ह्या घागरीखाली काय आहे हे ओळखण्याने होईल, यास दोघांची मंजुरी आहे कां? ह्यावर जैनयतींनी आज फार उशीर झाला आहे. आम्ही उद्या सकाळी ह्याचे उत्तर देऊ. कुमारील भट्ट यांनीही त्याला मान्यता दिली. दरबार संपला.

जैनयतींचे हेर जागो जागी राजाच्या प्रत्येक हालचालीवर नजर ठेवण्यासाठी जैनयतींनी नेमलेले होते. त्यांच्या कडून जैनयतींनी माहिती काढून घेतली व निश्चिंत झाले. दुसऱ्या दिवशी दरबार भरल्यावर प्रथम जैनयतींनी उत्तर दिले कीं 'राजा, या घागरीखाली एक विषारी सर्प आहे. ' राजाने कुमारील भट्ट यांना विचारले. तेंव्हा कुमारील भट्ट म्हणले, 'ह्या घागरी खाली शेषशायी भगवान् श्रीविष्णुंची सुवर्णाची मूर्ती आहे. राजा अत्यंत खिन्न झाला. कारण आता कुमारील भट्टांना आपला पराभव मान्य करावाच लागेल. आपण काहीही करू शकणार नाही. राजाने सेवकांना घागर उचलण्याची आज्ञा दिली. घागर उचलताक्षणीच राजा थक्क झाला. कारण घागरी खाली चक्क भगवान् श्रीविष्णुंची शेषशायी सुवर्णाची मूर्तीच निघाली. ते आश्चर्य पाहून प्रमुख जैनयतीने दरबारातून पळ काढला. पाठोपाठ त्याच्या अनुयायांनी त्याचे अनुकरण केले व ते सर्व पळून गेले. द्वारकेत पुनश्च वैदिक सनातन धर्माचे पुनरुज्जीवन झाले.

अशाप्रकारे कुमारील भट्टांनी विविध भागात कार्य करून सर्वत्र विजय संपादन केला. पण मध्यंतरी आपण जैनगुरुंशी प्रतारणा केली ह्याचे शल्य कुमारील भट्ट यांना बोचत होते. त्यामुळें गुरुद्रोहाच्या पातकातून मुक्त होण्याचा त्यांनी निश्चय केला. त्या पापाचे क्षालन तुषाग्निने होईल म्हणून त्यांनी सिद्धपूरला तुषाग्निभक्षणाचा कार्यक्रम करून जीवनाची इतिश्री करावयाची ठरवली. त्यांनी संध्यावंदनइत्यादी करून मग प्रायश्चित्त विधी पूर्ण केले. भट्टपाद तुसाच्या ढीगात मध्यभागी बसले. ढिगाच्या बाहेर उभ्या असलेल्या ब्राह्मणांना त्यांनी इशारा केला. ब्राह्मणांनी मंत्रपूर्वक अग्नी दिला.

भट्टपादांनी डोळे मिटून घेतले. इतक्यांत आचार्य तिथें पोहोचले. आचार्यांनी उच्चरवांत त्यांना हांक मारली. आचार्य म्हणाले, “ हे भल्या ब्राह्मणा! थांब. आपल्या जीवनाचा अंत करू नको. वणवा अद्याप पेटलेला नाही तोवर बाहेर ये. तूं अद्याप सुरक्षित आहेस.” ह्याच वेळी आचार्यांच्या बरोबर असलेल्या प्रभाकराचार्यांनीही हृदय पिळवटून हांक मारली व म्हणाले, “हे गुरो ! थांबा! शंकराचार्यांचे ऐका!” हा पाळया शिष्याचा आवाज ऐकून भट्टपादांनी डोळे उघडले. समोर शंकराचार्यांना पाहून म्हणालें “मी जैनगुरूंशी प्रतारणा केल्याचे हे प्रायश्चित्त घेत आहे. काम काय आहे ते सांग!” प्रभाकराचार्यांनी थोडक्यात आचार्यांचे कार्य सांगितले, तेंव्हा भट्टपादांनी आचार्यांना सांगितले कीं कीं तूं महिष्मती नगरीत जा तिथें माझा मेव्हणा मंडन मिश्र आहे. त्याला तूं वादात हरवून घे म्हणजे तूं सर्वत्र विजयी होशील व धर्मस्थापना होईल. माझे जीवनकार्य आतां संपले आहे. ” भट्टपाद इतके बोलून थांबले. त्यांनी डोळे मिटून घेतले. इतक्यात अग्निदेवांनी आपल्या ज्वालेच्या लोटानें त्यांची आहुती घेतली. अग्निज्वाळांचा लोट एक तेजस्वी ज्योत घेऊन अंतराळात झेपावला. अत्यंत विषण्णतेने आचार्यांनी हात जोडले. त्यांचे अनुकरण इतरांनी केले. एक तेजस्वी जीवन तेजांत मिसळले गेले. . . . . .



प्रकरण १७ वे

# मंडन मिश्र व आचार्य

आचार्यांना आतां महिष्मती नगरीला जाण्या खेरीज पर्याय उरला नाही. मंडन मिश्र हा एक प्रचंड मोठी वेदशाळा चालवीत होता. विद्यार्थ्यांना तो कर्मकांडांचे शिक्षण देऊन त्यांना पक्के कर्मठ बनवत होता. त्यामुळे प्रभाकराचार्या सारखे अनेक आचार्य त्याने निर्माण केले होते. मंडन मिश्राचे राजा सुधन्व्याच्या दरबारी वजन होते. राजा मंडन मिश्राला फार मानत असे. कारण एक तर मंडन कुमारील भट्टपादांचा मेव्हणा होता. त्यातून अत्यंत विद्वान आणि अफाट संयोजक शक्ती असलेला बुद्धिमान प्रशासक होता. परमार्थाच्या बाबतीत तो अगदी अनभिज्ञ होता. किंबहुना तो त्याला रुचतच नव्हता. कर्मकांड करून यज्ञयाग करावेत अमाप ऐश्वर्य प्राप्त करून घ्यावे व सुखेनैव जीवन व्यतीत करावे अशा मतांचा तो होता. त्याकाळात मंडन इतका प्रसिद्ध झाला होता कीं त्या भागातील नागरिक मंडनचे, मंडनच्या नगरीचे, मंडनच्या विद्यापीठाचे एका श्लोकांत वर्णन करीत असत. ते असे,

“यस्या: पुरा राजति धर्ममूला या क्षालयन्ती चरणौ सादास्या: |
महिष्मती मंडन मंडिता सा यत्रास्ति तारा भुवनस्य तारा ||”

“ज्या नगरी समोरून धर्ममूला नदी त्या नगरीचे सदैव चरणक्षालन करीत वाहात असते अशा ह्या महिष्मती नगरीला मंडनपंडिताने मंडित केले असून तिथें या भूतलाला लखलखत्या ताऱ्या प्रमाणे शोभायमान करणारे त्याचे तारा विद्यापीठ आहे. ”

त्यामुळें “तारा विद्यापीठाचा” मंडन कुलपती होता हे आचार्यांच्या ध्यानी आले. आचार्यांच्या सर्व शिष्यांचे कुतूहल जागे झाले. महिष्मतीकडे वाटचाल करीत असताना पद्मवन नामक उपनगरांत मंडन मिश्र यांचेच राज्य असल्याचे जाणवत होते. अर्थात तेथील राजाने ते नगर मंडन मिश्रांना अग्रहार म्हणूनच दिले होते. ह्या नगरीतून जाताना एका ब्राह्मणाला आचार्यांनी मंडन मिश्र कोठे राहतात असे विचारले.

त्यावेळी मोठ्या आदराने त्याने सांगितले, “धर्ममूलानदीच्या कंठाने आपण महिष्मतीला जा. तिथें एक प्रचंड मोठी आमराई आहे. गर्द झाडीत अनेक पाठशाला दिसतील. त्या सर्वांत उठून दिसणारी सतरा अठरा हात उंच व्यासपीठ असलेली भव्य शाळा दिसेल. त्या सर्व परिसराचा विस्तार खूप मोठा व रमणीय आहे. त्यांतच एक शंभर खांब असलेला प्रचंड मोठा वाडा आहे. त्याच्या चारी बाजू भिंतीनी संरक्षित आहेत. बाहेर प्रशस्त ओटे असून तिथें असंख्य पोपटाचे पिंजरे टांगलेले आहेत. त्या पिंजऱ्यातले पोपट सदा तत्त्वचर्चा करीत असतात. या वर्णना वरून आपण मंडन मिश्रांचे घर सहज ओळखू शकाल. त्याच्या घराकडे जाताना आपल्याला फरसबंद रस्ता लागेल. ” एका दमात केलेले हे सुरेख वर्णन ऐकून आचार्यांसह त्यांच्या शिष्यांना मोठेच कौतुक वाटले. आचार्य पद्मपादाचार्यांना सहज म्हणाले, “हा मंडन पंडित मोठा कुशल संघटक व प्रशासक दिसतो!” बोलत बोलत ते धर्ममूला नदीच्या कंठाने चालत होते. बराचवेळ चालल्यावर नदीवरून काही रजक स्त्रिया धुतलेल्या कपड्यांचे भारे डोक्यावर घेऊन येताना दिसल्या. त्यांना आचार्यांच्या पुढें असलेल्या शिष्यांनी मंडन पंडितांच्या घराचा पत्ता विचारला. तेंव्हां तो मार्ग बोटाने दाखवीत त्या म्हणाल्या,

“स्वत: प्रमाणं परत: श्रुति सा फलप्रदां कर्मफलप्रदोऽत:|
जगद् ध्रुवं स्यात् जगदध्रुवं स्यात् कीराङ्गना यत्र गिरंगिरन्ति |
द्वारस्थनिडान्तरसंनिरुद्धा: जानीहि तत् मंडन पण्डितौक: ||

असे उत्तर दिले. “वेद हे स्वत:च प्रमाण आहेत कीं त्यांना काही आधार आहे? कर्म केल्यामुळे फल मिळते कीं प्रारब्धाने मिळते? जग शाश्वत आहे कीं अशाश्वत आहे? दरवाजा समोर टांगलेल्या पिंजऱ्यातल्या मैना जिथे अशा प्रकारची बडबड करताना आढळतील तेच घर मंडन पंडिताचे आहे हे नक्की समजा. ” शिष्य आश्चर्य चकित झाले. हा सारा मंडन पंडिताचा प्रभाव. समाजाच्या सर्व स्तरावर हा प्रभाव पडलेला आहे हे सहज लक्षांत आले.

सर्व मंडळी ऐन माध्यान्ही आचार्यांसह मंडन मिश्रांच्या घरा समोर आली. घराचे दरवाजे बंद होते. आचार्यांनी रक्षकांकडे चौकशी केली. त्यांना कळले कीं मंडन मिश्रांच्याकडे वडिलांचे वर्ष श्राद्ध आहे म्हणून कोणालाही आत सोडायचे नाही अशी रक्षकांना आज्ञा आहे. आचार्यांनी आपल्या सर्व शिष्यांना गांवांत भिक्षाटना साठी पाठवून दिले. आचार्य स्वत: योगमार्गाने मंडन मिश्रांच्या घरांत ब्राह्मणांच्या पंक्तीत बसले. मंडन त्यावेळी ब्राह्मणाचे पाय धूत होता. सर्व ब्राह्मणांचे पाय धूत मंडन आचार्यांच्या पायाजवळ आला. आचार्यांची कोमल पाउले पाहून त्याने आचार्यांच्या चेहऱ्याकडे पाहिले. आचार्य संन्यासी. मंडनला तर संन्याशांबद्दल राग. त्यांतून हा संन्यासी ऐन श्राद्धाच्यावेळी टपकलेला. घरांत येण्याचे मार्ग बंद केलेले असताना हा आलाच कसा? द्वाररक्षक अवज्ञा करणेच शक्य नाही. मग आला कसा? मंडनला आधीच राग आलेला त्या रागाच्या भरातच त्याने संन्याशाला उपहासाने विचारले,

"कुतो मुण्डी?" मंडनने मुण्डी, म्हणजे बोडख्या कुठून आलास? अशा अर्थाने विचारले. पण आचार्यांनी मंडनला अभिप्रेत अर्थ न घेता "बोडखे कुठून केलेस?" अशा अर्थाने घेऊन उत्तर दिले.

"आगलान् मुण्डी"`` गळयापासून वर सर्व मुंडनच केलेले आहे. संतापलेल्या मंडनांनी असे विचारण्यात अर्थ नाही म्हणून सरळ विचारले,

"पन्थानं पृच्छते मया" आचार्यांनी ह्याही वाक्याचा मंडनला "मी मार्गास विचारले" (म्हणजे कोणत्या मार्गाने आलास) हा अभिप्रेत अर्थ न घेता मार्गास म्हणजे मार्गाला म्हणजे 'ह्याला, त्याला तसे मार्गाला'असा अर्थ घेऊन मंडनलाच प्रतिप्रश्न केला,

"किमुत्तरितं तेन |" "मग मार्गाने तुला काय उत्तर दिले बरे?"आता मात्र मंडन चिडला व म्हणाला,

"किमु सुरा पिता" "काय दारू प्यालास काय?" हा मंडनला अभिप्रेत अर्थ न घेता आचार्यांनी "दारू पिवळी असते कां?" हा अर्थ घेऊन उत्तर दिले,

“न तु पीत रक्ता एव|” छे छे दारू पिवळी कुठली ती तर लाल असते. ”आचार्यांच्या ह्या उत्तरावर आचार्यांचा उपहास करावा ह्या उद्देशाने मंडन म्हणाला,

“तर्हि वर्णम् ज्ञायते भवता” अरेवा:! म्हणजे तुला संन्याशाला दारूचा रंग माहिती आहे तर!” ह्यावर आचार्यांनी लगेच प्रतिटोला दिला.

“वर्णेव मया परिणतिस्तुभवतैव |” मला फक्त वर्णच माहिती आहे पण तुला तर त्याच्या परिणामचेही ज्ञान आहे. (म्हणजे तूं अनुभवी दिसतोस!) वेगळ्या प्रकारे पाणउतारा करण्याच्या दृष्टीने मंडन म्हणाला,

“किं जडधाम|” “मूर्ख आहेस कां?” हा मंडनचा अभिप्रेत अर्थ न घेता ‘जडधामचा’ वैदिकवाङ्मया प्रमाणे अर्थ घेऊन (म्हणजे शरीराचा धर्मच जडाचा असतो)

“जडत्वं प्रकृतेर्धर्म:|” जडत्व हा शरीराचा प्रकृती पासून झालेला धर्मच आहे. ह्यावर संतापून मंडन म्हणाला,

“किं मत्त: |” काय माजलास काय? हा सरळ अर्थ न घेता ‘मत्त:’ म्हणजे माझ्या पासून काय? असा अर्थ घेऊन मंडनला उत्तर दिले

“न मत्तो न त्वत्त: प्रकृतिस्तु परमात्मत: |” छे छे प्रकृती ना तो माझ्यापासून वा तुझ्या पासून झाली, ती झाली ती त्या परमात्म्यापासून झाली. इतके झाले तरी मंडन आचार्यांचा उपहास करण्याचे काही थांबवीना. त्याने पुन्हा विचारले,

“किं दुर्भगोसि|” “तूं काय दुर्भागी आहेस कां?” इथे आचार्यांनी संवादाला एकदम कलाटणीच दिली. आचार्य म्हणले,

“यत्यर्चा संहर्ति स एव दुर्भग: |” “आलेल्या अतिथीरुपी यतीचे स्वागत करण्यास कचरतो तोच शास्त्रात दुर्भागी म्हणून संबोधला जातो. ” आचार्यांचे हे उत्तर ऐकून मंडन वेगळ्या प्रकारे उपहास करण्यासाठी म्हणाला,

“किंमनाहुतो दुषकोसि |” “आगंतुकासारखे न बोलावता आलास तो आलास ते काय दोष काढायला?” ह्यावर आचार्यांनी अगदी मार्मिक उत्तर दिले कीं

ते ऐकून इतकावेळ खमंग संवाद ऐकणारे पुरोहित ब्राह्मण विचारांत पडले. आचार्य म्हणाले,

“अरिवर्ग पीडितस्याप्रार्थित एव विष्णुरतिथि: स्यात् |” “काम क्रोधादी षड्रिपूंनी जे पछाडलेले असतात त्यांना साऱ्या मानापमानाची व बोलावण्याची इत्यादीची आवश्यकता असते. तेच निमंत्रणादीची चौकशी वा उहापोह करतात. पण सज्जनांच्या दृष्टीला आलेला अतिथी हा विष्णुरूपच भासतो. ते त्याला पूज्य मानतात.

हे ऐकतांच मंडन काही बोलण्याच्या आतच मुख्ययाज्ञिक उद्गारले,

“ अक्रोधनै: शौचपरे: सततं ब्रह्मचारिभि: |
भवितव्यं भवद्भिश्च मया च श्राद्धकर्मणि ||”

“श्राद्ध कर्माच्या प्रसंगी तुम्ही आणि मी क्रोध न येऊ देता, शरीर आणि मन पवित्र ठेवून ब्रह्मचर्याचे पालन करावयाचे आहे. ” हे ऐकताच मंडन मिश्र तत्क्षणी आपला क्रोध आवरून आचार्यांची पाद्यपूजा करून मोकळा झाला. आचार्यांना विष्णुंच्या नावाने संकल्पून ठेवलेल्या केळीच्या पानावर बसवले. घरांतल्या आतल्या बाजूस असलेल्या मंडन मिश्रांच्या पत्नीने म्हणजेच कुमारील भट्टपादांच्या बहिणीने हा सर्व संवाद श्रवण केला होता. आचार्य केवळ १६ वर्षाचे होते. अत्यंत तेजस्वी दिसत होते. भारती म्हणजे मंडन मिश्रांची पत्नी. तिच्या मनांत आचार्यांच्या बद्दल आदरयुक्त मातृवत्सल प्रेमभाव उत्पन्न झाला. कां व कसा? ते तिलाही कळले नाही. श्राद्धविधी पूर्ण झाला. घरातील सर्वांची जेवणे झाली. मग आधीच संतापलेल्या मंडन मिश्रांनी आचार्यांना त्यांच्या येण्याचे कारण विचारले. पण ते कारण विचारण्या पूर्वी त्यांनी आचार्यांना एक कडवट प्रश्न विचारला,

“कंथां वहसि दुर्बुद्धे गर्दभेनापि दुर्भरान् |
शीखायज्ञोपविताभ्यां कथं भारो भविष्यति ||”

"अरे दुष्टबुद्धीच्या मनुष्या गाढवालाही ओझे होईल अशी गोधडी खांद्यावर घेऊन हिंडतोस तुला काय शेंडी आणि यज्ञोपवीताचा भार झाला काय?" ह्यावर आचार्यांनी त्याच्याच शब्दांत त्याला आहेर दिला,

"कंथां वहामि दुर्बुद्धे तव पितरादि दुर्भराम्।
शीखायज्ञोपविताभ्यां श्रुतिभारो भविष्यति ॥"

अरे दुष्टबुद्धीच्या मनुष्य तुझ्या बापजाद्यांना ओझे झालेली ही गोधडी मी वाहतो आहे. पण तुझ्या सारख्यांच्या शेंडी आणि जानव्याचा मात्र तुमच्या कोरड्या कर्मकांडांनी वेदांना मात्र असह्य भार झालेला आहे. " आचार्य बोलण्यात अत्यंत पटाईत व हजरजबाबी आहेत हे जाणून मंडन विचारांची जुळवाजुळव करू लागला. तेवढ्या वेळांत आचार्यांनी शब्दछळ करून आपले कार्य साधणार नाही ह्या सूज्ञ विचाराने बोलायला सुरुवांत केली, म्हणाले, "मी आपले गुरु कुमारील भट्टपाद यांच्या सांगण्यावरून इथे आलो आहे. भट्टपादांनी तुषाग्निभक्षण करून प्रायश्चित्त घेतले आहे. ते आतां ह्या जगात नाहीत. तुषाग्निभक्षणास बसले असताना त्यांची व माझी पहिली व शेवटची भेट झाली. त्यावेळी त्यांनी मला महिष्मतीस जाऊन मंडन मिश्राशी वेदांतावर चर्चा कर व वैदिक धर्माचा पाया भक्कम कर. असे सांगितल्यामुळे मी इथें आलो आहे!"

हे ऐकून मंडन मिश्र अत्यंत खिन्न झाले. आपल्या गुरूंचे स्मरण करून त्यांनी मनोमन कुमारील भट्टपादाचार्यांना कल्पनेने तुषाग्नित बसल्याचे दृश्य उभे करून वंदन केले. मग अत्यंत शांत व कातर स्वरांत ते आचार्यांना म्हणाले, "झाल्या गोष्टीची मी मन:पूर्वक क्षमा मागतो. मी आपला जो उपहास केला त्याचे मला वाईट वाटते आहे. आपण आतां मनमोकळे जे काही बोलायचे ते बोलावे. माझी चर्चा करण्याची तयारी आहे पण ही चर्चा म्हणजे वादविवादच होणार. त्याचा निर्णय कोण करणार?" ह्यावेळ पर्यंत सायंकाळ होत आली होती. आचार्यांचे सर्व शिष्य मंडन मिश्रांच्या निवासस्थानी आले होते. चित्सुखाचार्य, पद्मपादाचार्य, प्रभाकराचार्य असे ज्येष्ठ व श्रेष्ठ तसेच कौशांबीतले अनेक विद्वान व तेजस्वी शिष्य परिवार त्या निवासस्थानी

जमल्यामुळे महिष्मतीच्या नागरिकांचा तो एक कुतूहलाचा विषय झाला होता. कारण मंडन संन्याशाना थारा देत नसे हे सर्व महिष्मती जाणून होती. त्यामुळे असंख्य विद्वान नागरिक तिथे जमले होते. निवासस्थानाचा सगळा नूरच पालटला होता. मंडन मिश्रांच्या निवासस्थानी एकाच वेळी इतके संन्यासी जमणे म्हणजे आश्चर्यच असे महिष्मतीच्या नागरिकांना वाटत होते. मंडन मिश्र व त्याची पत्नी भारतीदेवी अत्यंत कुशल संयोजक असल्यामुळे व निवासस्थान भलेमोठे व प्रशस्त असल्यामुळें भारतीदेवीने सर्वांची विशेषाविशेष व्यवस्था मोठ्या कौशल्याने केली. आतां सर्वांच्या समोरच आचार्य व मंडन यांची चर्चा होऊ लागली. त्यात निर्णयाचा प्रश्न आलाच होता. आचार्यांनी त्यावर तोडगा काढला कीं निर्णय भारतीदेवीने करावा. वादविवादाला सुरुवांत दुसऱ्या दिवसापासून करावी. भारतीदेवी स्वत: अत्यंत विद्वान व वेदज्ञ होती. धर्म-अर्थ-काम व मोक्ष या चारही पुरुषार्थाची ती अधिकारी मीमांसकही होती. पण वादविवाद करण्याऱ्यात प्रत्यक्ष आपला पतीच आहे व दुसऱ्या बाजूला मानसपुत्र ‘शंकर’ आहे. त्यामुळे ती विस्मित होऊन स्तब्ध होती इतक्यात मंडनने स्वत:च अनुमती दर्शवून भारतीदेवीला आश्चर्यचकित केले. मौनानेच तिने त्या पदाचा स्वीकार केला.

महिष्मतीच्या नागरिकांना मंडन मिश्रांबद्दल प्रचंड आदर होता. आचार्यांच्या आगमनामुळे तो अधिकच वाढला. आता आपल्याला चिंतना ऐवजी ह्या दोन श्रेष्ठ पुरुषांच्या वादविवादातून सर्व शंकांचे निरसन करून घेता येईल, ह्या कल्पनेने ते आनंदले. प्रभाकराचार्यांसह इतर शिष्यही ही चर्चा ऐकायला उत्सुक होते. त्या सर्वांच्याच मनात आचार्यांबद्दल नितांत आदर होता आणि या चर्चेत आचार्यच विजयी होतील या बद्दल त्यांना शंकाच नव्हती. शिवाय आपण न विचारलेल्या प्रश्नांची उकल या वादातून नक्कीच होईल. त्यामुळे ही चर्चा म्हणजे एक ज्ञानयज्ञच वाटत होता.

दुसऱ्या दिवसाची मंगल प्रभात उगवली. मंडन आपले आह्निक, ब्रह्मयज्ञ इत्यादी आटोपून वाड्याच्या मुख्य व भव्य दालनांत आले. दोन सुंदर सुशोभित केलेली

उच्चासने समोर-समोर ठेवली होती. त्या दोन आसनांच्या मध्यावर मागल्या बाजूस साधे पण सुंदर आसन भारतीदेवीसाठी सज्ज केले होते. त्या भव्य दालनांत श्रोत्यांसाठी असंख्य आसनांची सोय केलेली होती. मंडन मिश्र, आचार्य व पाठोपाठ भारतीमाता यांचा त्या दालनात प्रवेश झाला. दालन श्रोत्यांनी फुलून गलेले होते. सर्व श्रोते उठून उभे राहिले व हात जोडून त्यांनी आपला आदर व्यक्त केला. वातावरण अत्यंत पवित्र पण खेळीमेळीचे होते. कोणताच ताण नव्हता. आचार्य व मंडन दोघेही आसनस्थ झाले. भारतीमातेने घवघवीत व ताज्या सुगंधी फुलांचे दोन हार आणले होते. वादविवाद सुरु होण्यापूर्वी एक आचार्यांच्या गळयांत व दुसरा मंडन यांच्या गळयांत घातला गेला. त्यानंतर भारतीमातेने सभेत सांगितले कीं वादविवाद चालू झाल्यावर ज्याच्या गळयांतला हार प्रथम सुकेल किंवा कोमेजेल तो वादांत हरला असे समजावे. असे सांगून ती आपल्या आसनावर स्वस्थ बसली.

वादविवादाला सुरुवांत करण्यापूर्वी आचार्यांनी भगवान् शिवाचे, आपल्या गुरूंचे, माता-पित्यांचे मनोमन स्मरण केले व मंडनच्या प्रश्नाची वाट पहात शांत बसले. थोड्याच वेळात मंडन यांनी आपले वंदन संपवून पहिला प्रश्न केला,

“वेदा विभिन्न: स्मृतयो विभिन्ना: ना ऽ सौ मुनि: यस्य मतं न भिन्नम् |
धर्मस्य तत्वं निहितं गुहायां महाजनो येन गत: स पन्था ||”

वेद वाङ्मयांत परस्पर विरोध सांपडतो, स्मृतींच्या बाबतीतही तसेच, शिवाय प्रत्येक मुनि वेगळी वेगळी मते मांडतो. त्यामुळे धर्म ह्या शब्दाची नेमकी व्याख्या काय आहे? दुसरे असे कीं ‘महाजन’ तरी नक्की कुणाला म्हणायचे? तिसरे, मुनिंना जर ईश्वरी साक्षात्कार घडत असेल तर मत भिन्नता कां? ह्या तीन गोष्टींची उकल झाल्यावर मगच पुढला मुद्दा विचारांत घेणे सोयीचे होईल. ” ह्यावर आचार्यांनी थोडक्यांत पण मंडनचे समाधान होईल असे उत्तर दिले.

आचार्य म्हणाले, “ वेद वाङ्मयांत परस्पर विरोध कोठेही नाही. पण पूर्वपक्ष व सिद्धांत अशा दोन गोष्टींच्यामुळे जर आपण तरतम भावातून चिंतन व मनन न करता फक्त शब्दार्थच पाहू लागले तर भिन्नता आढळेल. वेदांतच धर्माचे विवरण आहे.

धर्माचे तत्त्व हे अत्यंत रहस्यमय आहे. त्याचे शब्दांत वर्णन करण्यांत अर्थाच्या अनेक त्रुटी राहून जातात. तरी सत्य, तप, पावित्र्य व दया ह्या चारांच्या माध्यमातून मानवाच्या इह व पर कल्याणासाठी केलेली आचार संहिता म्हणजे धर्म असे म्हणता येईल. त्यातही तरतम भाव आवश्यक असतोच. त्यासाठीच वैदिक वाङ्मय निर्माण झाले आहे. जे वाङ्मय निर्माण झाले आहे ते त्या त्या काळात अनुभूती घेतलेल्या मुनींच्या कडून निर्माण झालेले आहे. मुनि जी अनुभूती घेतात तिथे मनाचा संबंध नसतो. निर्विकल्पांत ती अनुभूती घेतलेली असते. देहभानावर आल्यानंतर नियम करण्यासाठी शब्दशास्त्र वापरावे लागते. तें मात्र मनाच्या व बुद्धीच्या माध्यमातून. ते व्यावहारिक परिभाषेच्या संपर्कामुळे सदोषत्वानेच साकार होते. म्हणून तर ईश्वर रहस्यमय राहतो. कारण तो ज्याचा त्यानें अनुभवायचा असतो. ह्या व्यक्तिगत अनुभूतीच्या विवरणात जे फरक होतात त्याला आपण भिन्नता म्हणून संबोधतो. त्यांतही तपशिलाचा फरक जरूर असतो पण अनुभूतीत मात्र फरक नसतो. त्यामुळे धर्मतत्त्व हे अति रहस्यमयच रहाते. त्यासाठी काही कोणती पाउलवाट नाही. म्हणून त्या त्या काळात त्याला अनुरूप असे जे संत सज्जन होऊन गेले त्यांना महाजन असे संबोधले आहे. त्यामुळे सर्वसामान्य मनुष्याची सामुहिक सहजीवनासाठी ती एक व्यावहारिक सोय करून दिलेली आहे. ”

हे ऐकून मंडन यांनी विचारले, “धर्म अत्यंत रहस्यमय आहे असे म्हणता तर मग धर्म ज्ञात होण्यासाठी व धर्माचरण करण्यासाठी वेदांच्या ज्या काही आज्ञा आहेत त्या पाळून धर्मप्राप्ती म्हणजे धर्मरहस्य जाणता येणार नाही असे आपण म्हणता आहात हे माझे समजणे बरोबर आहे कां?”

आचार्य म्हणाले, “नाही! हे प्रश्न अशाप्रकारे अनुमान काढून सुटणारे नाहीत. समग्र विचारांची इथे आवश्यकता आहे. तो समग्र विचार असा. शरीर शुद्धीसाठी आवश्यक सांगितलेल्या क्रियांचा व अंत:करण शुद्धीसाठी सांगितलेल्या कर्मांच्या मन:पूर्वक केलेल्या दीर्घकालीन आचरणामुळे शरीरासह चित्तशुद्धी होते. ह्या क्रियांचा अंतर्भाव धर्माचरणात आहे. धर्माचरण व धर्म अर्थातच भिन्न झाले. पण

धर्माचरण धर्म जाणण्यास साधनासारखे वापरावे लागते म्हणून त्याची आवश्यकता पूर्वीच्या ऋषी मुनींनी प्रतिपादन केली. त्या सर्व कर्मांना मंत्रबद्ध करून सहजतेने आचरणांत आणता येतील अशी योजना केली. त्यांतही विविध शाखा निर्माण झाल्या. उपशाखा निर्माण झाल्या. हे सर्व अपरिहार्यपणे घडत राहणारच. काही शाखा कालांतराने लोप पावतील तर काही नवीन उदयाला येतील. धर्म समजण्यासाठी स्नान संध्येची, देवपूजेची, यज्ञयागाची अशी कशाचीच आवश्यकता नाही तर मननाची व त्यागाची आवश्यकता आहे असे जर एखाद्या अनुभूती घेतलेल्या मुनिवर्यांनी सांगितले तर लगेच विरोधाभास उत्पन्न होतो. तथापि त्या मुनिवर्यांनी त्याग व मनन यांची मूलभूत कल्पना पूर्ण विस्तारित केली नाही तर सामुहिक जीवनांत गोंधळ निर्माण होऊ शकतो. ह्याचे आजचे उत्तम उदाहरण म्हणजे बौद्ध व जैन शाखा आहेतच. धर्म हा मनाच्या अतित आहे हे जरी ऋषीमुनींना ज्ञात होते तरी त्यांनी तसे उघड उघड आमसमाजाला भाजी-बाजारांत भाज्यांचे भाव सांगावे तसे कधीही सांगितले नाही. तथापि आचरणाच्या माध्यमातून नियम घालून देऊन शास्त्राच्या चौकटीत ते बसवले. सर्व सामान्य समाज तसा आळशी, स्वैर व स्वच्छंदी असतो. त्या स्वैर वृत्तीला आळा घालण्यासाठी धर्माधिष्ठित आचरण निर्माण झाले. पण जैन व बौद्ध शाखांनी तीच वैदिक सनातन परंपरा उखडून टाकण्याची किमया केलीच कीं नाही? त्याला जास्तीत जास्त कारणीभूत जर कोणी असेल तर ती कर्मठवैदिक मंडळी! शास्त्र-नियम-कर्मकांड हे स्वत: शांत व संयमशील तारतम्याने वापरले तर सुसह्य होतात. तेच हातात दंड घेऊन कठोरतेने वापरायला भाग पाडल्यावर होणारा जाच असह्य असतो. कारण तो मना विरुद्ध घडतो. मनांत त्याची कळत न कळत घृणा वाढत जाते. अशावेळी जर तो एखाद्या जैन यतीच्या सहवासांत येऊन त्यांच्या विचारांजवळ पोहोचला कीं क्षणात त्याला मोकळे मोकळे वाटू लागते. तो त्या पंथाला अनुकूल होतो व कर्मठा ऐवजी पाखंडी बनतो. याचे कारण त्याचे अज्ञान. जसे पक्वान्नांचे भोजन कितीही रुचकर व पौष्टिक

असले तरी ते तान्ह्या मुलाला देत नाहीत किंवा नवज्वर झालेल्याला दूध देत नाहीत तद्वत पूर्ण तारतम्य वापरल्या खेरीज धर्माचरणही फलदायी होत नाही. ”

आचार्य हे सांगत असताना त्यांचा शांतपणा, शब्दांची फेक, भाषेवरचे प्रभुत्व ह्या सर्व गोष्टींनी मंडन मिश्र भारावला तर होताच पण त्याच्या हेही लक्षात आले होते कीं नक्कीच आपले काही तरी जाणून घ्यायचे राहिले आहे. आतां काय याहिले आहे व आपल्या अध्ययनांत काय त्रुटी राहिल्यात ते आचार्यांनाच विशद करू द्यावे हेच सोयीस्कर असे त्याच्या मनाने घेतले. पहिल्या दिवसाची चर्चा भारतीने सायंकाळ होताच थांबवली. दोघांचेही हार अद्याप टवटवीत होते. म्हणजे अजून निर्णय झालेला नाही. दुसऱ्या दिवशी पुन्हा सुरुवात होईल असे सांगितले. सर्व श्रोते उत्सुकतेने दुसऱ्या दिवसाची वाट पाहू लागले.

दुसऱ्या दिवशीं भारतीने पुनश्च दोन ताज्या घवघवीत पुष्पमाला दोघांना परिधान करण्यास दिल्या. चर्चेला सुरुवात झाली. मंडन मिश्रांना मनन व चिंतनासाठी भरपूर वेळ मिळाला होता त्यामुळे आचार्यांच्या कालच्या विवेचनाला अनुसरून त्यांनी आपला प्रश्न विचारला. “आचार्य! आपण म्हणता त्याप्रमाणें ऋषी-मुनींनी मंत्ररूपांत वेदाज्ञा निर्माण केल्या. म्हणजे वेद पौरुषेय मानावे लागतील. पण वेदांच्या अध्ययनांत ते अपौरुषेय असल्याचे सांगितले जाते. तसेच धर्म जर मनाच्या अतीत होऊन जाणून घ्यायचा तर तो कसा जाणता येईल? कारण जाणण्याच्या सर्व क्रियांमध्ये अंत:करण चतुष्टयातले मन असतेच नां? त्यामुळें सर्व क्रिया बुद्धी व मन यांच्या सहाय्याने चित्तातल्या चिंतनशीलतेने जशा समजतात तशा शब्दश: करावयाच्या असतात तिथे परत तारतम्य वापराचे हे कसे? आणखी एक महत्वाचे असे कीं वेदांनी ईश्वराचे वर्णन कारताना पुरुषसूक्तांत सावयव वर्णन केले आहे. तथापि समारोपात मात्र वैदिक वाङ्मय “न इति न इति” असा समारोप कां करते? ह्याचा उलगडा व्हावा. तसेच आम्ही नित्य, नैमित्तिक व काम्य अशी तिन्ही कर्मे वेदाधारेच करीत असताना त्यात कोणती महत्वाची उणीव आपणास जाणवते किंवा ज्यामुळे आपण त्या कर्मकांड करणाऱ्यांना पाखंड माजवणे असे संबोधता? ती कर्मे

करण्याची आवश्यकता तर वेदांनीच प्रतिपादन केलेली आहे. त्यामुळें नैष्कर्म्य कसे साधावे हे आपण समजाऊन सांगा. ”

आचार्य म्हणाले, “प्रथम वेद अपौरुषेय कसे याचा विचार पाहू. आज आपण ज्या वेदांचा अभ्यास करीत आहोत त्यात समग्रवेदांचा समावेश नाही. काही अंशमात्र वेद आपल्यापर्यंत आलेले आहेत. त्यांतही चार शाखांत महर्षी व्यासांनी ते विभागून दिले आहेत. सांप्रत कलियुग सुरू आहे. मनुष्याला सत्य, त्रेता व द्वापार युगांत असलेले आयुष्य नाही. कमी कालावधीत उपयुक्ततेच्या दृष्टीने वेदव्यासांनी पुनर्रचनेने संक्षिप्त व निर्व्यलीक आचारधर्म व लौकीकांत वागण्याचे नियम ह्यांच्याच आधारे ग्रथित केले आहेत. ह्याचा अर्थ सृष्टीच्या उत्पत्ती पूर्वी वेद होते. आतां त्याच्याही पूर्वीचा विचार पहा. सृष्टी उत्पन्न करण्याचे कार्य ब्रह्मदेवांनी केले असे मानले जाते. ब्रह्मदेवाचा जन्म भगवान् श्रीविष्णूंच्या नाभिकमलातून झाला. त्यावेळी ब्रह्मदेवाने आपला निर्माता कोण? ह्याचा शोध बाह्य दृग्गोचर होणाऱ्या सृष्टीत करण्याचा प्रयत्न केला. अपयश आल्यावर ब्रह्मदेव वैफल्यग्रस्त झाला. त्या वैफल्यग्रस्ततेत त्याला आपण अज्ञानी असल्याचे जाणवले. आपला निर्माता सर्वश्रेष्ठ असला पाहिजे म्हणून त्याने अंत:करणांत लय लाऊन शोध घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला. त्यावेळी त्याला त्याच्या नाभिस्थानीं ॐकाराचा ध्वनी व जप-तपाचा आदेश ऐकू आला. ‘ॐकार’ हे ‘नाम’साधनेसह संपूर्ण विश्वाचे आधारभूत तत्त्व आहे. त्याच्या जप-तपाच्या प्रभावाने ब्रह्मदेवांना पुरुषसूक्ततांत वर्णन केलेल्या सावयव महाविष्णूंचे दर्शन झाले. त्यावेळी महाविष्णूंनी केवळ संकल्प उच्चार केला कीं आपण वेदगर्भ आहात. ते जाणून घ्या. त्या वेदाधारे सृष्टीची रचना करा. त्यामुळें ब्रह्मदेव वेदगर्भ मानले गले. याचा अर्थच असा कीं ब्रह्मदेवांच्या जन्मापूर्वी वेद होते. म्हणून ते अपौरुषेय आहेत. पुढे त्यांतून सामुहिक सहजीवनासाठी वेगळया वेगळया मुनींनी आवश्यक तेवढ्या मंत्रांचा उपयोग केला. त्यामुळे काही अंशांनेच ते आपणास ज्ञात झलेले आहेत. नारदमुनींनी जेंव्हा सृष्टी उत्पत्तीचे गूढ ब्रह्मदेवांना विचारले तेंव्हा ब्रह्मदेव ज्ञानाने परिपक्व अवस्थेत असल्यामुळें ‘मी’ निमित्तमात्र आहे

व महाविष्णु निर्माते आहेत. असे सांगितले. नारदांना महाविष्णुंची अनुभूती होतीच. तथापि त्या महाविष्णुंचा उत्पन्न कर्ता कोणीतरी असलाच पाहिजे असे मानून त्याने त्यांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी नारदांना असे ज्ञान प्राप्त झाले कीं "ब्रह्मा, विष्णू आणि हर" हे बाह्यत: स्वरूपाने भिन्न दिसत असले तरी "रज", "सत्व" व "तम" ह्या गुणाविष्काराचा तो प्रभाव आहे. हे ज्ञान नारदांच्या अंत:करणात उदय पावताच नारद अंतर्मुख झाले. मननाने अंत:करणात लय साधून उन्मनी अवस्थेत गेले. त्यावेळी सत्व, रज व तम या गुणांच्या साम्यावस्थेच्या पलीकडे असलेली अव्यक्त, निर्गुण, निराकार, सर्वसाक्षी, सर्वगामी, सर्वान्तर्यामी, चराचराला व्यापून उरलेली अभेद्य, अखंड, अच्छेद्य, अनंत, अविनाशी, अक्षर, अज, शाश्वत अशी आत्मतत्त्वाची शक्ती नारदांना अनुभवता आली.

ह्या शक्तीचे अथवा आत्मतत्त्वाचे वर्णन शब्दांच्या पलीकडील आहे. म्हणून कोणतेच वर्णन त्याला लागू पडत नाही. म्हणून वेदांनी समारोपात "न इति-न इति" (हे नाही हे नाही) असा नकारात्मक पवित्रा घेऊन आपली मर्यादा सांगितली आहे. आपण हे जड शरीरातल्या मनाने जाणण्यास समर्थ होत नाही. आपण पंचकर्मेंद्रिये व पंचज्ञानेन्द्रिये यांच्या सहाय्याने रूप, रस, गंध, तेज व शब्द यांचा अनुभव घेत असतो. ह्या जड इंद्रियांच्या नंतर सूक्ष्म इंद्रियांचे कार्य समजून घेणे आवश्यक आहे. ह्या जड इंद्रियांना हा भोग समजण्याची क्रिया होते ती वायुरूप असलेल्या मनामुळे, तेजोरूप असलेल्या बुद्धीमुळे. मन हे वायुरूप सूक्ष्म इंद्रिय आहे. ते दाखवता येत नाही पण अनुभवता येते. मनापेक्षा सूक्ष्म इंद्रिय बुद्धी आहे. बुद्धी पेक्षा सूक्ष्म आत्मा आहे. हेच सूक्ष्मतत्त्व चढत्या भांजणीत आत्मतत्त्वा पर्यंत स्थित होते. मन, बुद्धी, आत्मा इत्यादी  हे प्रत्येक जीवात उपभोगाच्या विविध क्षमतांच्या सामर्थ्याने योजले गेले आहे. त्याच प्रमाणें ह्या मनाच्या अतीत होण्याचा मार्ग फक्त नरदेहांतच आहे. पुरुषसूक्त जे सावयव वर्णन करते त्यातल्या विश्वमनाच्या सहाय्याने देहभान नष्ट झालेल्या अवस्थेतच साधक जडमनाच्या अतित होण्याचा अनुभव घेऊ शकतो.

अर्थात ही साधना केवळ कर्मकांडाने होऊ शकत नाही. त्यासाठी परब्रह्माचा ध्यास व अंत:करणातून भौतिकाचा त्याग आवश्यक असतो.

तारतम्य हे सर्वच बाबतीत आवश्यक असते. तसेच ते धर्मपालन व शास्त्रपालन यांच्यासाठीही आवश्यक असते. आपल्या म्हणण्याप्रमाणें वेदांत नित्य, नैमित्तिक व काम्य हे केवळ कर्मकांडात प्रतिपादले आहे. पण प्रत्यक्षात वेदांत ज्ञान-भक्ती-नैष्कर्म्य अशी तीन कांडे योजलेली आहेत. आपण कर्मकांडच फक्त प्रमाण मानल्याने आपला प्रश्न अगदी स्वाभाविक आहे. त्यामुळेच तर कर्मठ पाखांड निर्माण झाले आहे. आपण ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग जे वेदांचे मुख्य प्रतिपाद्य विषय आहेत त्याचा कधी विचारच केलेला दिसत नाही. वेदांनी आपल्याला चार आश्रम नेमून दिलेले आहेत. त्या चार आश्रमांचे पुन्हां सोयीसाठी चार चार भाग केले आहेत. ब्रह्मचर्याश्रम हा पहिला आश्रम आहे. दुसरा गृहस्थाश्रम. मग वानप्रस्थाश्रम व चवथा संन्यासाश्रम. ह्या चार आश्रमांच्या योगे धर्म, अर्थ, काम, मोक्ष अशा चार पुरुषार्थांची प्राप्ती करून घ्यायची असते. प्रत्येक आश्रमातले चार चार उपविभाग तारतम्याने वापरावयाचे असतात.

काही गोष्टी वेदांत सुद्धा उपमा देऊन समजाऊन सांगितलेल्या असतात. त्यांत जीवनातली अगदी सामान्य घटना दिलेली असते. उदाहरणच घायचे तर "परमानंद" हा ईश्वरानुभूतीमुळे मिळतो. त्या परमानंदाची कल्पना यावी म्हणून वेदांनी आनंदाचे 'उपस्थ एकायतन' असे सांगितले आहे. इथें आनंद समजावा म्हणून वापरलेले उदाहरण तुलनेने समजण्याऐवजी जर तोच परमानंद मानला तर ते चूक होईल. आता वेदांनी अशी उदाहरणे कां दिली? तर ईश्वरीय अनुभूतीचा परमसुखानंद ज्यांनी कधी अनुभवलाच नाही त्यांना जीवनांतला "मैथुन सुखाचा" आनंद हाच परमानंद वाटत असतो. म्हणून जीवनांत अनुभवाला येणाऱ्या त्या परमानंद सुखाच्या उदाहरणाने त्याच्या वरचढ असलेल्या ईश्वरीय परमानंदसुख कल्पनेंत बसावे म्हणून सांगितले जाते. विषयोपभोग वाढावा म्हणून नव्हे. आतां कर्मकांडा विषयी हाच विचार जर केला तर मानवी जीवन समृद्ध व्हावे म्हणून त्या योजना ऋषी मुनींनी

केल्या आहेत. “सर्वारम्भा:तण्डूलप्रस्थमूला: |” पावशेर तांदुळाचा आधार असेल तरच कार्यारंभाचा विचार मनांत येणार. सर्वसामान्य मनुष्य जर त्यालाच पारखा झाला तर उपाशी पोटी परमार्थ कोण करणार? त्यामुळे प्रत्येकाच्या शरीरधारणे इतकी अन्नाची गरज भागलीच पाहिजे. ह्या उद्देशाने नियोजित केलेल्या कार्याचा उपभोगासाठी जर उपयोग होऊ लागला तर तिथे पाखंडा शिवाय काय उरेल? ज्ञानमार्ग हा भक्तीमार्गातून जास्त चांगला साधतो असा ब्रह्मदेवाचाही अभिप्राय आहे. भगवान् श्रीकृष्ण अवतार समयी देवकीच्या उदरांत असताना ब्रह्मदेव त्याठिकाणी भगवंताची स्तुती करण्यास आले असताना म्हणतात,

“येऽ न्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिन स्त्वयस्तभावादविशुद्धबुद्धय: |
आरुह्य कृच्छ्रेण परं पदं तत: पतन्त्यधोऽनादृतयुष्मदङ्घ्रयः ||१०. २. ३२||
तथा न ते माधव तावका: क्वचिद् भ्रश्यन्ति मार्गात्त्वयि बद्धसौहृदा: |
त्वयाभिगुप्ता विचरन्ति निर्भया विनायकानीकपमुर्धसु प्रभो ||१०. २. ३३||”

हे कमलनयना! हे स्वत:ला मुक्त मानणारे असतात त्यांची तुझ्या विषयी श्रद्धा नष्ट झाल्यामुळे, महत्प्रयासाने जरी ते श्रेष्ठपदावर आरूढ झाले तरी तुझी चरणसेवा अंतरल्यामुळे अध:पतीत होतात. (१०. २. ३२) पण हे माधवा! तुझ्यावर निश्चल प्रेम करणारे तुझे भक्त मात्र आपल्या मार्गापासून भ्रष्ट होत नाहीत. हे प्रभो तूं त्यांचे रक्षण करीत असल्याने सर्व संकटांच्या माथ्यावर पाय देऊन ते निर्भयपणे हिंडत असतात. (१०. २. ३३).

ब्रह्मदेवांनी केलेली ही स्तुती भक्तिमार्गच सांगत नाही कां? आपण विचारलेल्या प्रश्नांची ही संक्षेपाने दिलेली उत्तरे आहेत. ह्यावर आपण आपले म्हणणे जरूर मांडावे. ” आचार्य थांबताक्षणीच भारतीमातेने त्या दिवशीची चर्चा तिथेच थांबवली. मंडन मिश्र विचारमग्न झाले होते. दोघांचेही हार अद्याप टवटवीत होते. आतां तिसऱ्या दिवशी चर्चा होणार म्हणून उपस्थित विद्वान श्रोत्यांना अतिशय आनंद झाला. कानामनाला एक करून ऐकणाऱ्या श्रोत्यांना ही एक ज्ञानार्जनाची पर्वणीच मंडन मिश्रांच्या निमित्ताने प्राप्त झाली होती. सर्वांनी त्या तिघांनाही वंदन केले.

तिसऱ्या दिवशी नूतन पुष्पमाला धारण करून पुन्हां चर्चासत्राला आरंभ झाला. मंडन मिश्रांचा खूपच वैचारिक गोंधळ उडाला होता. कारण आचार्य त्यांना पाखंड माजवण्यासाठी जबाबदार समजत होते. ते सुद्धा बौद्धपंथापेक्षा अधिक! म्हणून त्याबाबत आज निश्चयात्मक विचार झालाच पाहिजे. हे मनांत योजून मंडन म्हणाले, "बौद्धांचा पंथ पाखंड निर्माण करतो ह्याचा अर्थ 'बुद्ध' हा हीं पाखंडी आहे कां? तसेच आम्ही "कर्मठ" त्याही पेक्षा अधिक पाखंडी कसे? कालपासून माझ्या मनाला ही एक मोठीच रुख रुख लागली आहे. आज आपण ह्याचे निराकरण करा!"

आचार्य बोलू लागले, बौद्धपंथाच्या प्रचलित अध्वर्यूंना बौद्धमत म्हणजे "गौतमबुद्ध"च समजला नाही असे माझे मत आहे. त्यामुळें मूलभूत तत्त्वांचा अंगीकार न करता केवळ गौतमबुद्धांचे व्यक्तिमत्व वापरून त्यांची आपल्याला सोयीस्कर शिकवण अंगीकारून जो प्रसार चालू आहे त्याला पाखंड म्हणून संबोधले आहे. मला स्वत:ला गौतमबुद्धांबाद्दल परम आदर आहे. गौतमबुद्ध हे प्रत्यक्ष ईश्वरी अवतार असल्याचे साक्षात् शुकमुनींनीच श्रीमद्भागवतात "तत: कलौ सम्प्रवृत्ते साम्मोहाय सुरद्विषाम् | बुद्धो नाम्नाजनसुत: कीकटेषु भविष्यति ||" असे सांगितले आहे. या पुढे कलियुगास सुरुवात झाल्यावर देवांचा द्वेष करणाऱ्यांना मोहित करण्यासाठी किकट प्रदेशांत आजनाचा पुत्र "बुद्ध" या नावाने भगवान स्वत: अवतीर्ण होतील. इतकेच नव्हे तर तर पाखंडसमुदाय व तदनुषंगिक प्रमाद ह्यांच्या पासून भगवान् बुद्ध हे रक्षण करतील असेही भागवतात सांगितले आहे. "द्वैपायानो भगवान प्रबोधात्बुद्धस्तु पाखंडगणात प्रमादात ||" त्यामुळे गौतमबुद्ध पाखंडी कसा असेल? त्यांचे आपण स्मरणच केले पाहिजे. म्हणजे आपल्याला पाखंडापासून संरक्षणच मिळेल. प्रथम आपण त्यांचे स्मरण करू! असे म्हणून आचार्यांनी ध्यान धरून श्लोक म्हटला.

"धराबद्धपद्मासनस्याङ्घ्रियष्टिर्नियम्यानिलो न्यस्तनासाग्रदृष्टिः |
य आस्ते कलौ योगिनां चक्रवर्ती स बुद्ध: प्रबुद्धोऽस्तु निश्चिंतवर्ती ||"

"बद्धपद्मासनांत बसून न्यासाग्रदृष्टी स्थिर करून, प्राणांचे नियमन केलेला कलीयुगातील सर्वश्रेष्ठ योगी व ज्ञानी बुद्ध आमच्या हृदयांत सदैव वास करो. " ही प्रार्थना करताना आचार्यांच्या गंभीर व भक्तियुक्त स्वरांचा परिणाम सर्व सभेवर झाला. आचार्यांचे विचार निःसंदिग्ध आहेत हे मंडनसह सर्वांनाच जाणवले. त्यांच्या चित्तवृत्ती विकसित झाल्या होत्या. मंडनला आपल्या गुरूंचे म्हणजे कुमारील भट्टपादांचे स्मरण वारंवार होऊ लागले. कारण आचार्य त्यांच्याच कृपेमुळे इथे आले आहेत ही जाणीव मंडनच्या अंत:करणांत उत्पन्न झाली. दोन दिवसांत मंडनमध्ये एक बदल निश्चित झाला होता कीं, ही चर्चा नव्हे वा वादविवाद नव्हे. कर्मकचाट्यात सापडून आपण ज्या गोष्टींचा कधी विचारही केला नव्हता तो ह्या दोन दिवसांत अत्यंत शांतपणे करता आला आहे. त्यामुळे आपल्या अंत:करणांत खूपच स्थिरता निर्माण झाल्यचे मंडनला जाणवू लागले होते. आचार्य उत्कृष्ट प्रबोधन करीत आहेत. आजचे बुद्धा विषयीचे विचार व धारणा आपल्या कधी लक्षातच आलेली नव्हती. ज्या अर्थी इतक्या लहान वयांत विचारांची इतकी प्रगल्भता, परिपक्वता व निःसंदिग्धता आहे त्याअर्थी साही शास्त्रांचा आपला अभ्यास नक्कीच योग्य दिशेने झालेला नाही. आपण यांच्याकडून आपल्या सर्वच शंकांचे निरसन करून घ्यावे हेच श्रेयस्कर होईल. मंडन पूर्ण विचारांत गढलेला पाहून आचार्यांनी त्यांचीलागलेली विचारांची तंद्री भंग केली. आचार्य म्हणाले, " आपल्याला पाखंड माजवण्यास जबाबदार धरले हे मी नाकारीत नाही. पण आपला ह्यात फारसा दोष मी मानीत नाही. आपण ज्या काळांत आणि मतामतांतरांच्या संघर्षात जन्माला आलात त्या काळाचा हा प्रभाव आहे. मानवी जीवनांत मान-मरातब, प्रतिष्ठा, आर्थिकस्थैर्य व ऐश्वर्य ह्यासाठी सतत संघर्ष व स्पर्धा चालू आहे. प्रवाहाच्या उलट जाण्याची कोणत्याच जीवाला इच्छा नसते. आपल्या गुरुंनी तो प्रयत्न केला. त्यांच्या बद्दल मला नितांत आदर आहे. वैदिक धर्माचे सूत्र प्रस्थानत्रयीत आहे. तेच आपल्या जीवनाचे सूत्र आहे. साक्षात् भगवंताचा अवतार असलेल्या ऋषभराजाने राज्यत्याग करण्यापूर्वी आपल्या पुत्रांना केलेल्या उपदेशांतच आपल्याला पाखंड

माजवल्याबद्दल जबाबदार कां धरले ह्याचे उत्तर सांपडेल. ते आपण पाहू. ऋषभदेव म्हणतात,

“पराभवस्तावद्बोधजातो यावन्न जिज्ञासत आत्मतत्त्वम्।
यावत्क्रियास्तावदिदं मनो वै कर्मात्मकं येन शरीरबंधः ॥५. ०५. ०५. ॥

जो पर्यंत मनुष्याला आत्मतत्त्व जाणण्याची इच्छा होत नाही तो पर्यंत अज्ञानवश देहाभिमानामुळे आत्मस्वरूप आच्छादलेले रहाते. तोच स्वतःचा पराभव असतो. जो पर्यंत इंद्रियांचे व्यापार चालू असतात तो पर्यंत मन कर्माकडे प्रवृत्त होते, कारण मन हे कर्मोत्सुक असते. त्यामुळेच मनुष्याला शरीरबंध भोगावा लागतो. (५-५-५)

कर्माशयं हृदयग्रंथिबन्धमविद्ययाऽऽसादितमप्रमत्तः।
अनेन योगेन यथोपदेशंसम्यग्व्यपोह्योपरमेत् योगात् ॥५-५-१४॥

ह्या करीता मनुष्याने अत्यंत सावधानतेने शास्त्रसंमत उपायांचे अनुष्ठान करून ही अहंकाररूपी अविद्येची गांठ म्हणजे हृदयग्रंथी निःशेष सोडून टाकावी. म्हणजे नैष्कर्म्य प्राप्त होते.

लोकः स्वयं श्रेयसि नष्टदृष्टीर्योऽथान्समीहेत निकामकामः।
अन्योन्यवैरः सुखलेशहेतोरनन्तदुःखं च न वेद मूढः ॥५-५-१६॥

लोकांना आपले खरे कल्याण कशांत आहे हेच समजत नाही. तीव्र भोगेच्छा हेच त्यांच्या कर्माचे मूळ असते. ते क्षणकालच्या सुखासाठी दुसऱ्यांशी वैर धरतात. त्यामुळें त्यांना अनंत दुःखे भोगावी लागतात ह्याचे त्यांना आकलनच होत नाही.

गुरुर्न स स्यात्स्वजनो न स स्यात्पिता न स स्याज्जननी न सा स्यात्।
दैवं न तत्स्यान्न पतिश्च स स्यान्न मोचयेद्यः समुपेतमृत्युम् ॥५-५-१८॥

मृत्युरूपी संसाराच्या मृगजळातून बाहेर काढण्याचे सामर्थ्य नसेल तर तो गुरु नाही. स्वजन नाही , पिता नाही, बंधू नाही, आई नाही, अथवा दैवतही नाही. ” इतके सांगून मग आचार्य थोडे थांबले व पुढे म्हणाले, “ कर्म करतां करताच विचारांची कास धरली पाहिजे. कर्माच्या प्रत्येक मंत्रांत ईश्स्मरणाची सोय आहे. त्याचप्रमाणे

केलेले प्रत्येक कर्म ब्रह्मार्पण करण्याची व्यवस्था आहे. त्यागोष्टी कोणी खऱ्या अर्थाने आचरणांत आणत नाहीत. पोपटाप्रमाणें नुसता उच्चार करून कर्मप्रवण होतात. स्वत:सारखेच इतरांनाही करतात. त्याला पाखंड असे म्हटले आहे. त्यातही जे आग्रहाने कर्मठपणाचे प्रतिपादन करतात ते जास्त जबाबदार. समाजात सर्वच सारख्या बुद्धीमत्तेचे नसतात. पण ईश्वराचा मार्ग मात्र त्या सर्वांसाठीच मोकळा असतो. तो मार्ग म्हणजे नामस्मरण, शरणागती व आत्मार्पण आहे. त्यासाठीं गुरु ही सोय आहे. पण जर कोणी स्वत:ला गुरु समजू लागेल तर ती त्याची स्वत:ची मोठीच फसगत असेल. " आचार्य बोलत होते. सभा कान टवकारून ऐकत होती. त्यादिवशीची चर्चा इथेच थांबली. श्रोते चवथ्या चर्चासत्राची उत्सुकतेने वाट पाहू लागले.

मंडन मिश्रांमध्ये आतां अमुलाग्र बदल घडू लागला. चर्चासत्र सलग वीस दिवस चालले होते. प्रत्येक दिवशीचे आचार्यांचे विवेचन मंडन मिश्रांच्या अंत:करणाचा ठाव घेऊ लागले. त्याचा परिणाम असा झाला कीं, आचार्य हे अलौकिक बुद्धिमत्तेचे सत्पुरुष असून आपल्यापेक्षां श्रेष्ठ असल्याचे मंडन मिश्रांचे मत झाले. मंडन मिश्रांची शिष्यप्रज्ञा तीव्र होऊ लागली. आत्मतत्त्व जाणून घेण्याची त्यांना प्रबळ इच्छा झाली. त्यासाठी आचार्यांसारखा गुरु शोधूनही सांपडणार नाही. ईश्वरानेच माझ्या गुरुंच्या माध्यमातून ह्यांना मला आत्मबोध करण्यासाठी पाठवले आहे. मग मी ह्या लौकीकातल्या जय-पराजयाची वाट कां पहावयाची? आतां उद्या सकाळी आपण भर सभेत त्यांना शरण जाण्याचे निवेदन करून चर्चासत्र थांबवावे हे उत्तम. एवढे धैर्य जर सभा सुरु होताना आपणास दाखवता आले नाही तर आज आपला शेवटचा प्रश्न विचारून त्यांतल्या विवेचनाच्या आधारे त्यांना शरण जावे हे उत्तम. अशाप्रकारच्या विचारांनी भारावलेल्या अवस्थेत मंडन मिश्र एकविसाव्या दिवशी चर्चासत्रासाठी सभास्थानी आले. दोघांनी पुष्पमाला परिधान केल्या. सभेत उत्तम सुगंध दरवळत होता. आचार्य शांत बसले होते. भारती माता आपल्या आसनाजवळ उभी होती. मंडन मिश्र अचानक गंभीरवाणीने बोलू लागले, "आज मी शेवटचा प्रश्न विचारणार आहे. त्याचे विवेचन मला पटले तर माळ कोमेजो अथवा न

कोमेजो मी आचार्यांना शरण जाऊन संन्यास . . . . . . . . . . . . . ” त्यांचे वाक्य अर्धवट तोडून भारती म्हणाली, “ उभयतांच्या संमतीने निर्णेता म्हणून माझी नेमणूक झालेली आहे. त्यामुळे ह्या चर्चासत्राचा निर्णय सर्वस्वी माझ्याच आधीन राहील. आचार्यांची माळ कोमेजली तरच चर्चासत्र संपेल. मग माझा पुत्र म्हणून मी त्यांना गृहस्थी बनवीन. पण माझ्या पतीची माळ कोमेजली तर त्यांची अर्धांगी म्हणून मी प्रश्न विचारीन. त्या प्रश्नांच्या उत्तरानंतरच निर्णय केला जाईल. तो निर्णय दोघांनाही मान्य करावा लागेल. ” भारती मातेच्या ह्या वक्तव्यावर आचार्यांनी स्मित हास्य करीत होकारार्थी मान डोलावली. मंडन मिश्र त्यामुळें काहीच बोलू शकले नाहीत. मंडन मिश्र आतां काही तरी गहन प्रश्न विचारणार म्हणून सभा कानामनाला एक करून श्रवण करू लागली.

स्थानापन्न झालेल्या मंडन मिश्रांनी प्रश्न विचारला, “भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाला

“तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ |

ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ||१६-२४||”

असे निःसंदिग्ध सांगितल्या नंतर परत,

“सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज |

अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्ष्ययिष्यामि मा शुचः ||१८-६६||”

असे कां सांगितले? इथें तर भगवान् श्रीकृष्णांनी सर्व धर्मांचा परित्याग सुचवला आहे. म्हणून सुरुवातीस मी धर्माची व्याख्या विचारली होती. ती सांगताना आपण सत्य, तप, दया व पावित्र्य ह्यांच्या आधारे इह व पर कल्याणासाठी तारतम्य वापरून करावयाचे शास्त्रशुद्ध आचरण अशी स्थूल मानाने व्याख्या करून दिली होती. त्याचा इथें संदर्भ घेतला तर निर्णय कसा करावा हे आपण समजवावे. ”

आचार्य सांगू लागले, “धर्म व धर्माचरण ह्याचा पक्का निर्णय अंत:करणात ठसवून घ्यावा. प्रथम तस्मात् शास्त्रं . . . चा निर्णय करू. इथे भगवान् श्रीकृष्ण इह

लोकाशी संबंध जोडून समजावून सांगत आहेत. कारण इहलोकी आचरण करण्यासाठी सुसंवाद व एकवाक्यता असावी व त्या त्या वर्णाश्रम धर्माप्रमाणे प्रत्येकाचा आचार हा मोक्षप्राप्तीचे साधन व्हावा हा त्यांतला मूळ हेतू आहे. अर्जुनाचा प्रश्न कां उपस्थित झाला हे समजण्यासाठी थोडी पूर्वपीठीका समजून घ्यावी लागेल. भगवान् श्रीकृष्ण हे साक्षात् भगवंत आहेत हे अर्जुनाला त्यांच्या "विश्वरूप" दर्शनाने ज्ञात झालेले आहे. मनुष्याला दृक्श्राव्य प्रत्ययाने प्राप्त झालेले ज्ञान पूर्णावस्थेत नेऊ शकत नाही. अर्जुनाने भगवान् श्रीकृष्णांना गुरु मानल्यामुळे श्रीकृष्णांनी त्याचे 'मी'पण हिरावून न घेता बोध करून क्षात्रधर्म जागवलेला आहे. क्षात्रधर्म जागा झाला नाही तर अर्जुन युद्ध कसा करणार? तथापि त्याची आपल्यावरील श्रद्धा वाढावी म्हणून ते दर्शन त्याला घडवल्यावर असे सांगितले कीं,

"मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः |
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ||१०-५५||"

ह्याचा अर्थच असा आहे कीं अर्जुनाने ईश्वरासाठी कार्य करावे, सर्वभूतमात्रांशी निर्वैर असावे आणि मगच युद्ध करावे. निर्वैर झाल्यावर युद्ध कसें करता येईल? तर ते ईश्वराचे कार्य म्हणून ते वैरभाव न ठेवता धर्मस्थापनेसाठी करावयाचे. पण अर्जुनापुढे असा प्रश्न पडला कीं लौकिक व्यवहार करण्यासाठी काय प्रमाण मानावे? त्या उत्तरात "तस्मात् शास्त्रं . . "चा उपदेश केला आहे. अर्जुनाला ह्यात जडदेहाच्या रहाटणीचा प्रश्न अभिप्रेत आहे. त्याला अनुसरून ते उत्तर आहे व आंतरिक धारणा कशी असावी हे समजावून सांगण्यासाठी अर्जुनाला

"सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ।।५- १३।।"

ह्यात नित्य-नैमित्तिक-काम्य इत्यादी कर्माचा अंतर्भाव आहे. ह्या स्थितीच्या साधनेचा मार्ग

" यतो यतोनिश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम्।

ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥६ -२६||

असा सांगितला आहे. मनात येणाऱ्या विविध व अनावश्यक विचारतरंगांच्याकडे दुर्लक्ष करून आत्मानात्म विवेक जागा ठेवण्यास सांगितले आहे. अंतरंगात आत्मानात्मविवेक जर सातत्याने जागा ठेवायचा असेल तर धर्माचा पहिला चरण 'सत्य' आचरले जाते. ईश्वराखेरीज काहीच सत्य नाही ही धारणा निर्माण होते. इथे व्यावसायिक जीवनातल्या सत्य-असत्या इत्यादींचा संबंध नाही. अनात्म दुर्लक्षित होत होत आत्मविवेक जसा जसा जागा होत जाईल तसतशी अर्पणभक्ती वाढत जाईल. अर्थात अर्पणभक्ती जाणीवपूर्वकही करावयास सांगितली आहेच

"यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।

यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥९- २७॥"

ह्या प्रमाणें सर्व आंतरिक क्रिया बुद्धियोग प्राप्त व्हावा म्हणून सांगितल्या आहेत. जसजसे अर्जुन हे जाणून घेऊ लागला तसतसा त्याच्या विचारांत फरक पडून बुद्धीत स्थिरता उत्पन्न होऊ लागली. कार्य करण्याचा निश्चय पक्का होऊ लागला. भगवद्गीतेचे हे सामर्थ्य विचारमंथनाने आजही प्राप्त करून घेता येते. ह्याच भगवद्गीतेत भगवंतांनी स्वत:च्या म्हणजे भगवंताच्या प्राप्तीसाठी ब्रह्मसूत्राचा आश्रय घेणे कसे सोयीस्कर होते हे सांगितले आहे.

"ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक्।

ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥१३- ४॥

"किं च ब्रह्मसूत्रपदै: च एव ब्रह्मण: सूचकानि वाक्यानि ब्रह्मसूत्राणि तै: पद्यते गम्यते ज्ञायते ब्रह्म इति तानि पदानि उच्यन्ते|" अर्थात निश्चयात्मक ब्रह्म समजण्यासाठीच तर ब्रह्मसूत्र निश्चयाने व निःसंदिग्ध ब्रह्म विवरण करणारी पदे सांगत आहे.

आपण “सर्व धर्मान्परित्यज्य . . . ” असे भगवंतच म्हणतात म्हणून गोंधळात पडला आहात. धर्माचे बरेचसे विवरण पूर्वी केलेच आहे. तथापि पुन्हां एकदा वेगळ्या वेगळ्या ऐतिहासिक घटनांचा विचार करून आढावा घेऊ. धर्म हे एक तत्त्व आहे. तत्त्व म्हटले कीं त्याच्याशी तडजोड चालत नाही. मग तारतम्य कसें वापरायचे असे आपण विचारले आहे. त्यासाठीच तर भगवंत म्हणालेत “मामेकं शरणं व्रज|” मलाच शरण ये. कारण धर्म हा फक्त आणि फक्त ईश्वरालाच समजतो. धर्म धर्म ज्याला म्हणतात त्या धर्माचा दुरुपयोग करून जर सज्जनांचा छळ होत असेल तर काय निर्णय घेणार? इथे तारतम्य वापरणे आवश्यक असते. भगवान् श्रीकृष्णांनी ते हरप्रकारे वापरून दाखवले आहे. भगवान् श्रीकृष्णांनी धर्माबद्दलच्या आपल्या भोंगळ कल्पना काढून टाकण्याचा खूप प्रयत्न केलेला आहे. कर्ण जेंव्हा रथचक्र जमिनीत रुतल्यावर धर्माचा आधार घेऊन अर्जुनाला थांबवू लागला तेंव्हा भगवान् श्रीकृष्णांनी कर्णाला सरळ सरळ प्रश्न विचारला कीं, ज्या गोष्टींनी फक्त अधर्म घडवला गेला त्या भूतकाळांतल्या तुझ्याच गोष्टी आठव. कुरुकुळाची साम्राज्ञी भरसभेत खेचून आणल्या नंतर कर्णा! दुर्योधनाला मांडी उघडी करून द्रौपदी सारख्या पतिव्रता साम्राज्ञीला दाखवण्याची चिथावणी देताना तुझा धर्म कोठे लोप पावला होता? भर सभेत सासऱ्यांसमोर गुरुजनांच्या समोर कुरुकुलाची पतिव्रता साम्राज्ञी विवस्त्र करण्याची चिथावणी देताना तुझा धर्म कोठे गेला होता? अरे आयुष्यभर अधर्म आणि अधर्मच करणाऱ्यांना फक्त स्वत:च्या फायद्याच्या वेळीच जर धर्म आठवत असेल तर, अर्जुना, आत्ता ह्या क्षणी धर्मपालनासाठी ह्या अधर्मी कर्णाचा वध करण्यात कसलाच अधर्म होणार नाही. घे! उचल ते गाण्डीवधनुष्य आणि एकाच बाणात याचा शिरच्छेद कर.

इतकेच नाही तर फसवणे, खोटे बोलणे हे अधर्माचे लक्षण आहे. पण भगवान् श्रीकृष्णांनी जरासंधाला कसें फसवले हे लक्षांत घेण्यासारखे आहे. खोटे बोलणे सुद्धा खोटे न बोलता बोलले आहेत. श्रीकृष्ण भीमार्जुनांनासह जरासंधाच्या राज्यात स्नातक द्विज म्हणून प्रवेशले. जरासंध धर्माच्या नावाने अधर्मच करीत होता.

जरासंधाला आम्ही स्नातक ब्राह्मण आहोत असे सांगून द्वंद्वयुद्धाची भिक्षा मागितली. भीमाकडून द्वंद्वात जरासंधाला ठार मारवले. जरासंधाने नरमेध करण्यासाठी कैदेत ठेवलेल्या सर्व राजांची सुटका केली. जरासंधाच्या अधर्माचा अधर्मानेच नाश करणे गरजेचे होते. कपट हा ही अधर्मच आहे पण प्रत्यक्ष भीष्मांशी कपट केले आहे. कारण भीष्म धर्माच्या नावाखाली अधर्माची बाजू घेऊन लढणार होते. म्हणून नाममात्र शिखंडीला भीष्मां समोर युद्धास उभे करून अर्जुनाच्या शरसंधानाने त्यांचा निःपात केला. म्हणजे धर्मरक्षणासाठी जर अधर्म वापरावा लागला तर तेही करण्याचे मनोधैर्य केवळ निरपेक्षतेने येते म्हणून निर्वैरता, निरपेक्षता, निस्पृहता, हे धर्माच्या पावित्र्याचे गुण आहेत. अशा सर्व समग्र विचारांनीच धर्माचे अधिष्ठान निर्माण होते. धर्म हा आचारणातूनही दृग्गोचर होतो. सद्‌हेतू साठी आचरला जात असेल तरच त्याला धर्म म्हणता येईल. अर्जुन त्या क्षणी सारासार विचार करून निर्णय करण्याच्या अवस्थेत नव्हता. म्हणून ईश्वराच्या पुढें धर्म जाऊ शकत नाही. फक्त ईश्वरच धर्म जाणू शकतो. हे अर्जुनाला समजावे म्हणून श्रीकृष्णांनी अर्जुनास तसा उपदेश केला. आतां आपल्या लक्षांत येईल कीं धर्म म्हणजे ‘ईश्वरीय’ व्यवस्था. जडातल्या गुणाधिक्यामुळे नियंत्रणाला अत्यंत कठीण अशी ही गोष्ट असल्यामुळे सोप्यातला सोपा धर्माचरणाचा मार्ग म्हणजे ‘ईश्वराचे चरणी आत्मार्पण’!

आचार्य बोलत होते. सभा तटस्थ होती. मंडन हे सर्व ऐकता ऐकता अंतर्मुख झाले होते. त्यांची जवळजवळ समाधीच लागली होती. त्यांच्या हृदयग्रंथी मोकळ्या होऊ लागल्या. संपूर्ण शरीरभर उष्णता निर्माण होऊ लागली. शरीरातील पापांना तेथें राहणे असह्य होऊ लागले. मंडन मिश्रांचा श्वासोच्छ्वास जलद होऊ लागला. शरीरातून बाहर पडणाऱ्या श्वासाची उष्णता वाढू लागली. त्याचा परिणाम गळयातल्या माळेवर होऊ लागला. ती हळुहळू कोमेजू लागली. शरीरही तापू लागले होते. त्यामुळे आत व बाहेर दोन्ही ठिकाणी निर्माण झालेल्या उष्णतेने माळ पूर्ण कोमेजून गेली. मंडन काही काळाने एकदम शांत झाले. त्यांच्या मनांत निरव शांतता निर्माण झाली. ते उन्मनी होऊन तुर्यावस्था भोगू लागले. जे भगवंताने वर्णन केले

"युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः |

शान्ति निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ||६-१५||"

तेच मंडन अनुभवत होते. भारतीमाता उठून उभी राहिली व तिने सभेची निरव शांतता भंग करून सांगितले, "माझ्या पतीची माळ जरी कोमेजली असली तरी चर्चा मी पुढें चालवणार आहे व आचार्य जोवर माझ्या प्रश्नांना समर्पक उत्तरे देणार नाहीत तो पर्यंत माझे पती संन्यास घेणार नाहीत." सभा थक्क होऊन भारतीमातेकडे पहात असतानाच तिने आचार्यांशी बोलायला सुरुवात केली, " आचार्य ! मी आपले मन:पूर्वक अभिनंदन करते. मी आपला आदरच करते. तथापि ह्या सर्व चर्चेत आपण फक्त तीनच पुरुषार्थ विचारात घेतले आहेत. त्यावर अप्रतिम विवरण केले म्हणून अभिनंदन! चवथा पुरुषार्थ "काम" राहिला आहे. त्याबाबत मला चर्चा करावयाची आहे. प्रश्न विचारायचे आहेत. त्याची उत्तरे निर्णय ठरवतील. मला परवानगी आहे कां?" आचार्य अत्यंत गूढ हसले! त्यांच्या लक्षांत आले कीं भारतीने त्यांना सरळ सरळ कालावधी न मागता आज घडायची घटना पुढें ढकलेली आहे. आचार्य अत्यंत निश्चयपूर्वक पण शांतपणे म्हणाले, "माते तूं म्हणतेस तसेच घडेल. तूं जरूर प्रश्न विचार पण आज वा उद्या नाही. मी वयाच्या ९व्या वर्षीच संन्यास घेतलेला आहे. त्यामुळें "काम" ह्या पुरुषार्थाशी दुरान्वयानेही संबंध आलेला नाही. मला तूं सहा महिन्यांचा कालावधी दे. सहा महिन्यांच्या आत मी केंव्हाही येईन. "

भारतीमातेने तत्क्षणी होकार दिला. तिला तेच तर हवे होते. मंडन मिश्रांची इतकी मोठी वेदपाठशाळा आहे. त्या वेदपाठशाळेची सर्व व्यवस्था लावावयाला काही कालावधी हवाच होता. इतका मोठा व्याप सांभाळण्यासाठी मंडन मिश्रांच्या तोलामोलाचा मनुष्यच हवा. तशी सर्व जुळवाजुळव करून मगच मंडन मिश्र संन्यास घेऊन इथून निघून गेलेलें बरे. ह्या धोरणानेच भारतीमातेने आचार्यांना तसा प्रस्ताव केला होता. भारतीमातेचे दुसरे नाव सरस्वती होते. भारती प्रेमळ, सत्वगुणसंपन्न व महापतिव्रता होती. कुमारील भट्टपादांची ती मानलेली बहिण होती. कुमारील भट्टपादांच्या गावी राहणाऱ्या विद्वान व ईश्वरभक्त विष्णुमित्र नामक विप्राची भारती

कन्या होती. भारती अत्यंत बुद्धिमान असल्याचे विष्णुमित्रांनी कुमारील भट्टपाद यांना सांगितले. विष्णुमित्र व भट्टपाद यांचा कौटुंबिक स्नेह होता. त्यांमुळे भारती कुमारील भट्टपादांच्या वेदपाठशाळेत येत असे. विष्णुमित्रांच्या बद्दल भट्टपाद यांना पितृतुल्य आदर होता. म्हणून त्यांनी भारतीला आपली लहान बहिण मानले होते. विष्णुमित्र हे नावाप्रमाणेच विष्णुभक्त होते. संतान प्राप्तीच्या इच्छेने त्यांनी प्रखर व्रताचरण केले. तेंव्हा भगवान् श्रीविष्णूंनी त्यांना स्वप्नात येऊन असा दृष्टांत दिला कीं दुर्वासांच्या शापामुळे सरस्वतीला भूलोकी जन्म घ्यावा लागणार आहे. ती तुझ्या उदरी येईल. भगवान् शिव जेंव्हा भूतलावर अवतार घेतील त्यावेळी त्यांच्या दर्शनाने ती मुक्त होईल. मंडन मिश्रांचा भारतीशी विवाह झाल्यावर ही गोष्ट भट्टपादांनी मंडन मिश्र यांना सांगितली होती. आपल्या गुरूवर मंडन यांची प्रगाढ श्रद्धा होती. त्यामुळे शंकराचार्य आपल्या गुरुंच्या सांगण्यावरून आलेत हे समजल्यावर मंडन यांनी आचार्यांची क्षमा मागितली होती. आचार्यांच्या परतत्त्वस्पर्शी भाषणामुळे मंडन यांना वरील गोष्ट आठवली. त्यांना आपल्या भविष्याची चाहूल लागली. भारतीमातेला ते ज्ञान होतेच. पण मंडन मिश्र तिचा पती होता. सर्व निरवानिरव करताना शक्य तेवढा अधिक सहवास मिळावा अशा दुहेरी हेतूने तिने "काम" हा पुरुषार्थ राहिला असल्याची सबब पुढे केली होती. सभा संपली होती.

आचार्य दुसऱ्या दिवशी महिष्मती सोडून निघणार होते. त्या रात्री मंडन अत्यंत शांत व मूक होते. त्यांच्या मनात कोणतीच शंका उरली नव्हती. कोणत्याच कर्माची आसक्तीही उरली नव्हती. त्यांनी मनाने केंव्हाच संन्यास स्वीकारला होता. आता फक्त जडदेहाचा औपचारिक विधी शिल्लक होता. तो आचार्य करतील तेंव्हा होईल. आपल्याला कोणतीच घाई नाही! आतां एका ईश्वराखेरीज काय आहे? त्या रात्री भारतीने आपल्या मुलाची करावी तशी आचार्यांची सेवा केली. ती मनोमन समजली होती कीं आता आपले जीवन संपले आहे.

प्रकरण १८ वे

# आचार्यांचा परकाया प्रवेश

पद्मपाद, चित्सुखाचार्य, हस्तामलक, प्रभाकराचार्य इत्यादी सर्व शिष्यांना घेऊन आचार्य निघाले. महिष्मती नगरांतले सारे याज्ञिक, वेदज्ञ, प्रतिष्ठित नागरिक व इतर अनेक ईश्वरभक्त नागरिक मंडन मिश्रांच्या निवासाकडे आले होते. बावीस दिवसांच्या आचार्यांच्या सहवासाने त्यांना अपार आनंद मिळाला होता. त्यांना निरोप देण्यासाठी त्यांनी रस्ते सजवले होते. गंध, धूप, दीप इत्यादी तबकांत ठेऊन हारीने अनेक सुवासिनी ओट्या-ओट्यावर दुतर्फा उभ्या होत्या. आचार्यांनी मंडन व भारतीमाता ह्यांचा निरोप घेतला. मंडन व भारती यांचे नेत्र पाणावले. भारतीमाता सहजतेने म्हणाली, “शक्य तेवढ्या लवकर या. सहा महिने थांबायची तशी काही आवश्यकता आहे कां? या लवकर या. आम्ही उभयता आपल्या वाटेकडे डोळे लाऊन बसणार आहोत. हे विसरू नका!” आणि तिने मान वळवली. मंडनच्या डोळ्यांतला भाव आचार्यांना कळला. मंडनच्या उजव्या खांद्यावर हळुवार थोपटून आचार्य त्या वैभवशाली निवासाच्या पायऱ्या उतरू लागले. ओसरीत टांगलेल्या पिंजऱ्यातून राघू-मैना यांच्या पंखांची फक्त फडफड ऐकू आली. त्यांनाही जणू निःशब्दाचे मूळ समजले असेच त्या पक्षांनी दर्शवले.

आचार्य व त्यांच्या पाठोपाठ चित्सुखाचार्य, पद्मपाद, हस्तामलक, प्रभाकराचार्य इत्यादी सर्वजण मार्ग आक्रमू लागले. अनेकांनी लांबूनच त्यांच्यावर पुष्पांचा वर्षाव केला. आचार्य गावाची सीमा ओलांडून बाहेर आले. जवळचा पर्वत पार करून अमृतनगरा जवळ आले. अमृतनगराला पर्वतराजीने वेढलेले होते. अमृतनगर मोठे रम्य होते. अमृतपूरच्या बाहेर असलेल्या अमृतेश्वराच्या मंदिराकडे आचार्यांची पावले वळली. अमृतेश्वरमंदिराच्या समोरच अतिरम्य असे सरोवर होते.

सरोवराच्या बाजूला बरेच लोक खिन्नमुद्रेने चंदनच्या लाकडाची चिता रचित होते. आचार्य सरोवरात चरण क्षालन करून अमृतेश्वराचे दर्शन घेण्याचा विचारांत होते. दुपार होत आलेली होती. चरणक्षालन करण्यासाठी जाताना इतका मोठा सरंजाम कोणाच्या अंत्यविधीसाठी आहे हे पाहावे म्हणून त्यांनी चौकशी केली. त्यावेळी अमृतपूरच्या राजांचे निधन झाले आहे व साधारण तासाभरात त्याला इथे आणले जाईल. त्यामुळे राजा येण्याच्या आत सर्व तयारी पूर्ण करण्यात येत आहे असे आचार्यांना समजले. पद्मपादाचार्य, चित्सुखाचार्य, हस्तामलक, प्रभाकराचार्य इत्यादींसह आचार्य अमृतेश्वराचे दर्शन घेऊन बाहेर आले. पद्मपाद, चित्सुख, हस्तामलक व प्रभाकर व इतर शिष्यांसह आले तसे पुन्हां पर्वताकडे वळले. सार्वजण आचार्य कुठें निघालेत हे न समजल्याने भांबावल्या सारखे त्यांच्या मागे निघाले. पर्वतराजीत आचार्यांनी थोडे निरीक्षण केले. अमृतेश्वर मंदिरापासून खूप दूर उंचावर एका पर्वतावर त्यांना एक निर्जन गुहा दिसली. आपल्या इतर सर्व शिष्यांना होते तिथेच थांबायला सांगून आचार्य चित्सुख, पद्मपाद, हस्तामलक ह्या तिघांना बरोबर घेऊन गुहेत शिरले. गुहा आत चांगलीच विस्तारलेली होती. आत बऱ्यापैकी काळोख होता. आचार्यांना ती गुहा योग्य वाटली. त्यांनी चित्सुखाचार्य, पद्मपादाचार्य, हस्तामलकाचार्य ह्यांना आपली योजना सांगितली. आचार्य म्हणाले, “मी माझा देह इथे ठेऊन अमृतपूरच्या राजाच्या शरीरांत प्रवेश करतो. एक महिना माझ्या शरीराचे रक्षण करा. गुहेचे प्रवेशद्वार दगडांनी बंद करा. डोळ्यांत तेल घालून जपा. कोणालाही चाहूल लागू देऊ नका. मी इथें गुहेत राहणार असल्याचे सांगा. ही गोष्ट षट्कर्णी होणार नाही याची पूर्ण काळजी घ्या. प्रभाकराचार्यांना इतर शिष्यांची काळजी घ्यायला सांगा. आपल्या तिघांपैकी दोघांनी चोवीस तास पहारा ठेवा. एकाची विश्रांती झाली कीं दुसऱ्याची. मी निघतो पण कोणत्याही संकटाची चाहूल लागली तर कोणीही एकाने येऊन माझ्या म्हणजेच राजा समोर येऊन,

कर-चरण-कृतं वाक्कायजं कर्मजं वा, श्रवण-नयनजं वा मानसं वापराधं ।
विहितमविहितं वा सर्वमेतत्-क्षमस्व, जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो !||

हा श्लोक म्हणा, मी तत्क्षणी देह सोडून पुनश्च माझ्या शरीरांत प्रवेश करीन. ” अशी सर्व व्यवस्था करून आचार्य निघून गेले.

आचार्यांचे शरीर त्या काळोखांत ठेवून त्या तिघांनी बाहेर येऊन गुहेचे द्वार बंद केले. आचार्यांच्या आदेशां प्रमाणें इतरांची व्यवस्था केली. “ह्या भागांत परत कोणीही येऊ नका. अमृतेश्वराच्या मंदिरांत वा अन्य ठिकाणी थांबा. योग्यवेळी आचार्य आम्हाला घेऊन आपल्याकडे येतील. शक्यतो अमृतपुरातल्या राजसेवकांच्या घराघरांत भिक्षेच्या निमित्ताने जाऊन काही विशेष गोष्ट समजली तर भिक्षेला आमच्या तिघांपैकी जो कोणी येईल त्याला कल्पना द्या. अत्यंत सावध राहा. आचार्य इथल्या गुहेत आहेत हे कुणालाही कळू देऊ नका. त्याबाबत पराकाष्ठेची गुप्तता बाळगा. हा आचार्यांचा आदेश आहे. ” इतके सांगून हस्तामलक, चित्सुख हे परत गुहेकडे निघून गेले.

प्रभाकराचार्य सर्व शिष्यांना घेऊन अमृतेश्वराच्या मंदिराकडे आले. त्यावेळी चिता रचून तयार झालेली होती. राजावर अंत्यसंस्कार करण्यासाठी राजाला आणले होते. अंत्यदर्शनासाठी राजाचे शव एका फुलांच्या गादीवर ठेवण्यात आले होते. इतक्यात राजाने हालचाल केल्याचा भास झाला. झोपेतून उठावे तसे राजाने आळस दिला व राजा उठून बसला. हे पाहून सर्व प्रजा, प्रधान, त्यांचे मंत्री आनंदाश्चर्याने पाहू लागले. राजा तडफदारपणे उभा राहिला. अवाक् झालेला महामंत्री पुढें आला. त्याने राजाला मानवंदना दिली. त्यावेळी सर्वांनीच राजाचा जयजयकार केला. अंत्यविधीपूर्ण करण्यासाठी आलेल्या ब्राह्मणांनी प्रसंगावधान राखून कणिकेचे प्रतिक करून तिचे दहन केले. तो विधी पूर्ण करून त्यांनी राजाला सरोवरांत

संकल्पयुक्त मंत्रस्नान घातले. राजाने नवीन भरजरी वस्त्रे परिधान केली. तोवर अंबारीसह सजवलेला हत्ती आणण्यात आला.

अमृतपुरीत अमाप उत्साह संचारला. रस्त्या रस्त्यांत सडे शिंपले गेले. घरा घरा समोर राजाच्या स्वागतासाठी लोक पुष्पमाला, पुष्पे, पुष्पगुच्छ असे जे मिळेल ते घेऊन उभे राहिले. राजमार्गावरून राजाची स्वारी राजवाड्याकडे निघाली. वेशी जवळ येताच वेसकऱ्यांनी वेशीवरचे नगारे पिटायला सुरुवांत केली. तुताऱ्या निनादू लागल्या. राजप्रासादांत महाराणीने अत्यानंदाने शृंगार केला. दासींना उंची वस्त्रे दान केली. त्यांनाही सजवून आपल्या बरोबर घेतले. पंचारतींनी सजवलेली तबके त्यांच्या हातात दिली. स्वत: रत्नजडीत सुवर्णाची पंचारती व पुष्पहार, अत्तर, हळदीकुंकूम, कस्तुरी, मोत्याची अक्षत, चंदनाचे गंध इत्यादी घेऊन राजाला सामोरे जाण्यास सिद्ध झाली. राजप्रासादा जवळच्या प्रवेशद्वारी राजा येतांच मृदुंगावर थाप पडली. भेरी वाजू लागली, वीणा झणत्कारु लागली, झालरी घुमू लागल्या, नर्तिका नृत्य करू लागल्या. उजव्या बाजूस उभे केलेले भाट स्तुतीपर गीते गाऊ लागले. वातावरण हर्षोल्हासीत झाले. राजाने प्रासादांत प्रवेश करतांच महाराणीने पंचारती ओवाळली.

अमृतेश्वराच्या मंदिरांत ज्यावेळी प्रभाकराचार्य आले त्याचवेळी त्यांनी सर्व प्रकार पाहिला होता. राजाचे स्नान, पूजा चालू असतानाच प्रभाकराचार्य महामंत्र्याला न्याहाळत होते. त्याच्या निकटवर्तीयांनाही ते न्याहाळत होते. राजा जिवंत झालेला पाहून प्रभाकराचार्य काय समजायचे ते समजले. चित्सुखाने सांगितलेले त्यांच्या बरोबर ध्यानात आले. त्यांनी त्याच क्षणी निश्चय केला व राजघराण्यातल्या लोकांना तिथेंच हेरून ठेवले. आतां त्यांना जास्तच काळजी वाटू लागली. सर्व शिष्यांना त्यांनी एका बाजूला बोलवून काही गुप्त सूचना दिल्या. आपण निवडक शिष्यांसह मिरवणुकीत सामील झाले. सर्व भगवी वस्त्रे धारण केलेले संन्यासी म्हणून त्यांना अग्रभागी मानाचे स्थान मिरवणुकीत मिळाले. त्यामुळे

प्रभाकराचार्यांचे काम अधिकच सोपे झाले. राजप्रासादांत सहज प्रवेश मिळाला. त्यांच्या पूजनाची व्यवस्था महामंत्र्याने केली. सर्व संन्याशांचे पाद्यपूजन झाले. प्रभाकराचार्यांचे तेज पाहून सर्व संन्यासी त्यांचे शिष्य असल्याचे अनुमान महामंत्र्यांनी केले. त्यामुळे महामंत्र्याने प्रभाकराचार्यांना आपल्या घरी पाचारण केले. हे सर्व व्यवस्थित पार पडले. राजाने महामंत्री व राजपुरोहित यांच्या सह राजसिंहासनाकडे गमन केले. राजा सिंहासनावर आरूढ झाला. राजपुरोहिताने योग्य तो अभिषेक करून राजाचा जयजयकार केला.

दुसऱ्या दिवसापासून राजदरबार इतक्या वेळेवर सुरू झाला कीं महामंत्री थोडे आश्चर्य चकित झाले. आजवर त्यांना नेहमी राजे सभेत येण्याची वाट पहावी लागत असे. सभा सुरु होताच राजा भराभर निर्णय देत होता. मग प्रश्न कृषी विषयक असो की नगरातल्या नागरिकांचा असो. व्यापारविषयक असो कीं धार्मिक समस्येचा असो. प्रत्येक निर्णय राजा स्वत: अत्यंत तर्कशुद्ध व निःसंदिग्ध निर्णय व सूचना देई. राजदरबारात विविध क्षेत्रातले तज्ञ पंडित नेमलेले होते. त्यांना विचार करण्यासही अवधी मिळत नव्हता. ते विचार करेपर्यंत राजा निर्णय देऊन पुढल्या प्रश्नाकडे वळत होता. दरबारात नवचैतन्य आल्यासारखे झाले होते. सर्व प्रश्न सहजतेने हाताळणाऱ्या राजाने जेंव्हा अपराध प्रकरण आले तेंव्हा दंडनीतीसाठी आपल्या मंत्रीमंडळाला भराभर प्रश्न विचारले. त्या प्रश्नांची साधक-बाधक चर्चा नेमलेल्या तज्ञांशी केली. अपराधीला स्वत:ची बाजू मांडण्याची पूर्ण मुभा देऊन तर्कशुद्ध पद्धतीने विश्लेषण करून अपराध असल्याची खात्री करून मगच निर्णय देऊ लागला. काहींना मंत्र्यांनी वैमनस्यातून अपराधी ठरवल्याचे राजाच्या लक्षात आले. त्यांचे निर्णय राजाने सबळ कारण पुढे करून ते पुनर्विचारार्थ दुसऱ्या दिवसावर ढकलले. त्याचा परिणाम नगरांतल्या प्रतिष्ठित नागरिकांवर फार चांगला झाला. सलग आठ-दहा दिवसांत संपूर्ण नगरांत लोकांमध्यें अपूर्व आत्मविश्वास निर्माण झाला. चौर्यकर्म करणारे धास्तावले. गुंडगिरी करणारे घाबरले. दंडेली करणारे कचरले. ठाणेदार ठाणे सोडून

उगाच कोठें जाईनासे झाले. कोतवाल कोतवाली करताना चारचार वेळा विचार करू लागले. अमलदार लांच लुचपतीपासून चार हात दूर राहू लागले. राजा दुपारनंतर राणीच्या महालांत न जाता नगरांत मंत्र्यांसह दौरा करून येऊ लागला. जवळपास असलेल्या शेतांवर नजर फिरवून सायंकाळी सूर्यास्ता पूर्वी नगरांत येऊ लागला. येताना अमृतेश्वराच्या मंदिरासह नगरांतल्या किमान दोन तीन मंदिरांना भेटी देऊ लागला. त्यामुळें मंत्र्यांना पडझड झालेल्या मंदिरांची डागडुजी करून घेणे व पुजारी नेमणे भाग पडले. पौराणिक इतिहास व भगवद्भक्ती ह्यांचे मार्गदर्शन सामान्य जनतेला व्हावे म्हणून राजाने भराभर वैदिकतज्ञ, उत्तम कीर्तनकार, विद्वान प्रवचनकार इत्यादी नेमून सर्व मंदिरांचे पुनरुज्जीवन केले. त्यामुळे कथा किर्तनांचा धिंग मंदिरा-मंदिरात निनादू लागला. लोकांची सायंकाळ हरीभक्तीत फुलून जाऊ लागली. १५-२० दिवसांत अमृतपूर सर्वतोपरी चैतन्यमय झाले.

खाजगी जीवनांत राणी पहिल्याच भेटीत मोहरून गेली. एकतर अशक्यकोटीतील गोष्ट शक्य झाली होती. त्यानंतर आतां राजदरबारात घडणाऱ्या गोष्टी समजून ती भारावली गेली होती. राजा बद्दलच्या तिच्या भावना इतक्या उत्कट झाल्या कीं राजा फक्त रात्रीच्या समयीच येणार आहे हे समजल्यावर तर तिने राजाच्या स्वागतासाठी अत्यंत रम्य व प्रसन्न वातावरण निर्मितीची तजवीज केली. राजा अंत:पुरात येण्याच्या समयी स्वत: हातात आरती घेऊन त्याचे स्वागत करू लागली. अत्यंत प्रेमादराने राजाला हाताला धरून मंचकावर बसवून त्याची प्रसन्नता वाढवीत असे. विविध प्रकारे शृंगार करून स्तनांना केशराची उटी लावीत असे. सुगंधी द्रव्यांचा यथायोग्य वापर करीत असे. नेत्र काजळाने सुशोभित दिसतील व आपल्या पतीला आल्हाद देतील असे सजवीत असे. तथापि राजा फारसा विचलित होत नाही हे तिच्या लक्षात आले. राजा अत्यंत प्रेमाने वागतो, बोलतो तिला सुखावेल अशी क्रीडा करतो. पण तरी तो अलिप्त असल्याचे तिला जाणवत असे. राजाच्या बाहुपाशात युगे युगे राहावे असे हल्ली तिला कां वाटू लागले आहे हे मात्र

ती समजू शकेना. एक गोष्ट विशेषत्वाने तिच्या लक्षात आली ती म्हणजे राजा पूर्वी इतर दासींकडे पहात असे ते आता ढुंकूनही पहात नाही. त्याच्या पूर्वीच्या सगळया संवयी बदलेल्या तिला जाणवत होत्या. राजाने दासींकडून सेवा घेणे बंद केले होते त्यामुळे राणी स्वत:च सर्व सेवा करीत होती. तिला जणू श्रीकृष्णच आपल्या सहवासात असल्याचे वाटू लागले. अनंतकाल आपल्याला अशीच सेवा करण्यास मिळो म्हणून ती मनोमन प्रार्थना करू लागली. तिला काय माहित कीं आपली प्रार्थना कधीच फलद्रूप होणार नाही. ती बिचारी स्वत:च्या भाग्याला दृष्ट लागू नये म्हणून व्यथित झाली होती.

इकडे महामंत्री व मंत्रीमंडळातील ज्येष्ठ मंत्री आश्चर्य करीत होते. महामंत्र्यांनी वीस दिवसांनी एक गुप्त बैठक आयोजित केली. सेनापती व इतर हेरखात्याच्या अमात्यांसह सर्व प्रमुखांना बोलावले. त्यांत महामंत्र्याने आपला विचार मांडला. “कदाचित् कोणत्यातरी योग्याने राजाच्या शरीरांत प्रवेश केला असला पाहीजे. जर तो योगी सशरीर व आजवर जीवित असेल तर त्याने राजांत प्रवेश करण्यापूर्वी आपले शरीर पूर्वी मच्छिंद्रनाथांनी जसे लपवून ठेवले होते तसे लपवून ठेवले असणार त्यामुळें आपण गुप्तपणे शोध घेऊन ते शरीर शोधून काढले पाहिजे. अर्थातच हे काम राजाच्या नकळत व गुप्तपणे करावे लागेल. ते तसे सोपे नाही पण करणे आवश्यक आहे. असा माझा विचार आहे. ”

महामंत्र्यांच्या ह्या विचाराचा सर्वांनी स्वीकार केला. महामंत्री पुढें म्हणाले, “शरीर सांपडल्यावर आपण त्याला अग्नी द्यायचा म्हणजे राजातला योगी कुठेंही जाऊ शकणार नाही. राजा अनंतकाळ राज्य करून कदाचित् चक्रवर्ती सुद्धा होईल असे वाटते. ” सर्वांनीच तो विचार उचलून धरला. गुप्तपणे कार्याला सुरुवांत करण्याचा सर्वांचा निर्धार झाला.

महामंत्र्यांचा प्रभाकराचार्यांवर पूर्ण विश्वास बसला होता. त्यामुळें त्यांच्याकडून आपणास योग्य मार्गदर्शन मिळेल ह्याची त्याला खात्री होती. म्हणून

त्याने प्रभाकराचार्यांना सहज विचारले, “राजा पुनर्जीवित झाला, हा चमत्कार आपणास कोणत्या प्रकारचा वाटतो?” प्रभाकराचार्य अत्यंत सावध होते. त्यांनी लगेच साधा प्रतिप्रश्न केला, “राजा नक्की मृत झाला आहे ह्याची खातरजमा कोणी केली होती कां?” महामंत्री म्हणाले, “राजवैद्य आपल्या विद्येत पारंगत आहेत. त्यांनी पूर्ण तपासणी करून हा निर्णय दिला होता. दुसरे असे कीं राजाचे पूर्वीचे वागणे, बोलणे, निर्णय देणे, राज्यकारभाराची पद्धत हे सर्व बदलले आहे. त्यामुळेच मला जबरदस्त शंका येत आहे कीं कुणीतरी योगी त्यांच्या शरीरांत प्रवेशला असावा. ह्याबाबत आपले काय मत आहे. ” ह्यावर प्रभाकराचार्य म्हणाले, “ तशी शक्यता नाकारता येत नाही. पण जे घडले आहे ते जर आपल्या फायद्याचे असेल तर मग त्याचा आपण कां बरे उहापोह करायचा? उलट ईश्वराचे आभार मानून आपण त्यांच्या कर्तबगारीचा लाभ घेणेच उचित नाही कां?”

हे ऐकून महामंत्री लगेच “होय, त्याच प्रयत्नांत आहे!” असे म्हणाले व सावधपणे बोलणे थांबवले. प्रभाकराचार्यांना तेवढ्या बोलण्यावरून जो काय निष्कर्ष काढायचा तो काढता आलाच. दुसऱ्याच दिवशीं त्यांनी भिक्षाटनाला आलेल्या हस्तामलकांना अमृतेश्वराच्या मंदिरात सावधानतेची जाणीव दिली. महामंत्र्यांचे हेर सर्वत्र फिरू लागले होते. डोंगर, दऱ्या, वने, गुहा, मंदिरे, मंदिरांची भुयारे असा कसून शोध सुरु होऊन १० -१५ दिवस झाले. हेरांनी पद्मपाद ज्या गुहेबाहेर वास्तव्याला आहेत त्या बंद गुहेची माहिती दिली. महामंत्र्याला आपले काम फत्ते झाल्यासारखे वाटले. त्याने भिक्षाटनाला आलेल्या प्रभाकराचार्यांनाच काय विधी करून ते शरीर जाळवे? तसे केल्या नंतर पापमुक्त होण्यासाठी कोणते प्रायश्चित्त घ्यावे इत्यादी विचारपूस केली. दुसऱ्याच दिवशी हे सर्व पार पाडण्याचा आपला विचारही स्पष्ट केला. प्रभाकराचार्य हे मीमांसक व वेदज्ञ असल्यामुळे त्यांनी अगदी विचारपूर्वक महामंत्र्यांना सगळे विधी सांगितले. ते इतके होते कीं त्याच्या तयारीला त्याच क्षणापासून लागणे आवश्यक होते. प्रभाकराचार्य लगेच अमृतेश्वर मंदिराकडे गेले. पुढचा सर्व धोका

ओळखून प्रभाकराचार्यांनी एका शिष्याला पद्मपादांना सावध करण्यासाठी निरोप पाठवला कीं "आचार्य जर समाधीत असतील तर त्यांना समाधीतून बाहेर आणून उद्या पहाटेच आपल्याला पुढल्या मुक्कामी जाणे गरजेचे आहे. मी इतर शिष्यांसह पर्वताच्या पायथ्याशी वाट पहात आहे. "

हा निरोप मिळताच पद्मपादांनी चित्सुखांना त्वरित राजवाड्यात जाऊन राजाची भेट घेऊन खुणेचा श्लोक म्हणण्याची सूचना केली. चित्सुख त्वरित निघाले. राजप्रासादांत त्यांना सन्मानाने प्रवेश मिळाला. अर्थात महामंत्र्यांचे हेर तिथें होतेच. चित्सुखाचार्यांना राजच्या भेटीसाठी नेण्यात आले. राजाने राणीला पाचारण करून तिच्याकडून चित्सुखाचार्यांचे पाद्यपूजन करवून घेतले. चित्सुखांनी शून्यात नजर लाऊन निघताना "कर-चरण-कृतं वाक्कायजं कर्मजं वा, श्रवण-नयनजं वा मानसं वापराधं । विहितमविहितं वा सर्वमेतत्-क्षमस्व, जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो !|| हा श्लोक म्हटला व शांतपणे निघून गेले. राजाचे व त्यांचे काहीच बोलणे न झाल्यामुळे हेरांना काहीच अंदाज बांधता आला नाही. त्यांना काही शंकाच आली नाही. त्यांनी ती एक सामान्य घटना समजून सोडून दिली.

त्या रात्री राजा नित्याप्रमाणे राणीच्या महालात आला. पहाटेच जाग येऊन त्याने राणीला उठवले. राणीला सुर्योदयापूर्वीच स्नान करून घे म्हणून सांगितले. तूं परत आल्यावर मला जर मला झोप लागलेली असली तर उठवू नकोस. असे सांगून राजा परत मंचकावर पहुडला. राणी राजाच्या इतकी आधीन झालेली होती कीं निःशंक मनाने नित्यकर्म करण्यास ती निघून गेली. जाताना शय्या गृहाच्या दरवाजावर एका दासीला पहारा द्यायला सांगितला व मी परत येई पर्यंत कोणालाही आत जाऊ देऊ नकोस. महाराज झोपले आहेत. मी आल्यावर उठवीन. " असे सांगून निघून गेली.

चित्सुखांनी व पद्मपादांनी पहाटेच्या प्रहरी गुहेचे द्वार उघडले. आचार्य शांतपणे बाहेर आले. सूर्योदयापूर्वीच फटफटलेल्या मंद प्रकाशांत आचार्यांसह सर्वजण महिष्मतीचा मार्ग आक्रमू लागले. पूर्वदिशा उजळू लागली. सुर्योदयापूर्वीच ते अमृतपूरपासून कितीतरी दूर गले. महामंत्र्याच्या सुचनेप्रमाणें सेनापती आपल्या निवडक सैनिकांसह त्या गुहेजवळ आला. गुहे जवळ कोणीच नव्हते. कोणत्याच प्रकारच्या प्रतिकारा खेरीज काम होणार म्हणून त्याला बरेच वाटले. पण गुहेतही कोणीच नाही हे पाहून तो चांगलाच चरकला. त्याने त्वरित महामंत्र्यांना खबर दिली. महामंत्री होते तसेच राजप्रासादाकडे निघाले. सूर्य आता बराच वर आला होता. राजप्रासाद नित्याप्रमाणें कार्यान्वित झालेला होता. महामंत्र्यांनी राजाची भेट मागितली. महाराणींनी येऊन महामंत्र्यांचे स्वागत केले. ती म्हणाली, “महाराज आज अजून झोपले आहेत. मी स्नानादी आवरून त्यांना पाहून आले. त्यांनी मला पहाटेच सूचना दिली होती कीं, मी जर जास्तवेळ झोपलो तरी उठवू नकोस. म्हणून मी त्यांना उठवले नाही. ” महामंत्री मटकन खाली बसले. महाराणीच्या पोटात त्यामुळें धस्स झाले. ती मागल्या पावली महाराजांच्या शय्यागृहांत गेली. कांहीं क्षण गेले आणि शय्यागृहातून काळजाचा ठाव घेणारी आर्त किंकाळी आली. सारा राजप्रासाद भेदून ती आकाशांत विरून गेली.

प्रकरण १९ वे

# मंडन मिश्र संन्यासाश्रमांत

पद्मपाद, चित्सुख, हस्तामलक, प्रभाकराचार्य इत्यादींचे कौतुक करीत आचार्य मार्ग आक्रमित होते. साधारण दीड पावणेदोन महिन्यातच ते महिष्मतीला परत येत होते. महिष्मतीच्या जवळ येतांच नागरिकांना त्यांची चाहूल लागली. वार्ता लगेच वाऱ्यासारखी पसरली. आचार्य मंडनमिश्रांच्या निवासाजवळ आले. त्यावेळी तिथे जमलेल्या प्रचंड जनसमुदायाने आचार्यांचा जयजयकार करून स्वागत केले. भारती व मंडन आचार्यांच्या वाटेकडे डोळे लाऊनच बसलेले होते. त्यामुळे त्यांच्या आनंदाला तुलनाच नव्हती. विद्वान, प्रतिष्ठित, मीमांसक इत्यादींना आता पुन्हा ज्ञानचर्चा होणार म्हणून आनंद झाला. मंडन-भारती ह्यांनी आचार्यांचे चरणक्षालन केले. व्याघ्रचर्म पसरून केलेल्या उत्कृष्ट आसनावर त्यांना बसवून पूजन केले. स्वागत समारंभ झाल्यावर उद्या पासून चर्चा होईल असे ठरले.

दुसरा दिवस उजाडला. मंडनला आतां ह्या चर्चासत्रांत काडीचाही रस उरलेला नव्हता. पण आचार्य स्वत: वक्ते आहेत, त्यांचा प्रत्येक शब्द मोलाचा आहे. त्यामुळें आपण त्यांचे भाषण श्रवण केलेच पाहिजे ह्या शिष्यप्रज्ञेतून मंडन श्रवण करणार होता. योग्यवेळी आचार्य सभास्थानी आले. भारती व मंडन यांच्यासह सर्वांनीच उभे राहून त्यांना अभिवादन केले. आचार्य आसनस्थ झाल्यावर इतर सर्वजण आपापल्या जागी बसले. अनेक विद्वानांच्या मनांत एकच प्रश्न होता कीं ‘काम’ ह्या पुरुषार्था विषयी प्रश्न विचारणारी एक प्रौढ अनुभवी व प्रगल्भबुद्धिमत्ता असलेली विद्वान स्त्री आहे. तर उत्तरे देणारे आचार्य केवळ वीसवर्षाचे संन्यासी तरुण आहेत. त्यामुळें सभेत सर्वांसमक्ष ह्या विषयावर निर्भीडपणे उत्तरे देतील कां? अशा प्रकारचे विचार त्यांच्या मनांत येत असतानाच भारतीमातेने ईशस्तवनास सुरुवात केली. आचार्यांकडून प्रश्न विचारण्याची अनुमती घेतली. अनुमती मिळताच तिने प्रश्न विचारला, “स्त्री व पुरुष दोघांसाठी हा पुरुषार्थ सारख्याच प्रमाणांत आहे कां?”

आचार्यांनी “हो!” म्हणताच भारती म्हणाली, “ जर आपण हो म्हणता तर श्रुती-पुराणे इत्यादिकांमध्ये स्त्रीसंग त्याज्य कां सांगितला आहे? बहुतेक सर्वच ठिकाणी स्त्रीमुळे अध:पतन होते अशाप्रकारचे धोके दाखवले आहेत. जर पुरुषार्थ सारखाच आहे तर फक्त स्त्री त्याज्य कशी? स्त्रीलापण आत्मसन्मान असतो अशी जाणीव ह्या पुरुषार्थात आहे कां?” आचार्य म्हणाले, “माते! तूं म्हणतेस ते अगदी खरे आहे कीं शास्त्रातून व पुराणातून कंठरवाने स्त्रीसंग त्याज्य आहे असे सांगितले आहे. वैदिक वाङ्मयात तसे आहे. तरी सुद्धां विचार करण्यासारखी गोष्ट ही आहे कीं इतका कंठशोष करून किती जण ती गोष्ट टाळू शकलेले आहेत? किंवा किती जणांनी त्या अर्थाने त्याज्य मानला आहे? तसा तर तो पुरुषार्थ म्हणून मानला गेला असल्यामुळे अनेक विद्वान त्याचा चुकीचा अर्थ लावत असल्यामुळे ही गफलत होत आहे. ते असो पण आत्मसन्मान ज्याला तूं म्हणतेस तो तर वैदिक वाङ्मयात निश्चित दिलेला आहे. पण रुढींनी तो नीट पाळला नाही ही खेदाची गोष्ट आहे. स्त्री जर खरोखर त्याज्य मानली गेली असती तर वेदांनी “मातृदेवो भव” म्हटले असते कां? आत्मसन्मान ज्याला तूं म्हणतेस तो यापेक्षा काय वेगळा असतो? तरीही वेगळेपणाने सुद्धां तो “यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता: | यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफला: क्रिया: ||” इतक्या तीव्रतेने तो मनुस्मृतीत व्यक्त केलेला आहे. पण हे सर्व कशासाठी सांगितले आहे तर ईश्वरप्राप्तीसाठी व ईश्वरीय क्रीडनासाठी प्रजोत्पादन व्हावे ह्या उद्देशाने सांगितले आहे. विषयभोगासाठी नाही. आतां हे स्पष्ट आहे कीं एखादेच व एकदाच उल्लेख केलेल्या वाक्याचे विस्मरण होते व पुन्हां पुन्हां उल्लेख केलेल्या गोष्टी मनावर ठसतात म्हणून तशी योजना केली आहे. ”

ह्यावर भारतीमातेने आचार्यांच्या उत्तरातले मधलेच एक वाक्य घेतले व विचारले, “स्त्री जर खरोखर त्याज्य मानली गेली असती तर” असे आपण म्हणालात त्याचा नक्की अर्थ काय? पुरुषाला फक्त ‘काम’ ह्या पुरुषार्थासाठी त्याज्य नाही असा अर्थ घ्यायचा कां? मग स्त्रियांच्या बाबात्च्या ‘काम’ ह्या पुरुषार्थाचे काय?” आचार्य म्हाणाले “माते, खरे तर काम हा पुरुषार्थ निषेधात्मक पुरुषार्थ म्हणूनच प्रतिपादन

केला आहे. जर विधिवत पालन करावयाचे ठरवले तरच हे कळणार! भगवंतांनी स्वत:च त्यामुळे भगवद्गीतेत "बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम्।

धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥७- ११॥ असे म्हटले आहे अर्थात 'काम' या ह्या शब्दाचा अर्थच समजून घेतला जात नाही. माते काम म्हणजे ज्या गोष्टींची कामना मनात उत्पन्न होते ती गोष्ट. ती गोष्ट प्राप्त झाल्यावर त्यात रममाण होणे म्हणजे राग. त्यामुळें भगवंत म्हणतात मानवी शरीरात मी अशा प्रकारचे बल आहे कीं जो काम व राग विवर्जित आहे. त्यामुळें पुढे स्पष्ट करतात कीं प्राणिमात्रांत देहधारणेसाठी आवश्यक पण शास्त्रानुसार असलेली कामना म्हणजे काम मी आहे. त्यामुळें स्त्री काय अथवा पुरुष काय दोघांनाही काम हा पुरुषार्थ तितकाच सारखा आहे. अध्यात्मात स्त्री पुरुष हा भेद केलाला नाही. धर्माचरणात कामासाठी निषेधच अधिक सांगितले आहेत. त्यांतही कामाची व्याप्ती अमर्याद आहे. काम हा कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये ह्यांचा स्वभाव आहे. विषयसुखाची चटक लावावी लागत नाही. ती सर्व प्राणीमात्रांतील उपजत वृत्ती आहे. कोणतेही शिक्षण न देताच ती निर्माण होते. त्यामुळें शास्त्राला त्यासाठी वेगळा प्रयत्न करण्याची गरज भासली नाही तर तो संयत करण्याची गरज भासली आहे. त्याची परिणीती शास्त्रात निषेधात झालेली आहे. कारण कामाची व्याप्ती इतकी प्रचंड आहे कीं काम हा क्रियात्मक पुरुषार्थ मानून जर आचरण घडू लागेल तर मनुष्याला ब्रह्मदेवा एवढे आयुष्य मिळाले तरी तो पुरुषार्थ साध्य होणार नाही. जननेंद्रियांच्या विषयापेक्षाही इतर विषय अफाट आहेत. त्यांत श्रवण, नेत्र, रसना, त्वचा व घ्राण ह्यांच्या माध्यमातून शब्द, रूप, रस, स्पर्श व गंध ह्यांच्या असंख्य व नित्य बदलणाऱ्या संवयी लक्षांत घेऊनच ऋषींनी शास्त्रांत असंख्य नियम प्रतिपादन केले आहेत. त्यात प्रत्येकाचे निषेधच व्यक्त केले आहेत. त्या निषेधांच्या पालनालाच पुरुषार्थ म्हटले आहे. म्हणूनच भगवान् श्रीकृष्णांनी "काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः |

महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ||३७||"

म्हणजे काम हाच सर्वांचा शत्रू असून त्याच्यामुळे सगळा अनर्थ होतो. काम प्राप्त झाला तर ठीक नाही तर तो क्रोधाचे रूप धरण करतो म्हणजे क्रोध हा एक प्रकारे कामच. यांची उत्पत्तीच रजोगुणातून होते. कामच रजोगुणाकरवी आपल्याला कार्यान्वित करीत असतो. बर अनेक वेळा असे ऐकायला मिळते कीं अमुक तमुक गोष्टीच्या इच्छेमुळे मी हे केले. म्हणजे मानवाचे खरे तर ते एक दुःखच असते पण तरी सुद्धा त्याच्याकडून पापकर्म घडवणारे काम हे वैरीच नाही कां? ह्या पेक्षा महत्वाची गोष्ट भगवान् श्रीकृष्ण पुढें स्पष्ट करतात कीं अग्नी प्रकट होताना सहजतेने धूर उत्पन्न करतो अथवा आरसा जसा धुळीने व्याप्त होतो अथवा गर्भ जसा नाळेने गुंडाळलेला असतो तद्वत ज्ञान सुद्धा कामाने झांकलेले असते. भगवान् म्हणतात,

"धूमेनाऽऽव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च |
यथोल्बेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ||३. ३८||

त्यामुळे विवेकी लोकांनी त्याच्या पासून सावध राहणे आवश्यक असते. शिवाय ह्या कामाचे अधिष्ठान मन व बुद्धी सारख्या सूक्ष्म इंद्रीयाशी निगडीत आहे. जीवाला तो नाना प्रकारच्या मोहातच अडकवत असतो. बुद्धी पेक्षा आत्मा सूक्ष्म आहे. त्यामुळें स्त्री असो कीं पुरुष असो त्याला आत्मतत्त्व जाणून घेण्यासाठी ह्या कामरूपी शत्रूचा प्रतिकार करावाच लागतो. म्हणून तर भगवान् श्रीकृष्ण म्हणतात,

"एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना |
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ||३. ४३||"

ह्यावर भारतीमाता म्हणाली कीं आपण जर असे म्हणता आहात तर मग उद्धवाला उपदेश करताना भगवान् श्रीकृष्ण तर असे सांगतात कीं, "स्त्रीणां स्त्रीसङ्गिनां सङ्गं त्यक्त्वा दूरत आत्मवान् | क्षेमे विविक्त आसीनश्चिन्तयेन्मामतन्द्रितः ॥ भा. ११/१४. २९ ॥ इतकेच नाही तर पुढें असेही म्हणतात कीं "न तथास्य भवेत् क्लेशो बन्धश्चान्यप्रसङ्गतः ।

योषित्सङ्गाद् यथा पुंसो यथा तत्सङ्गिसङ्गतः ॥भा. ११/१४/ ३० ॥" "उद्धवा! स्त्रियांची व त्यांच्याशी संगती करणाऱ्या स्त्रैण पुरुषाशी दुरान्वयानेही संगती करू नये.

स्त्रियांची व स्त्रैणांची संगती पुरुषाला जितकी बद्ध करते व क्लेशकारक होते तितकी ती इतर कशानेही होत नाही. असे कां सांगितले? कारण आपल्या म्हणण्याप्रमाणें सुरतभोगापेक्षां इतर विषय अफाट आहेत. पण श्रीकृष्ण तर इतर विषयांपेक्षां हा बंध अधिक क्लेशकारक असे म्हणतात. त्याचा अभिप्राय काय हे आपण नीट समजावून सांगाल तर मला समाधान होईल. कारण इथे पती-पत्नी संबंध सुद्धा गृहीत धरला जातो. ” भारती इतके बोलून थांबली. आचार्य काय विवरण करतात हे ऐकण्यासाठी सभा अत्यंत आतुर झाली. सर्व सभा अत्यंत सावधानतेने आणि आनंदाने श्रवणभक्तीत तल्लीन झालेली होती. आचार्य बोलू लागले, “भगवान् श्रीकृष्णांनी जे सांगितले ते स्त्रियांच्या एका वैशिष्ट्यपूर्ण पण निसर्गदत्त स्वभावाला अनुसरून सांगितले आहे. स्त्रिसंग जर मनांत घर करून बसला तर ईश चिंतनाकडे मन लागत नाही. स्त्री सुद्धां पुरुषांना विविधप्रकारे बंधनांत अडकवण्याचा प्रयत्न करीत असते. मातृत्व स्त्रियांच्या ठिकाणी प्रबळ असते. संसारबंध ज्याला म्हणतात तोच इथून सुरु होतो. स्त्रीला वीट नाही, आळस नाही, कंटाळा नाही त्यामुळें ईश्वराने निर्मिती स्थानी जी माया उत्पन्न केली तिचे अधिष्ठान स्त्रीमध्ये पुरुषांपेक्षा व्यापक प्रमाणत व सर्वाधिक आहे. स्त्रिया विविध भोगांनी पुरुषाचे मन आकर्षित करीत असतात. त्यांत खाण्या-पिण्याच्या संवयींपासून ते संपूर्ण जीवनाच्या विविध स्तरात त्या आपला ठसा उमटवीत असतात. त्यांचा उद्देशच पुरुष संसारांत कसा गुंतून राहील हा असतो. एकदां मन संसारांत गुंतून ईश्वाचे विस्मरण होऊ लागले म्हणजे पुरुषाच्या अध:पतनाला सुरुवात झालीच म्हणून समजावे. म्हणून स्त्रीसंग हा आधी मनांतून काढून टाकावा लागतो. त्यासाठी हा पुरुषार्थ स्त्री-पुरुष दोघांनीही विषयाकडे धावणाऱ्या मनाला आकळण्यासाठी प्रतिकार व संयम ह्यांच्या माध्यमातून आचरायचा असतो. माते पती-पत्नी ह्यांना सुद्धा संयम व सहृदयता ह्यांच्या सह ईश्वराचे प्रेम मनीधरून धर्माचरण करून उपभोगाने इंद्रियदमन आवश्यक आहे. म्हणूनच प्रजोत्पादनासाठी असलेल्या क्रियारूप आचरणाला संभोग अर्थात समभोग असे म्हटले आहे. सृष्टी अव्याहत चालावी व ईश्वराचे क्रीडन अबाधित राहावे ह्या

हेतूने ती एक ईश्वरीय योजनाच आहे. ह्या योजनेचे वैशिष्ट्य असे कीं यथा योग्य काळी ती अंत:प्रेरणेने स्फुरण पावते. त्यासाठी खास शिक्षणाची काही आवश्यकता भासत नाही. अनुनयादी अविष्कार हे उभयपक्षी निसर्गत:च उत्पन्न होत असल्याचे आपण अनुभवत असतो. त्या सर्व योजनेंत दोन जीवांचे मिलन हे फक्त मानवीयोनीतच सुसंस्कृत केले गेले आहे. या संस्कारासाठी अग्निसाक्ष सप्तपदी सात प्रतिज्ञेच्या उच्चारासह केल्या जातात त्या तशाप्रकारचे आचरण करण्यासाठी. तसेच पुरुषाकडून 'मी माझ्या पत्नी खेरीज इतर कोणत्याही स्त्रीची अभिलाषा न बाळगता एकपत्नीव्रताचे पालन करीन' अशी प्रतिज्ञा करवून सामाजिक सहजीवन सुरक्षित केले जाते. ते सर्व पालन करून जो नियमित केलेल्या कामाचा उपभोग घेतो त्याला हा पुरुषार्थ साधतो. ह्याचा अर्थ वासनामय जीवनावर नियंत्रण ठेवण्यासाठी जो पुरुषार्थ दाखवावा लागतो तो उभयपक्षी सारखाच आहे. तथापि स्त्रीसंगाचे धोके दाखवण्यासाठी शास्त्र सतत विविध स्वरुपांच्या सूचना व मार्गदर्शक तत्त्वांचे प्रतिपादन करते ते पुरुषांची स्वैर होणारी वासना नियंत्रित करण्यासाठीच जर स्त्री ही सुद्धा स्वैर स्वभावाची असेल तर तिलाही तेच लागू पडणारे आहे. कारण पुरुषार्थ हा ईश्वरप्राप्तीसाठी मानला गेला आहे. ईश्वरप्राप्ती हा स्त्री व पुरुष दोघांचाही जन्मसिद्ध हक्क आहे. फक्त त्याची जाणीव रहात नाही म्हणून या पुरुषार्थाचे हे विवरण केले आहे. " इतके बोलून आचार्य थांबले.

भारतीमातेसह सर्व सभा तटस्थ झाली होती. त्या तटस्थतेचा भंग भारतीमातेने

" ॐईशान:सर्व विद्यानामीश्वर: सर्व भूतानाम् |
ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोधिपतिर्ब्रह्मशिवो मे अस्तु सदाशिवोम् ||"

ह्या श्लोकाने केला. ती म्हणाली, "आपणच साक्षात् सदाशिव आहात. आपणास माझा नमस्कार आहे. आपण साक्षात् जगद्गुरुच आहात. माझ्या पतीला मी संन्यास ग्रहण करण्याची अनुमती देत आहे. " इतके बोलून भारतीमातेने नमस्कारासाठी जोडलेले दोन्ही हात आपले पणावलेले नेत्र झांकण्यासाठी नेत्रांवर ठेवले. तो हृद्य प्रसंग सभेतल्या प्रत्येकाच्या अंतर्यामी कोरला गेला.

आचार्यांनी मंडन मिश्रांना संन्यास दीक्षा दिली. मंडन अत्यंत शांत व प्रसन्न चेहऱ्याने आचार्यांच्या समोर उभे राहिले. आचार्यांनी त्यांना विधी संन्यास दिला. त्यावेळी उपदेश देताना आचार्यांनी त्यांना “तत्त्वमसि” चा मंत्र दिला. मंडन त्या मंत्राशी इतके एकरूप झाले कीं, आचार्य जेंव्हा त्या मंत्राचा प्रभाव त्यांच्यावर ठसवण्यासाठी म्हणाले, ‘हे शरीर म्हणजे तूं नाहीस, पञ्चज्ञानेंद्रिये व पञ्चकर्मेंद्रिये म्हणजे तूं नाहीस, तस्मात्तत्त्वमसि प्रशांतममलं ब्रह्माद्वयं यत्परम् |’ आचार्यांच्या ह्या एकेका उच्चारा बरोबर मंडन त्या त्या अनुभूती अनुभवीत होते. तत्क्षणी त्यांची समाधी लागली. बराचवेळ ते त्याच स्थितीचा अनुभव घेत राहिले. त्यांचा सामाधीभंग करण्यासाठी आचार्यांनी हांका मारली “उठा, सुरेश्वराचार्य! उठा. आतां देहभानावर येऊन त्याच अवस्थेचा अनुभव चालता बोलता अहोरात्र घेत राहा. ”

सुरेश्वराचार्य देहभानावर आले. त्यांनी प्रथम आपल्या गुरूंना म्हणजेच आचार्यांना साष्टांग नमस्कार केला. नेत्रांतल्या अश्रूंना वाट मोकळी करून दिली व त्याच अश्रूंनी आचार्यांचे चरणक्षालन केले. आचार्य आतां महिष्मती सोडून जाणार. त्यांचे इथले पवित्र वास्तव्य संपणार म्हणून जमलेल्या प्रतिष्ठित वैदिकांनी त्यांना एक दिवस अधिक राहण्याची प्रार्थना केली. आचार्यांनी ती मान्य केली. दोन दिवसांनी आचार्य निघाले. आचार्य निघाले त्यावेळी एक महान् आचाचार्यकारक घटना घडली. आचार्य निघतेवेळी आचार्यांनी भारतीमातेला वंदन केले त्यावेळी आशीर्वाद देताना भारतीमाता म्हणाली, “शंकरा, तूं साक्षात् शंकर आहेस. तुझ्या दर्शनाने मी मुक्त झाले आहे. ह्यांनीही संन्यास घेतला आहे. आतां माझे इथे काही उरलेले नाही. त्यामुळें मीही निघते. ” इतके बोलून भारतीमाता सर्व जनसमुदाय पाहत असतानाच अदृश्य झाली. अनंतात विलीन झाली. हे पहाता क्षणीच आचार्यांनी आपल्या मंत्र प्रभावाने तिला पुन्हां प्रकट केले. सर्व लोक हे आश्चर्य अवलोकन करून तटस्थ झाले होते. त्यांच्या हे लक्षांत आले कीं भारतीमाता दिव्यलोकातून परत आलेली आहे. पुन्हां जेंव्हा ती प्रकट झाली तेंव्हा ती अत्यंत तेजस्वी दिसत होती. तिच्या चरणांकडे पाहून असे वाटत होते कीं ही मानवी स्त्रीची पाऊलेच नाहीत. अत्यंत कोमल,

तेजस्वी व भूमीवर टेकलेलीच नसल्याचे जाणवत होते. चरणकमळांत तेजस्वी नूपुर धारण केलेले होते. नूपुरांवर तिच्या चरणकांतीचे तेज पडल्यामुळे ते अधिक तेजस्वी दिसत होते. नूपुरामुळे चरणाला शोभा आली कीं चरणांमुळेनूपुरांना शोभा आली हे ठरवणे कठीण होते. नखशिखांत सुवर्णा-लंकारांनी सुंदर दिसणारी भारती म्हणजे साक्षात् सरस्वतीच वाटत होती. आचार्य तिला म्हणाले, "माते तूं जर अशीच निघून गेलीस तर इहलोकी असलेल्या आम्हा बालकांना कोण सांभाळणार? तुझ्या सामर्थ्याने ज्ञानगंगा सदैव प्रवाही राहावी, वैखरीवाणी सत्वगुणांनी युक्त व्हावी म्हणून हे शारदे तूं जाऊ नकोस. " आचार्यांच्या बोलण्यावर संतुष्ट झालेल्या शारदामातेने एक अट घातली, ती म्हणाली, " मी तुझ्या मागे येईन. तूं प्रथम दक्षिण दिशेकडे चल. मी तुला एकट्याला दिसेन. पण ज्या ठिकाणी तूं संशय घेऊन मागे वळून पाहशील त्या ठिकाणी मी उभी राहीन व अदृश्य रूपाने तिथेच वास्तव्य करीन!" आचार्यांनी ही अट मान्य केली. सुरेश्वराचार्यांना आपण महिष्मतीमध्ये परत येई पर्यंत महिष्मतीतच थांबायला सांगून आचार्य दक्षिणे कडे निघाले. आचार्य त्या निवासातून शारदेसह जेंव्हा बाहेर पडले तेंव्हा सनई विरहकातर स्वरांत हळुवार गुंजारव करू लागली.

प्रकरण २० वे

# शारदा मंदिराची स्थापना

मंडनमिश्र स्वत:च शंकराचार्यांना शरण आल्यामुळें त्या सर्व परिसरांत व आजू बाजूच्या सर्व शहरांमध्ये वैदिकसनातनधर्माच्या दुंदुभी निनादू लागल्या. बौद्ध व जैन पंथाकडे आकर्षित झालेले सर्वजण वैदिक अनुष्ठान अध्यात्मासाठी प्रमाण मानून त्याप्रमाणें आचरण करू लागले. आचार्यांनी रचलेली स्तोत्रे मंत्र व प्रार्थना घरोघरी सुरु झाल्या. सर्वजण स्वत:ला वैदिक परंपरेत सुखरूप मानू लागले. सुरेश्वराचार्य म्हणजेच पूर्वाश्रमीचे मंडनमिश्र आपल्या अमोघ वाणीने त्यांना मार्गदर्शन करू लागले. ह्या झंजावाती यशोदुंदुभीचा नाद द्वारकानरेश ते नेपाळनरेशां पर्यंत जाऊन पोहोचला. त्या नरेशांच्या मनांत आचार्यांना भेटून त्यांचा आशिर्वाद आपल्या प्रजेला मिळावा असे आले म्हणून आपले दूत त्यांनी महिष्मतीला सुरेश्वाराचार्य ह्यांच्याकडे रवाना केले. तो पर्यंत आचार्य दक्षिणेकडे गेलेहोते. ते परत येई पर्यंत थांबणे भाग होते.

आचार्य आपल्या निवडक शिष्यपरिवाराला घेऊन दक्षिण दिशेला निघाले. गांवा गांवातून प्रवचने, प्रबोधन इत्यादी करीत आचार्य चालले होते. त्यांना कधी थकवा नव्हता कीं कधी प्रबोधनाचा कंटाळा नव्हता. एकदा बोलायला सुरुवांत केली कीं सामान्य लोकांना आकलन होईल अशा सोप्या भाषेत अस्खलित व तेजस्वी वाणीने तासनतास बोलत. श्रोते पन्नास कीं पंचवीस हा प्रश्न नाही. श्रोते आचार्यांच्या वाणीने इतके भारावून जात कीं परमार्थ इतका सोपा व संसारात राहून करण्याजोगा आहे तर तो आपण लगेच केला पाहिजे ही जाणीव त्यांच्या मनात लगेच ठसत असे. आचार्यांच्या स्तोत्रांच्या नकला भराभर केल्या जात होत्या व लोक त्या स्तोत्रांचे नित्य पाठ करू लागले होते.

मजल दरमजल करीत आचार्य तुंगभद्रा नदीच्या काठी आले. तुंगभद्रा येई पर्यंत शारदामाता आपल्या मागोमाग येत असल्याची चाहूल शारदामातेच्या चरणातल्या

नूपुराच्या किणकीणीने लागत होती. पण तुंगभद्रेच्या काठाने वाळूतून चालताना आचार्यांना चाहूल लागेना. बराचवेळ झाला आचार्य कानोसा घेत होते पण पण चाहूल काही लगत नव्हती. शेवटी न राहवून आचार्यांनी हळूच मागे पहिले. शारदामाता मागेच उभी होती. तिने स्मितहास्य केले आणि ती अदृश्य झाली. आचार्यांनी तिची पाऊले ज्या ठिकाणी होती त्या ठिकाणी आपल्या दंडाने खूण केली व शिष्यांना तिथें शारदामंदिर बांधण्यास सांगितले. जागा नेमून दिली व परिसरातल्या गावांतल्या नागरिकांनी भरघोस मदत दिली. अत्यंत सुंदर व देखणे असे शारदामंदिर दिमाखात उभे राहिले ते आजही तसेच आहे.



प्रकरण २१ वे

# श्रीनगरच्या सर्वज्ञपिठावर आरोहण

आचार्यांनी शारदामातेला बघण्यासाठी उत्तरेकडे तोंड केले आणि शारदामाता गुप्त झाली. मग मात्र आचार्यांनी पुन्हां उत्तरेकडे जायला सुरुवांत केली. पुनश्च मजल दरमजल करीत आचार्य पद्मपाद, चित्सुख इत्यादींसह महिष्मतीला आले. सुरेश्वराचार्यांना बरोबर घेऊन आचार्य श्रीनगरकडे निघाले. श्रीनगरला आचार्य व आचार्यांच्या वैदिकसनातन धर्माची उद्बोधक चर्चा मोठ-मोठ्या विद्वान पंडितांमध्ये होत होती. त्याकालांत काश्मीर म्हणजे पंडितांचे आगर होते. आचार्य प्रतिपादन करीत असलेल्या दोन गोष्टी त्यांना उलगडत नव्हता. एक म्हणजे "अद्वैत" व दुसरे म्हणजे "ब्रह्मसत्य जगन्मिथ्या" ! अद्वैत म्हणजे काय? जग जर आपण सदैव अनुभवतो व अनादीकाळापासून चालत असलेल्या जगरहाटीला मिथ्या म्हणजे असत्य कसे म्हणता येईल? ज्याला सत्य म्हटले जाते ते दिसत तर नाहीच पण आकलनशक्तीच्याही बाहेरच आहे. त्यामुळें विद्वान मंडळी आचार्यांची त्या भागात येण्याची वाटच पाहत होते. श्रीनगरमध्यें फारपूर्वी एक सर्वज्ञपीठ स्थापन झाले होते. त्यापिठावर आरोहण करण्यासाठी तिथल्या पंडितांच्या शंकांचे समाधान करावे लागत असे. त्या पिठाला पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण असे चार दिशांना चार दरवाजे होते. पूर्व-पश्चिम-उत्तर हे तीन दरवाजे त्या त्या दिशांतल्या विद्वानांनी आपले पांडित्य सिद्ध करून सर्वज्ञपिठावर बसण्याचा मान मिळवून उघडले गेले होते. पण दक्षिणेकडील दरवाजा अद्याप बंद होता. कारण दक्षिणेकडून आलेल्या विद्वांनांपैकी कोणताच विद्वान आपले पांडित्य सिद्ध करू शकला नव्हता त्यामुळे सर्वज्ञपिठावर बसण्याचा मान दक्षिणे कडील विद्वानाला अद्याप मिळाला नसल्याने तो दरवाजा बंद होता.

आचार्य, पद्मपादाचार्य, चित्सुखाचार्य, सुरेश्वराचार्य इत्यादींसह सर्वांचे श्रीनगरमध्ये अवर्णनीय स्वागत झाले. त्या सर्व आचार्यांच्या समुदायांत शंकराचार्य भास्करा सारखे तळपत होते. त्यांच्या दर्शनामुळे श्रीनगरच्या पंडित मंडळींना अत्यंत आनंद झाला. कारण हे सर्व पंडित भगवान् शिवाचे उपासक होते. त्यांना आचार्यांची कीर्ती शिवाचा अवतार म्हणून ज्ञात झाली होती. त्यामुळें शिवाचा हा चालता बोलता अवतार कसा असेल हे पहावयास ते अत्यंत उत्सुक होते. त्यांची ती उत्सुकता आचार्यांच्या दर्शनाने पूर्ण झाली. ती उत्सुकता पूर्ण झाली पण दुसरी म्हणजे "अद्वैत व ब्रह्मसत्य जगन्मिथ्या" ह्यांच्या खुलाशाची उत्सुकता अजून पूर्ण व्हायची होती. पंडित मंडळींनी आचार्यांच्या बरोबर चर्चासत्र आयोजित केले. त्या चर्चासत्रांत हा खुलासा करून घ्यायचा त्यांनी ठरवला.

योग्यवेळी सभा भरली. सभेत प्रमुखपदी असलेल्या पंडिताने प्रश्न केला, "आचार्य! आपण ब्रह्म हेच एक सत्य आहे व दृश्यमान जग हे मिथ्या आहे. असे सांगता. त्यामुळें व्यावहारिक गोंधळ होतो. जगातील सगळ्याच गोष्टी मिथ्या मानून भोजन तर टाळता येत नाही. तृषार्त झालेल्याला तृषा मिथ्या म्हणून जलपान केल्या खेरीज राहता येत नाही. भोजन, जल हे जे प्रत्यक्ष अनुभवाला येते व त्याचा परिणाम दाखवते त्या अनुभवास येणाऱ्या गोष्टींना मिथ्या म्हणायचे व जे अनुभवाला येत नाही जे दिसत नाही ते ब्रह्म सत्य मानायचे ह्या आपल्या शिकवणूकीने जिथे आम्हीच घोटाळ्यात पडतो तिथें सामान्य मनुष्याला हे कसें पटवून सांगता येईल? शिवाय स्वत:ला पटल्या शिवाय इतरांना ते कसे पटवून द्यावे?" आचार्य विवेचन करू लागले. आचार्य म्हणाले, "खरे आहे. आपण म्हणता ते अगदी खरे आहे. सामान्य लोकांना केंव्हां पटवून सांगता येईल तर ते आपल्याला पटेल तेंव्हा. म्हणून प्रथम जग हे मिथ्या कसे ह्याचा आपण विचार करू. पहिली गोष्ट म्हणजे मिथ्या हा शब्द जो वापरला गेला

त्याची उत्पत्ती ‘मित’ ह्या मूळ शब्दापासून झालेली आहे. मित म्हणजे सीमा असलेले. ह्या पांच प्रकारच्या मिती आहेत. लांबी, रुंदी, उंची, दिशा आणि काल ह्या त्या पांच मितींमध्ये सर्व विश्व सामावलेले आहे. त्यामुळें मिथ्या ह्या शब्दानें हे लक्षांत घ्या कीं जग हे जरी अनादी काळापासून भासमान होत असले तरी प्रलयकाली ते नष्ट होते. विष्णुसहस्रनामात शर्व, महाशन, अमिताशन, असे म्हटले आहे त्याचा अर्थच असा कीं शर्व म्हणजे “श्रृणाति संहारसमये संहरति संहारयति सकला: प्रजा: इति शर्व: |” अर्थात समस्त प्रजेचा संहार करतात अथवा करवतात म्हणून ते शर्व: म्हटले जातात. तसेच महाशन म्हणजे “कल्पान्ते सर्व ग्रसनात् | महदशनमस्येति महाशन:” अर्थात कल्पांताच्या वेळी सर्वांचा ग्रास घेतात म्हणून भगवंताचे ते महान् अशन म्हणजे भोजन असते त्याअर्थाने त्यांना ‘महाशन:’ असे म्हणतात. अमिताशन म्हणजे “संहारसमये विश्वमश्नातीति अमिताशन: ||” अर्थात संहाराच्यावेळी मिती नसलेले म्हणजे अमित असे सगळया विश्वाचे भोजन करतात म्हणून ते ‘अमिताशन’ म्हणून ओळखले जातात. त्याच कारणासाठी “सङ्कर्षणोऽच्युत:” म्हणजे प्रलयाचेवेळी एकदम सर्व स्थावर-जंगमासह आकर्षण करून घेतात पण स्वत:च्या पदापासून ढळत नाहीत. ह्या सर्व विवरणा वरून जे दृश्यमान आहे ते विलयाला जाणारे आहे. जे विलयाला जाणारे आहे ते काही काळापर्यंत दिसणारे आहे म्हणजे मित आहे म्हणजेच मिथ्या आहे. आतां सामान्य लोकांना पटवण्याच्या अनेक युक्त्या आहेत. माझी स्वत:चीच गोष्ट सांगतो. काशींत असताना मी हे प्रत्येक प्रवचनात सांगत असे कीं ब्रह्म हे एकच सत्य आहे व जग मिथ्या आहे. तो एक आभास आहे हे आत्मज्ञान झाल्यावर समजते, इत्यादी. एकदा मी गंगेवरून स्नान करून रस्त्यावरून चाललो असताना समोरून एक मत्त हत्ती येताना दिसला. तो सरळ माझ्या अंगावर येणार असे मला जाणवले. त्याला चुकवण्यासाठी मी बाजूच्या बोळांत शिरलो. हत्ती सरळ पुढे निघून गेला. मी बोळातून बाहेर आलो. पुढचा

मार्ग आक्रमू लागलो. त्यावेळी हे सर्व पाहात असलेला एक गृहस्थ माझ्या समोर आला आणि म्हणाला, ‘‘कां हो महाराज! जग मिथ्या तर हत्तीपण मिथ्या, त्याचे धांवणे पण मिथ्या. मग आपण बोळांत कां शिरलात?’’ त्यावेळी मी त्याला म्हणालो, ‘अरे बाबा जसा हत्ती मिथ्या, त्याचे धांवणे मिथ्या तसे माझे बोळांत शिरणे मिथ्याच नाही कां?’ ह्यावर तो गप्प बसला. त्यामुळें मिथ्यावाद हा व्यवहाराच्या पातळीवर निरर्थक आहे. व्यवहार हा व्यवहारभेदाने व शास्त्राधारे करावयाचा. विश्वातल्या यच्चयावत पदार्थांचे नाशिवंतपण म्हणजेच अशाश्वतपण अध्यात्माच्या बैठकीसाठी मनात ठसवून घ्यायचे असते. त्यामुळें भौतीकातल्या पदार्थांची अनासक्ती उत्पन्न करून घ्यावयास मदत होते. आपल्या मनाला व बुद्धीला जन्मजन्मांतरीची दिसेल तेच सत्य मानायची संवय जडलेली असते. सूक्ष्माचा कोणी विचार करायला प्रवृत्त होत नाही. जन्माला येण्यापूर्वी आपले वेगळ्या म्हणजे सूक्ष्म रूपांत अस्तित्व असल्या खेरीज जन्माला येऊ शकू कां? हा विचार केला पाहिजे. त्यामुळें जन्म प्राप्त झाल्यावर बाल्यावस्था क्रीडनांत घालवायची, तारुण्यात कांता आणि धनसंपदा जोपासायची अन् वृद्धाप्य आले कीं काळजी करीत बसायचे! मृत्यू समीप आला कीं सहस्त्रवृश्चिकदंशा सारख्या वेदनांनी मूर्च्छित होऊन प्राण सोडायचा! हे स्वत:चा अध:पात करून घेणे आहे. बालपणापासून जर त्या जीवावर आपल्या वैदिक शास्त्राच्या आधारे भौतिकाचे नश्वरत्व आणि परब्रह्माचे नित्यत्व ठसावत नेले तर तो तरुणपणी काही विचार तरी करू शकेल. सत्य काय आहे हे त्याला जाणून घेण्याची जिज्ञासा उत्पन्न होईल. परमसत्य ज्याला म्हटले जाते ते एकच आहे. ते शाश्वत असणारे आहे. म्हणूनच श्रीविष्णुसहस्त्रनामांत ‘अग्राह्य: शाश्वत: कृष्णो’ असे म्हटले आहे. ‘शाश्वत् सर्व कालेषु भवतीति शाश्वत:, शाश्वतं शिवमच्युतम् इति श्रुते: |’ अथवा ‘वसुर्वसुमना: सत्य: . . . . . . ’ ह्यात म्हटल्याप्रमाणें अवितथरूपत्वात्परमात्मा सत्य आहे. तैतरीय उपनिषदात ‘‘सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म’’ असे

स्पष्ट केलेले आहे. याचा अर्थ शाश्वत असणारे ते ब्रह्म. जे शाश्वत आहे ते सत्य. म्हणून अशाश्वत जेवढे आहे तेवढे सर्व असत्य म्हणजे मिथ्या. आतां आपला पुढचा प्रश्न जग दिसते म्हणून ते सत्य वाटते. ब्रह्म दिसत नाही भासत नाही. अनुभवता येत नाही, मग सत्य कसे मानावे? दिसण्यामुळे व अनुभवता येण्यामुळे जग हे सत्य वाटते पण नाशिवंत असल्यामुळे त्याचे मिथ्यत्व ध्यानांत येऊ शकते. कारण तसा अनुभव मृत्यू, भौगोलिक स्थित्यंतरे, उल्कापात, महापूर इत्यादी घटना दिसण्यामुळे येतो. परब्रह्माचे तसें नाही. तो अनुभवण्याची क्रिया व्यक्तिगत आहे. विश्वाला निश्चित कोणत्या तरी शक्तीचा वा सामर्थ्याचा आधार आहे. हे सामर्थ्य फक्त परब्रह्माचे अथवा ब्रह्म म्हणून ज्याला संबोधले त्या सत्याचे आहे. अर्थातच त्यामुळें परब्रह्म हे अतींद्रिय आहे. जर ते अतींद्रिय न राहता सावयव झाले तर त्याच्या सामर्थ्याला मर्यादा पडणार. म्हणूनच कठोपानिषद त्याचे वर्णन “अशब्दमस्पर्शम्” असे करते. विष्णुसहस्त्रनामांतही “अतीन्द्रियो महामायो महोत्साहो महाबल: |” अशा नामांनी संबोधलेले आहे. ह्याचा अर्थ इंद्रियांना गोचर न होणारा, ज्याच्या मायेचा थांग लागणार नाही असा, विश्वोत्पत्ती-स्थिती-लय ह्यामध्यें तत्पर असणारा व सर्व विश्व स्वाधीन ठेवण्याचे सामर्थ्य असणारा असा परमात्मा. ह्या सर्व वर्णनावरून परब्रह्माचे अस्तित्व समजू शकते. प्रश्न उरतो फक्त अनुभूतीचा. त्याचा अगदी साधा व्यावहारिक विचार करू. आपण व्यहारात हे नेहमी अनुभवतो कीं ज्याचे सामर्थ्य अधिक तो श्रेष्ठ. ग्रामाधिपती पेक्षा देशाधिपती श्रेष्ठ. देशाधिपती पेक्षा नृपती श्रेष्ठ. राष्ट्राचा प्रभू तो राजा. अश्या बऱ्याच राजांवर वर्चस्व गाजवणारा तो महाराजा. अशा सर्व महाराजांवर वर्चस्व गाजवणारा तो चक्रवर्ती. हा सर्व खेळ आपण व्यवहारांत अनुभवतो. जो सर्व श्रेष्ठ चक्रवर्ती त्याला सर्वच शरण गेलेले असतात. चक्रवर्ती राजा सर्व महाराजांवर अधिकार कसा गाजवतो? एकदा दिग्विजय प्राप्त करून घेतला कीं आपल्या राजप्रासादातून सर्व सूत्रे आपल्या हाताखाली

असलेल्या अधिकाऱ्यांच्या मार्फत हलवतो. प्रत्यक्ष त्याला काही करावे लागत नाही. तद्वत् परब्रह्म एकदा सृष्टी निर्माण करते व त्या त्या विविध देवतांच्याकडे विविध अधिकार सोपवून कार्य चालू राहते. पण खरा सर्व अधिकार व सामर्थ्य फक्त परब्रह्माच्याच हाती असते. म्हणून परब्रह्माला शरण गेल्या खेरीज त्याचे सामर्थ्य अनुभवता येत नाही. त्यासाठीच भगवंताने अर्जुनाला "मामेकं शरणं व्रज" असे सांगितले. सर्व सभा "वा:! वा:!" असे प्रशंसोद्गार काढू लागली. आचार्य काही काल बोलायचे थांबले. त्यावेळी त्याच पंडिताने प्रश्न केला, "आपण तर अद्वैत प्रतिपादन करता व अजातवादाचेही प्रतिपादन करता मग ब्रह्म जर अनेक अधिकारी देवता नेमते व सृष्टी उत्पन्न करते तर अद्वैताला व अजात कल्पनेला छेद जातो. तरी 'अद्वैत व अजात' म्हणजे नक्की काय?"

ह्या प्रश्नावर आचार्य अत्यंत धीरगंभीर आवाजांत बोलू लागले, "विबुध हो ! प्रथम आपण हे ध्यानांत घ्या कीं अद्वैत व अजात वाद मी माझ्या मताने प्रतिपादन करीत नाही. हा पूर्वीपासून समजावून सांगितला जातो, मुक्तिकोपनिषदात भगवान श्रीराम हनुमंताला म्हणतात – "सायुज्य, सारूप्य, सालोक्य तथा कैवल्य मुक्तिपैकी कैवल्य मुक्ति कोणत्या उपायाने प्राप्त होते ते ऐक –

माण्डूक्यमेकमेवालं मुमुक्षूणाम् विमुक्तये ॥ २६ ॥
तथाप्यसिद्धम् चेद् ज्ञानम् दशोपनिषदं पठ ।
ज्ञानम् लब्ध्वा चिरादेव मामकम् धाम यास्यसि ॥ २७ ॥

मुमुक्षूंना फक्त माण्डूक्यौपनिषद मुक्त करण्यास पुरेसे आहे. एव्हढ्याने उपरती न झाल्यास मात्र दहा उपनिषदांचे अध्ययन करणें आवश्यक आहे. ह्या दशौपनिषदांच्या अभ्यासाने माझे तेजोमयी अद्वैतधाम प्राप्त होऊं शकेल. " ह्या सगळ्या तपशिला वरून विबुध हो आपण हे समजू शकाल कीं अद्वैताचे प्रतिपादन प्रत्यक्ष श्रीरामांनीही केले

आहे. अद्वैत व अजात वाद हे फार पूर्वी मुनिवर्य मांडूक यांनी आपल्या “माण्डुक्यौपनिषदांत” प्रतिपादन केलेले आहे. हे माण्डूक्यौपनिषद सध्या प्रसिद्ध असलेल्या दशोपनिषदांपैकी एक उपनिषद आहे. ह्याच माण्डुक्यौपनिषदाचा बोध व्हावा म्हणून माझ्या गुरुंचे गुरु गौडपादाचार्य ह्यांनी त्यावर कारिका निर्माण केली आहे. त्या कारिका अत्यंत सोप्या असून मूळ माण्डुक्यौपनिषदांतला आशय समजण्यास मदत होते. अद्वैत व अजात वाद हा अनुभवण्याचा विषय आहे. तो कसा अनुभवता येतो ज्याचे सुलभ मार्गदर्शन गुरु गौडपादाचार्य ह्यांनी निर्माण केलेल्या कारिकांच्या माध्यमातून अतिशय सुलभ होते. त्यांनी “आगम प्रकरण”, “वैतथ्य प्रकरण” व “अद्वैत प्रकरण” यांच्या माध्यमांतून “माण्डुक्यौपनिषद” समाजाऊन सांगितले आहे. त्याचा आपण विचार करू. तथापि भगवान् श्रीकृष्णांनी स्वमुखाने अर्जुनाला हा विचार भगवद्गीतेत बऱ्याच प्रकारांनी सांगितला आहे. त्यांत आपण विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर आहे. ब्रह्म जर अनेक अधिकारी देवता निर्माण करते तर अजात कसे? हा आपला प्रश्न आहे. भगवान् श्रीकृष्ण असे म्हणतात “अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीष्वरोऽपि सन् | प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ||४-६||” जन्मरहित: अपि तथा अक्षीणज्ञानशक्तिस्वभाव: अपि तथा ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तानाम् ईशनशील: मम वैष्णवीं मायां त्रिगुणात्मिकां यस्या वशे सर्वं जगद् वर्तते यया मोहितं सत् स्वम् आत्मानं वासुदेवं न जानाति तां प्रकृतिं स्वाम् वशीकृत्य देहवान् इव भवामि जात इव आत्मनो मायया न परमार्थतो लोकवत् |” भगवान् श्रीकृष्ण असे म्हणतात कीं मी अजन्मा म्हणजे जन्मरहित, क्षीण न होणारा, सर्वज्ञ, सर्व शक्तिमान असून ब्रह्मदेवासह सर्व प्राण्यांचे नियमन करणारा ईश्वर आहे. माझ्याच नियंत्रणात असलेली त्रिगुणात्मिका वैष्णवी माया सर्वांना मोहित करते, त्यामुळे प्रत्येक जीव स्वत: आत्मतत्त्वाने वासुदेवच असला तरी तसे जाणू शकत नाही. त्या मायेला स्ववश ठेउनच मी देह धरण करतो. पण तो

इतरांसारखा नसतो. जन्म घेऊनही मी अजन्माच असतो. ” त्यामुळें विबुधहो! अजन्मा अद्वैत ह्या दोन्हीचा विचार फक्त अध्यात्म जाणण्याच्या हेतूनेच करणे गरजेचे आहे. माण्डुक्यौपनिषदातला पहिलाच मंत्र असे सांगतो कीं, “ओमित्येदक्षरमिदं सर्व तस्योपव्याख्यानं भूतंभवद्भविष्यदिति | सर्वमोङ्कारं एव | यच्चायन्त् त्रिकालातीतं तदप्योङ्कार एव ||१||” अर्थात ॐ हे अक्षरच सर्व काही आहे. भूत, भविष्य, वर्तमान हे त्याचेच स्वरूप असून या व्यतिरिक्त जे त्रिकालातीत आहे तेही ॐकारच आहे. दुसऱ्या मंत्रात “सर्वंह्येतद् ब्रह्मायमात्मा ब्रह्म सोऽयमात्मा चतुष्पाद ||२||” म्हणजे त्या योगे हे सर्व ब्रह्मच आहे. हा आत्माही ब्रह्मच आहे. तो आत्माच चार भागांचा आहे. भगवान् श्रीकृष्णांनी सुद्धां ॐच ब्रह्म असल्याचे भगवद्गीतेत सांगितले आहे “ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् | यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ||८-१३||” ब्रह्मण: अभिधानभूतम् ॐकारं उच्चारयन् तदर्थभूतं ईश्वरम् अनुचिन्तयन् परीत्यजन् शरीरम् गच्छति प्रकृष्टां | अर्थात ॐकाराच्या उच्चारात जर शरीर त्याग केला तर तो जीव ब्रह्मस्वरूप होतो. असे सांगितले आहे आणि ९व्या अध्यायात “पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः | वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ||१७||” आपण स्वत:च ॐकार असल्याचे सांगितले आहे. आतां ह्या सर्व ज्ञानगम्य गोष्टी असल्यामुळें आपण पूर्वग्रह न ठेवता मूलार्थाने विचारांत घेतल्या तरच लक्षांत येणार. त्याचे कारण असें कीं.

“यं भावं दर्शयेद्यस्य तं भावं स तु पश्यति |
तं चावति स भूत्वासौ तद्ग्रह: सामुपैति तम् ||मां. का. वै. प्र. २९||

ज्याला जो भाव दाखवला जातो तोच पाहून त्यातच तो रमायला लागून तद्रूप होतो, मग तोच भाव जपू लागतो. त्यानंतर त्याची एक आग्रहात्मक भूमिका तयार होते. ह्यावर उपाय काय? तर निश्चयात्मक बुद्धीने आपले चित्त निर्विकल्प ठेवण्याचा प्रयत्न केला तर हा अजातवाद व अद्वैतवाद धारण करता येईल. पण हा सगळा उलट दिशेकडे

जाण्याचा प्रवास किंवा प्रवाहाच्या उलट जाणे आहे. म्हणजे जडातून सुक्ष्माकडे जाण्याचा हा प्रकार ध्यानात ठेवायचा. त्याचे कारण जडाचे माध्यम सदोष आहे. ब्रह्म हे एकच निर्दोष आहे. भगवान् श्रीकृष्णांनी हे भगवद्गीतेत "इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः | निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ||१९||" असे सांगितलेले आहे. जड सर्व सदोष कसे तर वैखरी वाणीने निर्दोष बोलता येत नाही. कारण परब्रह्माचे वर्णन वेदांना न करता आल्यामुळे तर ते शेवटी नकारात्मक भूमिकेतून "न इति-न इति" असे म्हणून मूक झाले आहेत. जड श्रवणेंद्रीयांनी निर्दोष श्रवण करता येत नाही. चर्मचक्षुंनी निर्दोष पाहता येत नाही. हे ध्यानात घेऊनच निर्दोष काय आहे ह्याचा विचार करायचा. निर्दोष फक्त ब्रह्म आहे. कारण तिथें द्वैतभाव नाही. आपण सर्वत्र द्वैत पाहत असतो. द्वैत पाहण्याच्या संवयीमुळे आपल्याला सदोष जीवन जगावे लागत आहे हे आपल्या कधीच ध्यानात येत नाही. त्यासाठीं चंचल मनाला निश्चयात्मक बुद्धीने आत्मतत्त्वात स्थिर केले पाहिजे. तरच संकल्प-विकल्पात्मक द्वंद्व वा द्वैत थांबेल. ह्यालाच साम्यावस्था असे म्हणतात. अशी निर्माण झालेली साम्यावस्था आत्मानात्मविवेकाने सतत जागी ठेवणे हा योग साधणे ह्याला तप म्हणतात. त्यांत जेंव्हा पूर्णत्वाचा अनुभव येतो तेंव्हा ब्रह्म हे सर्वव्यापी, अव्यय, अक्षय, निर्गुण, अखंड असल्याचे समजते. मग द्वैताला वाव नाही म्हणून अद्वैत. तो जन्म मृत्यू नसलेला म्हणून अजन्मा. विबुध हो ! शब्दांना मर्यादा आहेत. आपण जे बोलतो ते बोलणेच माया आहे. मायाच नसेल तर बोलणे कसें होणार? म्हणून नि:शब्दाचे मूळ शोधावे. अर्थ तर शब्दांपूर्वीच आहे. तसाच प्रकार परब्रह्म जाणण्याचा आहे. " आचार्य बोलायचे थांबले. सर्व सभा एकाग्रतेने श्रवण करीत होती. सर्वज्ञपिठाच्या बाहेर दक्षिणदरवाजाच्या समोरच ही सभा आयोजित केली होती. सर्वज्ञपिठाच्या पंडित समितीच्या अध्वर्युंनी उभे राहून आचार्यांना वंदन केले. आतां मात्र सभेचे चित्र बदलले. दक्षिणदरवाजाच्या समोर

बसलेले सर्व विद्वान, शास्त्री, वैदिक पंडित, याज्ञिक इत्यादी सर्व ज्येष्ठ-श्रेष्ठ मंडळी उभे रहून  एका विलक्षण शिस्तीने दुतर्फा झाले.

सर्वज्ञपिठाच्या पंडितसमितीच्या अध्वर्युंनी काही संकेत केला आणि घंटानाद सुरु झाला. तुतारींच्या नादाने वातावरण भरून गेले. दक्षिणदरवाजा हळूहळू उघडला गेला. समितीतल्या पंडितांनी आचार्यांना त्या दरवाजातून आत नेले व सर्वज्ञपिठावर आरूढ होण्याची विनंती केली. आचार्यांनी त्या पिठाला प्रथम वंदन केले. अत्यंत विनयाने सर्व सभेला वंदन केले. आचार्यांवर पुष्पवर्षाव होऊ लागला त्या वर्षावात आचार्य सर्वज्ञपिठावर आरूढ झाले. सर्वज्ञपीठाचे आता चारही दरवाजे उघडले गेले. आचार्यांची शास्त्रशुद्ध पाद्यपूजा झाली. त्यासभेत अनेक बौद्ध व जैन पंथी आलेले होते. त्या सर्व बौद्ध व जैन पंथीयआचार्यांनी शंकराचार्यांना मनोमन मान्यता दिली पण सभा सोडून चालते झाले. त्यांना हे सत्य पचवणे अवघड झाले. सनातनधर्माचा पाया भक्कम झाला. घरोघर आचार्यांनी रचलेली स्तोत्रे उपासनेसाठी म्हटली जाऊ लागली. आचार्यांची विजयपताका गगनचुंबी झाली.

प्रकरण २२ वे

# द्वारका-गमन व पहिल्या धर्मपिठाची स्थापना

आचार्यांच्या प्रवचनाची कीर्ती सर्व दिशांना पसरत होती. त्यांत द्वारका नरेश सुधन्वा अपवाद नव्हता. राजा सुधन्व्याला आचार्यांना भेटण्याची, त्यांच्या दर्शनाची तीव्र ओढ लागली. आचार्यांनी आपल्या राज्यांत यावे म्हणून सुधन्व्याने आपल्या दरबारातल्या मान्यवर व मातब्बरांना आचार्यांना द्वारकेत आणण्यासाठी रवाना केले. आचार्य दक्षिणेकडून पुनश्च जेंव्हा महिष्मतीत आले होते त्यावेळीच द्वारकेचा राजा सुधन्वा आपल्या दर्शनास उत्सुक असल्याचे व त्यासाठी त्याचे दूत इथें येऊन गेल्याचे सुरेश्वराचार्यांनी आचार्यंना विदित केले होते. परंतु शारदामातेची इच्छा आचार्यांनी सर्वज्ञपिठावर आरोहण करावे अशीच होती. तिनें आचार्यांकडे तशी वाणीने प्रदर्शित केली होती आणि योग्य काळ पाहूनच अदृश्य झाली होती. त्यामुळें आचार्य प्रथम श्रीनगरमध्ये आले. त्यांच्याही मनांत द्वारकेला जाऊन भगवान् श्रीकृष्णांचे दर्शन घेण्याची इच्छा होतीच. त्यामुळें सुधन्व्याचे मानकरी आचार्यांना घेऊन जाण्यासाठी श्रीनगरला आले तेंव्हां आचार्य पद्मपाद, चित्सुख, सुरेश्वराचार्य इत्यादिना बरोबर घेऊन लगेच द्वारकेकडे निघाले.

राजा सुधन्वा कुमारीलभट्टपादांच्या विद्वत्तेमुळे व त्यांनी केलेल्या जैनयतींच्या पराभवामुळे सनातन वैदिकधर्म हाच एकमेव जगन्मान्य धर्म असल्याचे आपल्या प्रजेला सांगत होता व आपणही त्याचे आचरण करीत होता. त्यातही जेंव्हा कुमारीलभट्टपादांचा नावाजलेला शिष्य मंडन हा आचार्यांना शरण गेल्याचे वृत्त समजल्यावर राजा सुधन्व्याची आचार्य दर्शनाची उत्सुकता शिगेला पोहोचली. राजा सुधनव्याला हे ठाऊक होते कीं मंडन हा अत्यंत तेजस्वी व कर्मनिष्ठ असून प्रचंड मोठी वेदपाठशाला चालवत आहे. त्याच्यामुळे महिष्मतीचे नाव सर्वतोमुखी झाले आहे. इतका विद्वान व ज्ञानी ब्राह्मण सतरा अठरा वर्षाच्या संन्याशाला आपला संन्यासगुरु मानतो व त्याच्या समवेत राहतो म्हणजे आचार्य हे साक्षात् शंकरच असले पाहिजेत.

आपल्या राजधानीत एवढा मोठा सत्पुरुष येणार, त्यातून सर्वज्ञपिठावर आरूढ होण्याचा व दक्षिण-दरवाजा उघडण्याचा त्यांचा दिग्विजय लक्षात घेऊन राजाने आपल्या राजधानीचे स्वरूपच बदलून टाकले. आचार्यांच्या स्वागतासाठी त्याने नगराच्या प्रवेशद्वारी भव्य कमान उभारली. आचार्यांच्या स्वागताचा मजकूर त्यावर सुवर्णाक्षरांत लिहून घेतला. रस्ते विविध प्रकारे सजवले. जणू भगवान् श्रीकृष्णच द्वारका प्रवेश करणार आहेत असे वातावरण निर्माण केले. सर्व रस्ते स्वच्छ, बाजारपेठा, चौक, मंदिरांचा परिसर, सरोवरांचा परिसर इत्यादी सर्व सुशोभित करण्यात आले. अनेक ब्रह्मवृन्दांना काही विविक्षित ठिकाणी मंत्रघोष करण्याची विनंती केली. घराघरांवर सुरेख तोरणे बांधली गेली. सर्व मंदिरंचे कळस झळफळीत करण्यात आले. मंदिरांतल्या छोट्यामोठ्या घंटांपासून तो पूजेच्या सर्व उपकरणांना झळफळीत करण्यात आले. मंदिरांमध्ये वीणा, भेरी, मृदुंग, झालरी इत्यादी वाद्यांची सिद्धता केली. द्वारका एखाद्या नवायुवतीसारखी शृंगार करून आचार्यांच्या स्वागतास सिद्ध झाली. आचार्य द्वारके-जवळ हांकेच्या अंतरावर आले आणि प्रवेशद्वारावर नगरे झडू लागले. विविध शंख फुंकले गेले. शंखांचा आवाज विरतो न विरतो तोंच भेरींचा नाद उमटला. वातावरण हर्षोत्फुल झाले.

आचार्य आपल्या शिष्यांसह प्रवेशद्वारी आले. राजा स्वागतास सिद्धच होता. अनेक नटूनथाटून आलेल्या सुवासिनी पंचारत्यांची ताटे घेऊन सज्ज होत्या. आचार्यांच्या मार्गावर फुलांच्या पायघड्या तयार केल्या होत्या. वातावरणांत जाई-जुई-मोगरा-चाफा इत्यादी फुलांचा सुगंध दरवळला होता.

आचार्यांच्या चरणावर राजाने मस्तक टेकले. त्यांची पाद्यपूजा केली. त्यांच्या बरोबर असलेल्या पद्मपाद, चित्सुख, सुरेश्वाराचार्य इत्यादींची पूजा केली. आचार्यांच्या जयघोषात आचार्यांना भगवान् श्रीकृष्णांच्या मंदिरांत आणले. आचार्यांच्या निवासाची व्यवस्था राजाने मंदिराच्या परिसरातल्या टुमदार व हवेशीर गृहांत केली होती. भगवान् श्रीकृष्णांच्या दर्शनाने भारावलेल्या आचार्यांनी भगवान् श्रीकृष्णांची प्रार्थना आरंभिली.

अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम् ।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचन्द्रं भजे ॥१ ॥
अच्युतं केशवं सत्यभामाधवं माधवं श्रीधरं राधिकाराधितम् ।
इन्दिरामन्दिरं चेतसा सुन्दरम् देवकीनन्दनं नन्दजं सन्दधे ॥२ ॥
विष्णवे जिष्णवे शंखिने चक्रिने रुक्मणीरागिणे जानकी जानये ।
वल्लवीवल्लभायार्चितायात्मने कंसविध्वंसिने वंशिने ते नमः॥३ ॥
कृष्ण गोविन्द हे राम नारायण श्रीपते वासुदेवाजित श्रीनिधे ।
अच्युतानन्त हे माधवाधोक्षज द्वारकानायक द्रौपदीरक्षक ॥४ ॥
राक्षसक्षोभितः सीतया शोभितो दण्डकारण्यभूपुण्यताकारणः ।
लक्ष्मणेनान्वितो वानरैः सेवितोऽगस्त्यसम्पूजितो राघवः पातु माम् ॥५ ॥
धेनुकारिष्टहानिष्टकृद्द्वेषिणां केशिहा कंसहृद्वंशिकावादकः ।
पूतनाकोपकः सूरजाखेलनो बालगोपालकः पातु मां सर्वदा ॥६ ॥
विद्युदुद्योत - वत्प्रस्फुर - द्वाससं प्रावृडम्भोदवत्प्रोल्लसद्विग्रहम् ।
वन्यया मालया शोभितोरःस्थलं लोहितांघ्रिद्वयं वारिजाक्षं भजे ॥७ ॥
कुन्चितैः कुन्तलैभ्राजमानाननं रत्नमौलिं लसत्कुण्डलं गण्डयोः ।
हारकेयूरकं कंकणप्रोज्जवलं किंकिणीमंजुलं श्यामलं तं भजे ॥८ ॥
अच्युतस्याष्टकं यः पठेदिष्टदं प्रेमतः प्रत्यहं पुरुषः सस्पृहम् ।
वृत्ततः सुन्दरं कर्तृविश्वम्भरस्तस्य वश्यो हरिर्जायते सत्वरम् ॥९ ॥

- अच्युत, केशव, राम, नारायण, दामोदर, वासुदेव, हरी, श्रीधर, माधव, गोपिकावल्लभ आणि जानकीनायक रामचंद्र आदि सर्वकाही असलेल्या श्रीकृष्णाला मी वंदन करतो. ||१||

- अच्युत, केशव, सत्यभामेचा पती, लक्ष्मीपती, राधेचे आराध्यदैवत, लक्ष्मीचे निवास्थान, परम सुंदर, देवकीनंदन व नंदाघरी वाढलेल्या श्रीकृष्णाला मी वंदन करतो ||२||

● सर्वावापी विष्णु, अजिंक्य व शंख-चक्र धारण करणारा रुक्मिणीचा प्रियकर, सीतापती, गोपींचा प्राणवल्लभ, गोपींचे पूजनीय दैवत, सर्वात्मा, कंसाला ठार मारणारा, हातांत मुरली धारण करणारा, अशा कशाही प्रकारे अढळ असणाऱ्या श्रीकृष्णाला माझा नमस्कार असो ||३||

● हे श्रीकृष्णा, गोविंदा, रामा, नारायणा, श्रीपती, वासुदेवा तूं अजिंक्य आहेस. तूं लक्ष्मीचा पती आहेस. तूं अच्युत म्हणजे आढळ आहेस. अनंत म्हणजे अंत रहित आहेस. हे माधवा तूं अर्धोन्मीलित नेत्रांनी स्वरूपात रममाण झालेला असूनही द्वारकाधीश आहेस. तूं द्रौपदीचा रक्षण कर्ता आहेस ||४||

● राक्षसांवर क्षोभणारा आहेस. वामांगी असलेल्या सितेमुळे शोभून दिसणारही तूंच आहेस. राक्षसांचा वध करून दंडकारण्य पावन करणारा तूंच आहेस. लक्ष्मण सदैव तुअझ्या बरोबर असणारा, युद्धांत वानरांची मदत घेणारा व अगस्तीमुनिंनाही वंदनीय असा रघुवंशात श्रीरामाचा अवतार धारण करणाऱ्या प्रभो मजवर प्रसन्न व्हा ||५||

● कंसाने पाठवलेल्या धेनुक व अरिष्ट ह्या राक्षसांचा हे अच्युता तूंच वध केलास. तुझा पराकोटीचा द्वेष करणाऱ्या केशी व कंस यांना लीलया मारणार तूंच आहेस. आपल्या मुरलीची तूं सर्वांनाच मोहिनी घालतोस. पुतनेला धडा शिकवणाराही तूंच आणि वृंदावनात रास खेळणाराही तूंच आहेस. अशा हे बालगोपालांना सांभाळणाऱ्या श्रीकृष्णा मजवर प्रसन्न हो ||६||

● आपल्या घननीळ तेजस्वी शरीरावर लखलखत्या विजेसारखा पितांबर धारण केलेला आहे, गळयांतली वनफुलांची माला छातीवर रुळत आहे, तुझे कमलनेत्र उष:कालच्या तेजस्वी लाली सारखे दिसत आहेत असे ध्यान हे श्रीकृष्णा मी अंतर्यामी धारण करतो ||७||

● कुरळया केसांनी मोहक दिसणारा तुझा चेहरा, गालावर कानांतल्या कुंडलांची चमकणारी प्रभा, गळयातल्या मौक्तिक माला, मनगटातली तेजस्वी

सुवर्ण कंकणे, पायांतल्या रुणुझुणु करणाऱ्या वाळयांसह हे श्रीकृष्णा मी तुझे ध्यान करतो ||८||

- अपेक्षित फल देणारे हे अच्युताष्टक प्रेम, आस्था व श्रद्धापूर्वक जो नित्य म्हणेल त्याला हे गेय अष्टक ज्ञानप्राप्तीसह ईश्वराची प्रसन्नता प्राप्त करून देईल ||९||

भगवान् श्रीकृष्णांची ही प्रार्थना राजा सुधन्वा एकाग्र चित्ताने श्रवण करीत होता. त्याच्या अंत:चक्षुंसमोर भगवान् श्रीकृष्णांचे चरित्र तरळून गेले. जागृती की सुषुप्ती असाच संभ्रम राजाला उत्पन्न झाला. आचार्यांच्या प्रभावी वाणीचा त्याला प्रत्यय आला. आचार्यां बरोबर आलेल्या सर्व शिष्यपरिवाराच्या निवासाची व्यवस्था भगवान् श्रीकृष्णांच्या मंदिरा भोवती असलेल्या विस्तीर्ण परिसरात करण्यात आली. सुरेश्वराचार्य, पद्मपादाचार्य, चित्सुखाचार्य व हस्तामलक हे आचार्यांच्या समवेत त्यांच्या निवासस्थानी राहात होते. राजा सुधन्व्याने सुरेश्वराचार्यांना कुमारीलभट्टपादांचे शिष्य व मेव्हणा म्हणून राजप्रासादांत राहण्याची विनंती केली. पण सुरेश्वराचार्य इतके विरक्त झाले होते कीं राजाच्या आग्रहाचा अथवा राजवैभवाच्या उपभोगाचा त्यांच्या अंत:करणात दुरान्वयानेही प्रवेश झाला नाही.

राजा रोज आचार्यांच्या प्रवचनांना आपल्या मंत्र्यांना बरोबर घेऊन येऊ लागला. प्रवचनात त्याच्या अनेक शंकांचे निरसन झाले. एक दिवस त्याने आचार्यांना राजप्रासादात येण्याचा आग्रह केला. आचार्यांनी त्याला मान्यता दिली. राजाने त्यांच्या स्वागताची सिद्धता केली. आचार्य दरबारांत आले. राजाने त्यांना उच्चासनावर बसवले. अत्यंत विनयाने त्यांचे पूजन केले आणि आपल्यावर अनुग्रह करण्याची प्रार्थना केली. आचार्यांनी त्याला मंत्रोपदेश दिला. त्यानंतर राजाने आचार्यांना द्वार्केतच वास्तव्यास राहावे म्हणून प्रार्थना केली. त्यावेळी आचार्यांनी आपल्या कार्याच्या व्याप्तीमुळे तसे करता येणार नसल्याचे सांगितले. तथापि राजाचा भाव व भक्ती पाहून द्वारकेत “मठ” स्थापनेची संकल्पना सांगितली. राजाने तत्क्षणी होकार दिला. आचार्यांच्या सूचनांवर हुकुम द्वारकेत पहिला “मठ” स्थापन झाला. आचार्यांनी

“सुधन्वा व मंडन” यांचे पूर्वीचे संबंध लक्षांत घेऊन त्या मठाचे अधिपती म्हणून सुरेश्वराचार्यांची नेमणूक केली. आपल्या द्वारकेत आचार्यांनी ‘धर्मपीठ’ स्थापन केल्यामुळें राजाला अत्यंत आनंद झाला. आचार्यांनी सुरेश्वराचार्यांना धर्मपिठाचा नियम सांगितला,

शुचिर्जीतेन्द्रियो वेदवेदाङ्गादिविशारदः |
योगज्ञः सर्वतंत्राणां स आस्मत्स्थानमाप्नुयात् ||

याप्रमाणेंच सुरेश्वराचार्यांची योग्यता असल्याचे ध्वनित केले. धर्मपिठांत वास्तव्य करणाऱ्यांसाठी साधन पंचकाची नियमावली सांगितली.

वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्ठीयतां
तेनेशस्य विधीयतामपचितिः काम्ये मतिस्त्यज्यताम् ।
पापौघः परिधूयतां भवसुखे दोषोऽनुसन्धीयता-
मात्मेच्छा व्यवसीयतां निजगृहात्तूर्णं विनिर्गम्यताम् ॥ १॥

सङ्गः सत्सु विधीयतां भगवतो भक्तिर्दृढाऽऽधीयतां
शान्त्यादिः परिचीयतां दृढतरं कर्माशु सन्त्यज्यताम् ।
सद्विद्वानुपसृप्यतां प्रतिदिनं तत्पादुका सेव्यतां
ब्रह्मैकाक्षरमर्थ्यतां श्रुतिशिरोवाक्यं समाकर्ण्यताम् ॥ २॥

वाक्यार्थश्च विचार्यतां श्रुतिशिरःपक्षः समाश्रीयतां
दुस्तर्कात्सुविरम्यतां श्रुतिमतस्तर्कोऽनुसन्धीयताम् ।
ब्रह्मास्मीति विभाव्यतामहरहर्गर्वः परित्यज्यतां
देहेऽहम्मतिरुज्झ्यतां बुधजनैर्वादः परित्यज्यताम् ॥ ३॥

क्षुद्व्याधिश्च चिकित्स्यतां प्रतिदिनं भिक्षौषधं भुज्यतां
स्वाद्वन्नं न तु याच्यतां विधिवशात् प्राप्तेन सन्तुष्यताम् ।

शीतोष्णादि विषह्यतां न तु वृथा वाक्यं समुच्चार्यता-
मौदासीन्यमभीप्स्यतां जनकृपानैष्ठुर्यमुत्सृज्यताम् ॥ ४ ॥

एकान्ते सुखमास्यतां परतरे चेतः समाधीयतां
पूर्णात्मा सुसमीक्ष्यतां जगदिदं तद्बाधितं दृश्यताम् ।
प्राक्कर्म प्रविलाप्यतां चितिबलान्नाप्युत्तरैः श्लिष्यतां
प्रारब्धं त्विह भुज्यतामथ परब्रह्मात्मना स्थीयताम् ॥ ५॥

॥ इति परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमच्छङ्कराचार्यविरचित
साधन पञ्चकं ॥

● आचार्य म्हणाले, “वेदग्रंथांचा सखोल अभ्यास करा. त्यातील सत्कर्माचे उत्तम आचरण करा. आपली विहित कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करण्यानेच ईश पूजा साधते. काम्यबुद्धीने कर्म करू नका. पापाचरण करू नका. संसारसुख हे सदोष आहे म्हणून घर संसारांत आसक्त होऊ नका तर आत्मतत्त्व जाणून घेण्याचा मनापासून प्रयत्न करा ||१||

● सत्संग करा. ईशभक्ती दृढनिश्चयाने करा. मनाला शांत ठेवा. दृढनिश्चयाने तामसकर्म त्यागा. संत व विद्वान यांच्या सहवासांत राहा. त्याची चरणसेवा करा. त्यांच्या कडून ज्ञान कसे प्राप्त करून घ्यावे हे शिकून मग उपनिषदातील महावाक्यांच्या अर्थाचे आकलन होण्यासाठी श्रवण व मनन करा ||२||

● श्रवण व मनन करताना महावाक्यांचा अर्थ जाणून घेताना उपनिषदांच्या आधारेच जा. कुतर्क करू नका. वेदमान्य तर्काचाच आधार घ्या व विचार करा. “मी ब्रह्म आहे” अशी दृढ भावना करा. त्यासाठीच अहंकाराचा त्याग करा. देह म्हणजेच ‘मी’ अशी दृढबुद्धी रुजलेली असते ती त्यागा. आत्मज्ञानी लोकांशी वितंडवाद करू नका ||३||

● भूक असेल तरच खा. आपल्याला असलेल्या व्याधींची कारणे शोधून आहारांत योग्य तो बदल करा. प्रतिदिनी शरीर धारणेला आवश्यक इतकेच भिक्षान्न औषध म्हणून सेवन करा. चमचमीत व मिष्टांन्नाची याचना करू नका. विधीवशात् प्राप्त झालेल्या भिक्षान्नावर संतोष माना. उकाडा-थंडी सहन करण्याची तयारी करा. अतत्त्वार्थ संभाषण करू नका. त्याबाबत औदासिन्य धारण करा. स्वत:च्या सौख्यासाठी लीकांशी गोड बोलू नका व कोणाशी कठोर होऊ नका ||४||

एकांतात बसून सुखाने प्रब्रह्मात मन स्थिर करण्याचा सराव करावा. संपूर्ण विश्व हे अखंड ब्रह्म आहे हे सतत ध्यानांत ठेवावे. सर्व दृष्यमय जग हे अंतिम सत्य नाही. पूर्णब्रह्म हे अंतिम सत्य असल्याची धारणा करावी. ज्ञानाग्नीने पूर्वकर्माचा नाश करावा व नवीन कर्मबंध निर्माण होणार नाही असे वागावे. परब्रह्मांत मन स्थिर करून प्रारब्धभोग भोगावा. म्हणजे आनंद प्राप्त होईल ||५||

असे साधनपंचक आचार्यांनी सांगितले. धर्मपीठ कार्यान्वित झाले. राजाला मनापसून आनंद झाला. साधारण एक महिना द्वाकेत वास्तव्य करून आचार्य द्वारकेतून निघाले. आचार्यांनी आपल्या शिष्य परीवारांतल्या बऱ्याच शिष्यांना सुरेश्वराचार्यांच्या सेवेत द्वारकेच्या धर्मपिठांत राहण्याचा आदेश दिला. आपण निवडक शिष्यांसह सोरटीसोमनाथाच्या दर्शनास निघाले.



प्रकरण २३ वे

# प्रभास व उज्जैनीस भेट

सोरटीसोमनाथाचे दर्शन घेऊन आचार्य प्रभासक्षेत्री आले. भगवान् श्रीकृष्णांच्या निर्याण स्थानी त्यांनी साष्टांग दंडवत घातले. ते अत्यंत भावविभोर झाले. जणू त्यांच्या दिव्यचक्षुंसमोर अश्वत्थाखाली सुखासनांत थोडे रेलून बसलेले तेजस्वी सावळया रंगाचे भगवान् श्रीकृष्ण दिसू लागले. हंसावरून आलेले ब्रह्मदेव, मृडानीसह आलेले भगवान् शिव, अर्यमादि पितर, इंद्रादि देव, वासुकी, महोरग, दत्तात्रेय, सिद्ध , गंधर्व, अप्सरा, चारण, यक्ष इत्यादींच्या विमानांची दाटी झालेली दिसली. त्यांच्या विमानातून भगवान् श्रीकृष्णांवर होणारा दिव्यपुष्पवर्षाव दिसला. अप्सरांचे नृत्य व भगवत्स्तुतीचे गंधर्वगायन ऐकू आले. ब्रह्मदेवासह भगवान् शिव आश्चर्यचकित झाले. कारण भगवान् श्रीकृष्णांचे शरीर पंचमहाभूतांचे नव्हतेच. आचार्यांच्या भावनांचा कल्लोळ शब्दरूप धारण करून मुखावाटे बाहेर पडला,

सत्यं ज्ञानमनन्तं नित्यमनाकाशं परमाकाशम् ।
गोष्ठप्राङ्गणरिङ्खणलोलमनायासं परमायासम् ।
मायाकल्पितनानाकारमनाकारं भुवनाकारम् ।
क्ष्माया नाथमनाथं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ १॥
मृत्स्नामत्सीहेति यशोदाताडनशैशव सन्त्रासम् ।
व्यदितवक्त्रालोकितलोकालोकचतुर्दशलोकालिम् ।
लोकत्रयपुरमूलस्तम्भं लोकालोकमनालोकम् ।
लोकेशं परमेशं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ २॥
त्रैविष्टपरिपुवीरघ्नं क्षितिभारघ्नं भवरोगघ्नम् ।
कैवल्यं नवनीताहारमनाहारं भुवनाहारम् ।
वैमल्यस्फुटचेतोवृत्तिविशेषाभासमनाभासम् ।
शैवं केवलशान्तं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ३॥

गोपालं प्रभुलीलाविग्रहगोपालं कुलगोपालम् ।
गोपीखेलनगोवर्धनधृतिलीलालालितगोपालम् ।
गोभिर्निगदित गोविन्दस्फुतनामानं बहुनामानम् ।
गोपीगोचरपथिकं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ४॥
गोपीमण्डलगोष्ठिभेदं भेदावस्थमभेदाभम् ।
शश्वद्गोखुरनिर्धूतोद्धतधूलीधूसरसौभाग्यम् ।
श्रद्धाभक्तिगृहीतानन्दमचिन्त्यं चिन्तितसद्भावम् ।
चिन्तामणिमहिमानं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ५॥
स्नानव्याकुलयोशिद्वस्त्रमुपादायागमुपारूढम् ।
व्यदित्सन्तिरथ दिग्वस्त्रा ह्युपुदातुमुपाकर्षन्तम् ।
निर्धूतद्वयशोकविमोहं बुद्धं बुद्धेरन्तस्थम् ।
सत्तामात्रशरीरं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ६॥
कान्तं कारणकारणमादिमनादिं कालमनाभासम् ।
कालिन्दीगतकालियशिरसि मुहुर्नृत्यन्तं नृत्यन्तम् ।
कालं कालकलातीतं कलिताशेषं कलिदोषघ्नम् ।
कालत्रयगतिहेतुं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ७॥
वृन्दावनभुवि वृन्दारकगणवृन्दाराध्यं वन्देऽहम् ।
कुन्दाभामलमन्दस्मेरसुधानन्दं सुहृदानन्दम् ।
वन्द्याशेषमहामुनिमानसवन्द्यानन्दपदद्वन्द्वम् ।
वन्द्याशेषगुणाब्धिं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ८॥
गोविन्दाष्टकमेतदधीते गोविन्दार्पितचेता यो ।
गोविन्दाच्युत माधव विष्णो गोकुलनायक कृष्णेति ।
गोविन्दाङ्घ्रिसरोजध्यानसुधाजलधौतसमस्ताघो ।
गोविन्दं परमानन्दामृतमन्तःस्थं स तमभ्येति ॥९ ॥

सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप, अनंत, नित्य, अकाशाच्याही पर, तरीही गोकुळाच्या अंगणांत अत्यंत चपळतेने रंगणारा, अनन्य भक्तांना विनासायास प्राप्त होणारा सतत उत्साही असणारा, तत्त्वत: जडशरीर नसलेला पण तरीही स्वमायेने अनंत आकार धारण करणारा असा हा अनाथ आहे. अशा ह्या परमानंद स्वरूप गोविंदाला प्रणाम करूया ॥१॥

"अरे, तूं माती खातोस काय?" म्हणून रागावलेली यशोदामाता आतां आपल्याला मारणार ह्या भयाने घाबरून "आई, मी माती नाही ग खाल्ली!" असे म्हणून झाडा देण्यासाठी "आऽऽ" करून आपल्या मुखांत यशोदेला लोकालोक पर्वतासह चवदाभुवनांचे दर्शन घडवणारा, त्रैलोक्याचा आधारस्तंभ, ज्याला कोणीही प्रकाशित करू शकत नाही पण जो सर्वांना प्रकाशित करतो त्या सर्वाधिपतीला, परमानंदस्वरूप गोविंदाला प्रणाम करू या ॥२॥

दैत्यांचा नाश करणाऱ्या, पृथ्वीचा भार हलका करणाऱ्या, भवरोगाचा नाश करणाऱ्या, मोक्ष देणाऱ्या, तत्त्वत: काहीही खायला न लागणाऱ्या पण तरीही गोपींकडचे लोणी खाणाऱ्या व प्रलयकाळी सर्व विश्व भक्षण करणाऱ्या, सत्वगुणोत्कर्ष झालेल्यांच्या चित्तांत प्रतिबिंबित होणाऱ्या निर्मल, परमशांत, काल्याणरूप, परमानंदरूप अशा गोविंदाला प्रणाम करूया ॥३॥

गाईंचे पालन करणारा व भूतलावर क्रीडा करण्यासाठी गोपालशरीर धारक अशा गोपालवंशात बागडणारा, गोपिंबरोबर क्रीडा करणारा, गोवर्धन पर्वत करांगुलीवर धारण करणारा, गोपी जनांचे लालन-पालन इत्यादी लीला करणारा, वेदांनी किंवा गायींनीसुद्धा ज्याचा 'गोविंद-गोविंद' अशा नामाने स्पष्ट उल्लेख केला आहे असा, ज्याला अनंत नामे आहेत असा, जो वाणी व बुद्धी यांच्या पर आहे अशा परमानंदस्वरूप गोविंदाला प्रणाम करू या ॥४॥

गोपीमंडळांत ज्याच्या विषयी गोष्टी चालतात तो अभेद असूनही भेदावस्था धारण करणारा आहे. गाईच्या खुरांनी उडालेल्या धुळीनें धूसर होण्यात धन्यता मानणारा, फक्त श्रद्धा व भक्तीने ज्याचा आनंद प्राप्त होऊ शकतो अशा चिंतनाच्या

पलीकडचा असूनही ज्याचे सद्भावे चिंतन केले जाते, जो भक्त कामना पूर्ण करणारा चिंतामणी आहे अशा परमानंदस्वरूप गोविंदाला प्रणाम करुया ||५||

स्नानात व्यग्र असलेल्या गोपींची वस्त्रे पळवून यामुनाकांठी असलेल्या कदंबवृक्षावर बसून, वस्त्रे मिळवण्यास उत्सुक झालेल्या गोपींना जलाशयातून विवस्त्र बाहेर यावयाला लावणारा, स्मरणमात्रे शोक व मोह दूर करणारा, ज्ञानस्वरूप व बुद्धीच्या आत व बाहेर (म्हणजे बुद्धीच्या पलीकडे) असणारा, स्वसत्तारूप शरीर धारण करणारा, अशा ह्या परमानंदस्वरूप गोविंदाला प्रणाम करूया ||६||

अत्यंत सुंदर, विश्वोत्पत्तीच्या कारणाचेही कारण, नीलमेघासम तेजस्वी कांती असलेल्या, यमुनेच्या डोहांतल्या कालियाच्या मस्तकावर नृत्य करणारा व नृत्य करताना अत्यंत सुंदर दिसणाऱ्या, कालस्वरूप असूनही कली-काळाच्या पलीकडे असणारा, सर्वज्ञ व केवळ स्मरणाने दोष नाहीसे करणारा, कालचक्राच्या गतीचे कारण असणाऱ्या अशा परमानंदस्वरूपी गोविंदाला प्रणाम करुया ||७||

वृंदावनाच्या परिसरांत देवगण व वृंदा ह्यांनी आराधना केलेल्या हे श्रीकृष्णा माझे तुला वंदन आहे. कुंदफुलांच्या कांतीसम निर्मल व अमृतमय आनंद भरलेल्या स्मितमुखी व मित्रांना आनंद देणाऱ्या, सर्व शुभ गुणांचे आगर असणाऱ्या तुझे चरणयुगुल वंदनीय मुनींच्या हृदयांत वंदिले जातात अशा परमानंदस्वरूपी गोविंदाला प्रणाम करुया ||८||

सर्वगुणसंपन्न गोविंदाच्या वर्णनाचे हे “गोविंदाष्टक” जो कोणी मनापासून पाठ करील, गोविंदा, अच्युता, माधवा, विष्णो, गोकुळनायका श्रीकृष्णा असे म्हणत राहतील त्याची सर्व पापे गोविंदाच्या चरणकमलाच्या ध्यानाने धुवून निघतील आणि तो स्वान्त:करणांत विराजमान असलेल्या सर्वश्रेष्ठ आनंदरूप अमृतमय गोविंदाला प्राप्त करून घेईल ||९||

आचार्यांनी केलेली ही भावपूर्ण प्रार्थना ऐकत असताना पद्मपाद, हस्तामलक, चित्सुख हे सर्व त्या प्रार्थनेशी इतके तल्लीन झाले कीं त्यांना बाह्य जगाचे, काळाचे,

स्थानाचे भानच उरले नाही. आपण श्रीकृष्णांबरोबर असून प्रत्यक्ष त्यांच्या क्रीडा पहात आहोत असेच त्यांना वाटले. आचार्यांच्या वाग्देवतेचा प्रसादच त्यांना प्राप्त झाला.

आचार्य तेथून उज्जैनीला महाकालेश्वराच्या दर्शनास आले. प. पू. गोविंदयतींचा पुत्र राजा श्रीहर्ष त्यांच्या स्वागतास आला. उज्जैनीच्या राजाने त्यांचे यथोचित स्वागत केले. महाकालेश्वराच्या दर्शन व पूजना नंतर राजासह आचार्य ओंकार मांधाता येथें आपल्या गुरुंच्या समाधीच्या दर्शनास आले. राजा श्रीहर्षनें आपल्या अलौकिक पित्याची म्हणजेच गोविंदयतींची समाधी अत्यंत सुंदर बांधून घेतली होती. आश्रमाची व्यवस्था अत्यंत चोख व सुंदर होती. त्या सर्व व्यवस्थेवर आचार्य प्रसन्न झाले. त्यामुळें राजाही सुखावला. आचार्य श्रीगुरु गोविंदयतींच्या समाधी जवळ आले व अत्यंत भावपूर्ण वंदन केले. मस्तक समाधीच्या पायाशी टेकले आणि भाव शब्दावाटे बाहेर आला.

नमस्तस्मै सदैकस्मै कस्मैचिद् महसे नम: |
यदेतद् विश्वरूपेण राजते गुरुराज ते ||

“सदैव सर्वज्ञ पण तरीही अज्ञात अशा सत् स्वरूपी परमतेजाला माझा नमस्कार असो. तुझे हे तेज संपूर्ण विश्वाच्या स्वरूपात मला शोभायमान दिसत आहे. ” आचार्य ओंकार मांधाताला असताना त्यांचा शोध करीत नेपाळनरेशाचे दूत तेथें आले. त्यांनी नेपाळनरेशाने दिलेले नेपाळ भेटीचे आमंत्रण आचार्यांच्या चरणी विनम्रतेने सादर केले. आचार्यांनी ते स्वीकारले. आचार्य राजाश्रीहर्षचा निरोप घेऊन निघाले.

प्रकरण २४ वे

# भगवान शिवाचे दर्शन व सौंदर्य लहरींची प्राप्ती

नेपाळला जाताना बद्रीकाश्रमांतल्या मंदिराच्या प्रगतीवर देखरेख करण्यासाठी पद्मपादाचार्यांना पाठवले. इतर अनेक शिष्यांना वैदिक सनातन धर्म समजावून सांगण्यासाठी विविधस्थानी जाण्याचा आदेश दिला. चित्सुखाचार्य, हस्तामलक व इतर अशाच निवडक शिष्यांना समवेत घेऊन आचार्य नेपाळला पशुपतीच्या दर्शनास आले. पशुपतीनाथाचे अतिभव्य मंदिर आचार्यांच्या आगमनामुळे गजबजून गेले. नेपाल नरेश वृषभदेव वर्म्याने वीणा, भेरी, मृदुंग इत्यादी वाद्यांच्या गजरांत आचार्यांच्या स्वागताची जय्यत तयारी केली होती. निवडून ठेवलेल्या बिल्वपत्रांचे सुवर्णपात्र, पांढऱ्यास्वच्छ उमललेल्या फुलांचे मोठे तबक, सुवर्ण कलश, पंचारती, केशर-कस्तुरी युक्त चंदनाचे गंध, घसघशीत कलात्मक हार इत्यादी पूजनाची अपूर्व व्यवस्था केली होती. त्या दिवशीची पूजा बघणाऱ्यांचे भाग्यच अपूर्व म्हणावे लागेल. साक्षात् "सच्चिदानंद रूप : शिवोऽहं शिवोऽहं" असे म्हणणाऱ्या आचार्यांनी स्वात्मधारण केलेल्या "आत्मा त्वं गिरीजा मति:" असलेल्या शिवानेच शिवाचे म्हणजेच पशुपतीचे पूजन केले. डोळयांचे पारणे फिटावे असे पूजन झाले. आचार्य जणू पशुपतीशी एकरूपच झाले होते.

आचार्यांची प्रवचने, धर्म विवरण, धर्माची नि:संदिग्ध व्याख्या व अद्वैत प्रतिपादन करण्याची हातोटी ह्या सर्व गोष्टींचा नेपाळ नरेशासह सर्व प्रजेवर इतका प्रभाव पडला व बौद्धमतवादी पंथ असा काही निष्प्रभ झाला कीं त्या पंथाला संपूर्ण नेपाळमध्यें स्थानच उरले नाही. राजा वृषभदेव वर्म्यानें आचार्यांचे आशीर्वाद घेऊन जोमानें वैदिक सनातन धर्माची पताका नेपाळच्या सर्व मंदिरांवर उभारली. आचार्यांनी तेथील प्रजेच्या सर्व शंका स्वत:च निरसन केल्या. तथापि त्यांना मार्गदर्शन होत राहावे म्हणून आपल्या अनेक शिष्यांना नेपाळमध्यें राहून कार्य करण्याचा आदेश दिला. त्यांना राजाश्रय मिळाला. आचार्य नेपाळहून निघाले. त्यांना आता पुनश्च कैलासपर्वतावर जाण्याची इच्छा झाली. पूर्वी त्यांना कैलास पर्वताच्या पायथ्याशी भगवान् शिवाचे दर्शन झाले

होते. आतां त्यांना परत शिवदर्शनाची ओढ लागली. चित्सुखाचार्य, हस्तामलक इत्यादी निवडक शिष्य बरोबर घेऊन आचार्य कैलासपर्वताकडे वाटचाल करू लागले. वाटचाल सुरु असताना मार्गात एके ठिकाणी त्यांना दिव्य तेजाने झळकणाऱ्या दत्तप्रभूंचे दर्शन झाले. आचार्य त्यांच्या चरणावर नतमस्तक झाले आणि म्हणाले,

"कदा वा कैलासे कनकमणिसौधे सह गणैः
वसन् शंभोरग्रे स्फुटघटितमूर्धाञ्जलिपुटैः ।
विभो सांब स्वामिन् परमशिव पाहीति निगदन्
विधातृणां कल्पान् क्षणमिति विनेष्यामि सुखदः ॥"

"कैलासावरील सुवर्णखचित मणिभूषित अशा शिवमंदिरांत मस्तकी हात जोडून मी केंव्हा उभा राहीन? हे विभो, हे सांब, हे स्वामी, हे परमशिवा माझे रक्षण करा असे म्हणत ब्रह्मदेवाची अनेक कल्पे क्षणकालासारखी घालवण्याचा सुखकारी काल मला केंव्हा प्राप्त होईल?" मधुर स्वरांतल्या या प्रार्थनेने प्रसन्न झालेल्या भगवान् दत्तगुरूंनी आचार्यांचा उजवा हात धरला व आपल्या योग सामर्थ्याने एका क्षणांत त्यांना भगवान् शिवांच्या समीप कैलासावर आणले. भगवान शिवशंकर आपल्या गणांमध्ये स्वतेजाने तळपत होते. त्यांना पाहाताच आचार्य देहभान हरपून एका दिव्य आनंदांत गेले. त्या आनंदसमाधी अवस्थेतच त्यांनी आपल्या मधुर स्वरांत गायला सुरुवात केली त्याच शतश्लोकी "शिवानंद लहरी"—

- कलाभ्यां चूडालङ्कृतशशिकलाभ्यां निजतपःफलाभ्यां भक्तेषु प्रकटितफलाभ्यां भवतु मे । शिवाभ्यामस्तोकत्रिभुवनशिवाभ्यां हृदि पुनर्भवाभ्यामानन्दस्फुरदनुभवाभ्यां नतिरियम् ॥ १॥
- गलन्ती शम्भो त्वच्चरितसरितः किल्बिषरजो दलन्ती धीकुल्यासरणिषु पतन्ती विजयताम् । दिशन्ती संसारभ्रमणपरितापोपशमनं वसन्ती मच्चेतोहृदभुवि शिवानन्दलहरी ॥ २॥

- स्मृतौ शास्त्रे वैद्ये शकुनकवितागानफणितौ पुराणे मन्त्रे वा स्तुतिनटनहास्येष्वचतुरः । कथं राज्ञां प्रीतिर्भवति मयि कोऽहं पशुपते पशुं मां सर्वज्ञ प्रथित कृपया पालय विभो ॥ ५॥

- गभीरे कासारे विशति विजने घोरविपिने विशाले शैले च भ्रमति कुसुमार्थं जडमतिः । समर्प्यैकं चेतः सरसिजमुमानाथ भवते सुखेनावस्थातुं जन इह न जानाति किमहो ॥ ९॥

- सदा मोहाटव्यां चरति युवतीनां कुचगिरौ नटत्याशाशाखास्वटति झटिति स्वैरमभितः । कपालिन् भिक्षो मे हृदयकपिमत्यन्तचपलं दृढं भक्त्या बद्ध्वा शिव भवदधीनं कुरु विभो ॥ २०॥

- नित्यानन्दरसालयं सुरमुनिस्वान्ताम्बुजाताश्रयं स्वच्छं सद्द्विजसेवितं कलुषहृत्सद्वासनाविष्कृतम् । शम्भुध्यानसरोवरं व्रज मनो हंसावतंस स्थिरं किं क्षुद्राश्रयपल्वलभ्रमणसञ्जातश्रमं प्राप्स्यसि ॥ ४८॥

- सोमकलाधरमौलौ कोमलघनकन्धरे महामहसि । स्वामिनि गिरिजानाथे मामकहृदयं निरन्तरं रमताम् ॥ ९३॥

- स्तोत्रेणालमहं प्रवच्मि न मृषा देवा विरिञ्चादय्ः स्तुत्यानं गणनाप्रसङ्गसमये त्वामग्रगण्यं विदुः । माहात्म्याग्रविचारणप्रकरणे धानातुषस्तोमवद्धूतास्त्वां विदुरुत्तमोत्तमफलं शम्भो भवत्सेवकाः ॥ १००॥

- आचार्य म्हणाले,

- हे प्रभो मी आदिमाते मृडानीसह आपणास वंदन करीत आहे. शिव-शिवा, अर्धनारीश्वर, पुरुष-प्रकृती, ह्यांनी आपणच क्रीडा करता. सर्व शक्तींचा प्रभाव इथेच उगम पावतो. आदिमातेच्या व आपल्या प्रखर तपा पासून हे निर्माण झाले आहे. भक्तांच्या कल्याणासाठी ते आहे.

त्रिलोकावर आपलेच अधिपत्य आहे. आपले ध्यान तीव्रतेने केले कीं आमच्या हृदयांत आपण प्रकट होता व आम्हास अनुपम असा स्फूर्तीदायक आनंद प्राप्त होतो. १.

- हे शम्भो, तुझी अगाध चरित्रसरिता तुझ्या भक्तांच्या अंत:करणातील पापरूपमलाचे क्षालन करून त्यांच्या बुद्धी-वृत्तीशी एकरूप होत आहे. जन्म-मृत्युरूप संसारांत बुडणाऱ्यांना तारक होत आहे. त्याच चरित्रसरितेचे हे तरंग म्हणजे "शिवानंदलहरी" माझ्या हृदयभुवनांत सदैव राहोत. २.

- स्मृती, षट्शास्त्रे, वैद्यक, शकुनविद्या, काव्य, गायन, तंत्र, मंत्र, पुराणे यातील एकही विद्या मला अवगत नाही. कुणाची स्तुतीकरणे, नटणे वा विनोद करणे ही चातुर्ये माझ्याजवळ नाहीत. राजाला कौतुक वाटावा असा एकही गुण माझ्याजवळ नाही. खरे तर मी कोण आहे हेच मला ज्ञात नाही असा मी केवळ एक पशु समजून हे पशुपते तुझ्या विख्यात सर्वज्ञतेने माझा सांभाळ कर. ५.

- खोल सरोवरांत किंवा घोर अरण्यांत जाऊन तुझ्या पूजेसाठी कमळे वा फुले शोधण्यासाठी जाणारे अज्ञानी म्हणावे लागतील कारण आमचे हृदयकमळ तुला अर्पण करून कृतकृत्य होता येते हे त्यांना समजत नाही. ९.

- सदा मोहग्रस्त असलेले मन नवयुवतींच्या स्तनांवर स्थिरावते तर घटकेत इतर विषयरूपी फांद्यांवर इकडून तिकडे नाचत राहते. कापलीतून भिक्षा मागणाऱ्या हे भगवान् शिवशंकरा ह्या माझ्या मर्कटचेष्टा करणाऱ्या अंत:करणांत दृढभक्ती उत्पन्न करून त्याचे चांचल्य तूं तझ्या पाशांनी बद्ध कर. २०.

- शिवध्यानरुपी नित्यानंदाच्या मधुर सरोवरांत देव व मुनी आपली हृदयकमळे विकसित करून त्या गोडीतच रममाण होतात, अशा स्वच्छ व सद्वासना निर्माण करणाऱ्या सरोवरांत आपली पापे धुऊन टाकून हे माझ्या अंत:करणरुपी राजहंसा तूंही स्थिर हो. उगाच विविध क्षुद्र देवतांच्या उपासनारुपी डबक्यांत कां बरे कष्टत आहेस? ४८.

- मस्तकी सुंदर चंद्र आहे, नील कंठ आहे, कांती तेज:पुंज आहे अशा त्रैलोक्याचा स्वामी व गिरिजेचापती असलेल्या शिवांच्या ध्यानांत माझे अंत:करण निरंतर रममाण होऊ दे. ९३.

- स्तवनासाठी तुझे अग्रगण्यत्व व सर्वश्रेष्ठत्व ब्रह्मदेवांनीही मान्य केले आहे. मग मी काय बरे खोटे बोललो? श्रेष्ठत्व ठरवण्याची वेळ आली तेंव्हां धान्याच्या भुसा सारखे इतर देव बाजूला फेकले गेले हे जाणूनच मी हे शंभो! तुझे सेवकत्व करतो. १००.

आचार्यांनी केलेल्या ह्या भक्तीमय स्तोत्राने प्रसन्न झालेल्या भगवान् शिवांनी आचार्यांना पांच स्फटिकलिंगे दिली व सांगितले, "शंकरा! ही योग, भोग, मुक्ती, वर आणि सुमोक्ष अशी पांच लिंगे आहेत. ह्यांच्या पूजनाने तुला अमोघ ज्ञान प्राप्त होईल व तूं सर्वत्र विजयी होशील. अमोघ तर्कशास्त्राने तुझी निर्णय करण्याची शक्ती तुला यश प्राप्त करून देईल. " भगवान् शिवाचे दर्शन करून आचार्य परत नेपाळला आले. नेपाळ मधल्या नीलकण्ठक्षेत्रांत आचार्यांनी "वर" ह्या स्फटिकलिंगाची स्थापना केली. तसेच महात्रिपुरसुंदरीच्या मंदिराची स्थापना केली. पशुपतीचे पुन्हा एकदा दर्शन घेतले व बदरीला परतले. आचार्यांच्या ह्या नेपाळ भेटीच्या वेळी त्यांच्या बरोबर चित्सुखाचार्य व हस्तामलक जसे होते तसे इतरही अनेकजण होते. त्यांत सर्वच आचार्यांचे शिष्य होते असे नाही. केवळ सेवाभाव व भक्तीने आलेलेही बरेच होते. त्यांतच गिरी नावाचा एक मुलगा होता. आचार्यांची मिळेल ती सेवा करण्यांत तो धन्यता मानत होता. त्याला आचार्यांच्या कोणत्याच कामाचा कधीच कंटाळा नसे. आचार्यांचे कपडे धुणे, पादुका

स्वच्छ करणे, आचार्यांच्या वस्तू सांभाळणे, पोथ्यांची नीट निगा राखणे, आचार्यांचे आसन घालणे इत्यादी तो अत्यंत मनोभावे व बिनचूक करीत असे. एकदा आचार्यांना काही कारणामुळे वारंवार शौचाला जावे लागत होते. त्यावेळी गिरीने अहोरात्र कष्ट करून आचार्यांना आराम मिळण्याची पराकाष्ठा केली. आचार्यांना हा त्रास बरेच दिवस होता पण आचार्य उठताक्षणीच गिरी पटकन उठून आचार्यांसाठी पाणी घेऊन उभा. शौचाहून आले कीं त्यांच्या स्नानाची व्यवस्था करून स्नान झाल्यावर कपडे धुवून वाळत घालणे इत्यादी गोष्टी न थकता करीत असे. गिरी कोणत्याच चर्चेत सहभागी होत नसे. इतर शिष्य त्याला मुद्दाम वेदांताच्या चर्चेत भाग घेण्यास उद्युक्त करीत पण गिरी मूढपणे बसून राही. झाडलोट करणे व इतर कामे करून इतरांना हलकी सलकी वाटणारी आचार्यांची कामे करण्यामुळे त्याला इतर शिष्य  मंदबुद्धी समजत पण आचार्य प्रवचनाला बसले कीं गिरी त्यांच्या बाजूला बसत असे. त्याचा हा नेम कधी चुकत नसे. बद्रीनाथला हाच क्रम चालू होता.

एक दिवस गंमत झाली. आचार्य प्रवचनाला बसले. समोर शिष्यपरिवार बसला. अनेक भक्तही होते. आचार्यांनी बाजूला पाहिले. गिरी दिसला नाही. आचार्य शांत बसले. थोड्यावेळाने धीर करून काही शिष्यांनी आचार्यांना प्रवचन सुरु करण्याची विनंती केली. आचार्य म्हणाले, “गिरी येई पर्यंत थांबू या!” आचार्यांच्या ह्या वाक्याने काही शिष्य आपसात पण आचार्यांना ऐकू जाईल अशा तऱ्हेने म्हणाले “गिरीला काय ज्ञान आहे? एका मूर्खासाठी इतरांचा उगाच खोळंबा!” काही शिष्यांनी त्याला दुजोरा दिला. तर काही म्हणाले, “नाही तर काय, त्या मूर्खाला कोणी बोलवायला जायलाही तयार नाही!” आचार्यांच्या हे सर्व लक्षांत आलेच. इतक्यांत गिरी येत असल्याचे आचार्यांच्या लक्षांत आले. गिरी जवळ येताच आचार्य म्हणाले, “अरे किती उशीर केलास बाबा! इथे इतरांचा खोळंबा होतो. त्यांतून तुला काही समजते तरी कां?” इतके बलून आचार्य थांबतात न थांबतात तोंच गिरी हात जोडून आचार्यांच्या समोर उभा राहून अत्यंत करूण प्रार्थना करू लागला,

“विदिताखिल शास्त्र सुधा जलधे महितोपनिषत्-कथितार्थ निधे।
हृदये कलये विमलं चरणं भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ १॥

करुणा वरुणालय पालय मां भवसागर दुःख विदून हृदम्।
रचयाखिल दर्शन तत्त्वविदं भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ २॥

भवता जनता सुहिता भविता निजबोध विचारण चारुमते।
कलयेश्वर जीव विवेक विदं भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ ३॥

भव एव भवानिति मे नितरां समजायत चेतसि कौतुकिता।
मम वारय मोह महाजलधिं भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ ४॥

सुकृतेSधिकृते बहुधा भवतो भविता समदर्शन लालसता।
अति दीनमिमं परिपालय मां भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ ५॥

जगतीमवितुं कलिताकृतयो विचरन्ति महामाह सच्छलतः।
अहिमांशुरिवात्र विभासि गुरो भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ ६॥

गुरुपुङ्गव पुङ्गवकेतन ते समतामयतां न हि कोSपि सुधीः।
शरणागत वत्सल तत्त्वनिधे भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ ७॥

विदिता न मया विशदैक कला न च किञ्चन काञ्चनमस्ति गुरो।
दृतमेव विधेहि कृपां सहजां भव शङ्कर देशिक मे शरणम्॥ ८॥

जेंव्हा गिरीने अशी प्रार्थना करण्यास सुरुवात केली त्यावेळी सगळी सभा आश्चर्यचकित झाली. तटस्थ होऊन गिरी काय म्हणतोय ते ऐकून त्यांत रंगून गेली. गिरी म्हणत होता,

- सर्व शास्त्ररूप अमृतमय ज्ञानाचे आपण महासागर आहात. सर्व रहस्यमय ज्ञानाचे अर्थ भांडार आहात. आपली पवित्र चरणकमले मी माझ्या हृदयकमळांत स्थापन करीत आहे, त्यामुळें शरण आलेल्या मला,

हे सद्गुरु आपण साक्षात् भगवान् शिवशंकरच असल्यामुळे उपदेश द्यावा. १.

- हे करुणासागर मला सांभाळा, भवसागराच्या दुःखाने माझे अंत:करण विदीर्ण झाले आहे. सर्व दर्शन तत्त्वज्ञानाचे मला याथार्य ज्ञान द्या. हे सद्गुरो मी आपणास शरण आलो आहे. २.

- आपल्या कृपेनेचे जनलोक खऱ्या हिताचा मार्ग अनुसरतील, कारण आत्मज्ञान करून देण्यांत आपली बुद्धी अत्यंत प्रभावी आहे. जीव, ईश्वर व ब्रह्म ह्यांचा अभेदरूप विवेक आपण मला समजावून द्या कारण हे हे सद्गुरो मी आपणास शरण आलो आहे. ३.

- आपणच साक्षात् भगवान् शिवशंकर आहात हा माझा दृढ निश्चय आहे. आपल्या विषयीच्या प्रेमादराने माझे चित्त स्वस्थ झाले आहे, कृपया आपण ह्या मोहसागराचे निवारण करावे. हे सद्गुरो मी आपणास शरण आलो आहे. ४.

- पूर्वसुकृता खेरीज आपल्या चरणी शरणागती पत्करण्याची तीव्र इच्छा निर्माण होणार नाही. मी अति दीन होऊन शरण आलो आहे म्हणून हे सद्गुरो मला मार्गदर्शन करा. ५.

- जगताच्या संरक्षणाच्या निश्चित हेतूने चंद्राप्रमाणे शीतल रूप धारण करून आपण ह्या महान अवतारांत प्रकट झाला आहत तर हे सद्गुरो शंकरा मज शरणागतास मार्ग दाखवा. ६.

- शरणागतावर कृपाप्रेम करणाऱ्या हे सर्वश्रेष्ठ व प्रतापी सद्गुरो आपल्या इतका तेजस्वी बुद्धिमान आज तरी कोणी नाही. ह्या भेदमय जीवनांत अभेदमय ब्रह्म दर्शन घडवणाऱ्या हे ज्ञानसागरा, शरण आलेल्या मला मार्ग दाखवा. ७.

- मला अध्यात्मशास्त्राचे कणभरही ज्ञान नाही व दक्षिणा द्यायला कणभर सोनेही नाही. पण कृपा हा आपला सहज स्वभाव आहे तरी हे सद्गुरो माझ्या सारख्या शरणागतावर त्वरित कृपा करून मार्ग दाखवा. ८.

असे म्हणून अष्टसात्विक भाव जागे झालेल्या गिरीने आचार्यांना दंडवत प्रणाम केला. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. कंठ सद्गद झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. कांती विवर्ण झाली. कपाळावर घर्मबिंदू दाटून आले. शरीराला कंप सुटला. गिरी तटस्थ झाला.

ज्या वृत्तात गिरीने ही प्रार्थना केली ते वृत्त तोटक. म्हणून भावविवश होऊन नतमस्तक झालेल्या गिरीच्या मस्तकाला आचार्यांनी अत्यंत करुणेने स्पर्श करून "तोटका" उठ म्हणून हांक मारली. ज्ञानसागरांत डुंबणारा "तोटक"रुपी गिरी हात जोडून उभा राहिला. आचार्यांनी त्याला संन्यास दीक्षा दिली. "तोटकाचार्य" नाव ठेवले. पुढें बद्रीनारायणाचे मंदिर पूर्ण झाल्यावर आचार्यांनी तिथेच "ज्योतीर्मठाची" स्थापना केली व मठाधिपती म्हणून तोटकाचार्यांची नेमणूक केली. त्या मंगल समयी इतर सर्व शिष्यांनी "तोटकाचार्यांचे" अभिनंदन केले. त्यांच्या मनांत स्वत:च्या ज्ञानाचा जो गर्व झाला होता तो मावळला! त्याजागी विनयभाव निर्माण झाला. ज्ञानाभिमानाचा बोळा निघाला. ज्ञान प्रवाही झाले. अशाप्रकारे आचार्य सर्व शिष्यांची काळजी घेत केदारला जाण्यास निघाले.

प्रकरण २५ वे

# जगन्नाथपुरी येथें मठ स्थापना

केदारला आपल्या जवळच्या मुक्तिलिंगाची स्थापना करून आचार्य तेथून पूर्वेकडील समुद्र तीरावर असलेल्या जगन्नाथपुरीला जगन्नाथाच्या दर्शनास आले. सागरतीरावरील जगन्नाथाच्या मंदिराच्या सौंदर्याने आचार्य मुग्ध झाले. त्या मुग्धावास्थेतच आचार्य जगन्नाथाच्या मंदिरांत दर्शन घ्यायला आले त्यावेळी जगन्नाथाला पाहून त्यांची मुग्धता बोलकी झाली आणि आचार्य जगन्नाथाशी बोलू लागले.

कदाचित्कालिन्दीतटविपिनसङ्गीतकवरो मुदा गोपीनारीवदनकमलास्वादमधुपः ।
रमाशम्भुब्रह्मामरपतिगणेशार्चितपदो जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु मे ॥ १ ॥

भुजे सव्ये वेणुं शिरसि शिखिपिञ्छं कटितटे दुकूलं नेत्रान्ते सहचरकटाक्षं विदधते ।
सदा श्रीमद्वृन्दावनवसतिलीलापरिचयो जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु ने ॥ २ ॥

महाम्भोधेस्तीरे कनकरुचिरे नीलशिखरे वसन् प्रासादान्तस्सहजबलभद्रेण बलिना ।
सुभद्रामध्यस्थस्सकलसुरसेवावसरदो जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु मे ॥ ३ ॥

कृपापारावारास्सजलजलदश्रेणिरुचिरो रमावाणीसौमस्सुरदमलपद्मोद्भवमुखैः ।
सुरेन्द्रैराराध्यः श्रुतिगणशिखागीतचरितो जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु मे ॥ ४ ॥

रथारूढो गच्छन् पथि मिलितभूदेवपटलैः स्तुतिप्रादुर्भावं प्रतिपद मुपाकर्ण्य सदयः ।
दयासिन्धुर्बन्धुस्सकलजगता सिन्धुसुतया जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु मे ॥५ ॥

परब्रह्मापीडः कुवलयदलोत्फुल्लनयनो निवासी नीलाद्रौ निहितचरणोऽनन्तशिरसि।
रसानन्दो राधासरसवपुरालिङ्गनसखो जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु मे ॥ ६ ॥

न वै प्रार्थ्यं राज्यं न च कनकतां भोगविभवं न याचेऽहं रम्यां निखिलजनकाम्यां वरवधूं।
सदा काले काले प्रमथपतिना गीतचरितो जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु मे ॥ ७ ॥

हर त्वं संसारं द्रुततरमसारं सुरपते हर त्वं पापानां विततिमपरां यादवपते।
अहो दीनानाथं निहितमचलं निश्चितपदं जगन्नाथः स्वामी नयनपथगामी भवतु मे ॥ ८ ॥

इति श्री शङ्कराचार्यप्रणीतं जगन्नाथाष्टकं सम्पूर्णं॥

- ‘‘हे जगन्नाथा! जगन्नायका, जगाताधारा यमुनेच्या तीरावर वाळूच्या अतिशय भावपूर्ण नादमधुर गाणी गाताना गोपी अति उत्साहाने व आनंदाने तुझ्या भोवती रुंजी घालीत. त्यावेळी एखाद्या भ्रमराने फुलांतला मध हळुवारपणे घ्यावा तसा तूं गोपींच्या ओठातला प्रेमरस पीत असे. हे श्रीकृष्णा, तुझ्या सारखा परिपूर्ण पुरुषोत्तम आजवर झालाच नाही. त्यामुळे सर्वांनाच आपआपल्या भावाप्रमाणे सतत तुझे आकर्षण वाटते. अनेकांच्या बाबतीत ते आकर्षण अनावर झाले म्हणूनच लक्ष्मी, शंकर, इंद्र व अग्रपूजेचा मान असणाऱ्या गानेशानेही तुझ्या चरणकमळांना वंदन केले आहे. अशा हे जगन्नाथा श्रीकृष्णा मला तूं माझ्या नेत्रांवाटे दर्शन. १.

- उजव्या हातात मुरली, मस्तकी मोरपीस, कमरेला पितांबर असे धारण करून आपल्या सवंगड्यांकडे कृपादृष्टीने तूं पहात असे व रमणीय वृन्दावनांत आपल्या अद्भुतरम्य लीला सर्वांना दाखवीत असे. अशा हे

जगन्नाथा, श्रीकृष्णा मला दर्शन देऊन नेत्रांवाटे माझ्या अंतःकरणात राहा. २.

- हिंदमहासागराच्या तीरी असलेल्या नीलपर्वतराजीच्या पायथ्याशी उत्तुंग सुवर्ण शिखरे असलेल्या प्रासादांत सुभद्रेला मध्ये घेऊन व दुसऱ्या बाजूला बलरामांना घेऊन वास्तव्य केल्यामुळे इथल्या प्रजेला सेवेची संधी प्राप्त करून देणाऱ्या हे जगन्नाथा, श्रीकृष्णा मला दर्शन देऊन नेत्रांवाटे माझ्या अंतःकरणात राहा. ३.

- हे कृपासागरा, घननिळा, लक्ष्मी, चंद्र, ब्रह्मदेव हे मधुर वाणीने तुझी स्तुतिस्तोत्रे गातात, इंद्रादी देव आराधना करतात व वेदातील सर्वश्रेष्ठ उपनिषदांतही तुझीच चरित्रे गाईली आहेत हे जगन्नाथा, श्रीकृष्णा मला दर्शन देऊन नेत्रांवाटे माझ्या अंतःकरणात राहा. ४.

- हे श्रीकृष्णा, रथारूढ होऊन आपण रस्त्यांतून जाऊ लागलात कीं ब्राह्मणांचे थवेच्या थवे आपणावर स्तुतीसुमनांचा वर्षाव करीत व आपणही थांबत थांबत ती स्तुतिसुमने ऐकून त्यांच्यावर आपली कृपादृष्टी टाकीत असत अशा दयासागर जगन्नाथा, श्रीकृष्णा मला दर्शन देऊन नेत्रांवाटे माझ्या अंतःकरणात राहा. ५.

- परब्रह्मरुपी मुकुट धारण केलेल्या व तेजःपुंज कमलनयना, राधेच्या कमनीय बांधेसूद देहाला आलिंगन देऊन भक्तिरसाचा आस्वाद देणाऱ्या हे जगन्नाथा, श्रीकृष्णा मला दर्शन देऊन नेत्रांवाटे माझ्या अंतःकरणात राहा. ६.

- हे देवाधिदेवा मी ही प्रार्थना राज्य, सोने, उपभोग वा आकर्षक सौंदर्यवती वधू ह्यांच्या प्राप्तीसाठी करीत नसून तुझ्या प्राप्तीसाठी करीत आहे म्हणून प्रमथपती भगवान् शिवांनी प्रार्थिलेल्या हे जगन्नाथा, श्रीकृष्णा मला दर्शन देऊन नेत्रांवाटे माझ्या अंतःकरणात राहा. ७.

- असार व अनित्य असूनही सत्य व नित्य वाटणाऱ्या ह्या संसाराचा आपण निरास करा व मिथ्यत्वाचा त्वरेने दृढ निश्चय करून द्या. हे यादवश्रेष्ठा माझ्या हातून घडलेली व घडणारी सर्व पापे नष्ट करा. मी अनाथ, दीन, दुबळा व पापी आहे पण आपण दीनांचे नाथ आहात, मी अत्यंत स्थिरतेने आपणास शरण आलो आहे म्हणून हे जगन्नाथा, श्रीकृष्णा मला दर्शन देऊन नेत्रांवाटे माझ्या अंत:करणात राहा. ८.

आचार्य भावपूर्ण प्रार्थना करीत होते. पद्मपादाचार्य व चित्सुखाचार्य त्या भावाशी इतके समरस झाले होते कीं आचार्यांची प्रार्थना संपली तरी ते दोघे जगन्नाथाच्या ध्यानातच तल्लीन झाले होते. जणू आचार्यांनी केलेल्या प्रार्थनेप्रमाणें साक्षात् भगवान् श्रीकृष्णांनी त्यांच्या अंत:करणात प्रवेश केला होता. किंचित् काल वाट पाहून आचार्यांनी त्यांना देहभानावर आणले.

आचार्यांनी पद्मपाद व चित्सुख ह्यांना जगन्नाथपुरीला धर्मपीठस्थापनेचा आपला संकल्प सांगितला. आचार्यांनी आपला हा संकल्प प्रकट करतांच तेथें उपस्थित असलेल्या ज्येष्ठ व श्रेष्ठ वैदिक ब्राह्मणांनी अत्यानंदाने तो पूर्णत्वास नेण्याची जबाबदारी स्वेच्छेने स्वीकारली. मंदिराजवळच जागा मिळवली. सर्व व्यवस्था जगन्नाथमंदिराच्या विश्वस्थांनी पार पाडली. जगन्नाथपुरीला धर्मपीठ स्थापन झाले. आचार्यांनी पद्मपादांना त्या पिठावर अधिपती म्हणून नेमले. काही काळ व्यवस्था करण्यासाठी थांबून आचार्य पद्मपादांना घेऊन श्रीशैल्यला जाण्यास निघाले.

प्रकरण २६ वे

# श्रीशैल पर्वतावर वास्तव्य व कापालीकांच्या हल्ल्यातून सुटका

"मल्लिकार्जुन" हे ज्योतिर्लिंग श्रीशैल पर्वतावर आहे. आंध्रप्रदेशांत कृष्णा नदीच्या पूर्व तीरावर एका उंचच उंच पर्वतावर हे अतिरम्य स्थान आहे. गगनचुंबी श्रीशैलपर्वत, त्यावरील अपूर्व वृक्षवल्ली, विविध पक्षी इत्यादी सर्व सौंदर्य पाहून आचार्य भगवंताच्या लीलेने भारावले. त्या प्रशस्त मंदिरांत येऊन मल्लिकार्जुनाचे दर्शन घेताना त्यांच्या मुखातून सहजोद्गार निघाले,

"श्रीशैलशृङ्गे विबुधातिसङ्गे तुलाद्रितुङ्गेऽपि मुदा वसन्तम् ।
तमर्जुनं मल्लिकपूर्वमेकं नमामि संसारसमुद्रसेतुम् ॥

"ह्या श्रीशैल्य पर्वतावर देव, गंधर्व, यक्षादिकांच्या भेटीसाठी विविध प्रसंगी आपण प्रकट झालांत आणि शेषाद्रीपर्वतावर जसे नित्य वास्तव्य आहे तसेच ह्या ठिकाणी मल्लिकार्जुन ह्या नावाने आपण भक्तानुग्रहासाठी सतत वास्तव्य करता. भवसागरांतून पलीकडे जाण्यासाठी सेतू असलेल्या आपणास माझे वंदन आहे!" असे म्हणून आचार्यांनी शिवानंदलहरी म्हणत माल्लीकार्जुनाचे पूजन केले. श्रीशैल्यपर्वतावरचा एकांत त्यांना फार आवडला. त्या रम्य पर्वतावरील एका विशाल गुहेंत बसून आचार्य ध्यानमग्न झाले. अशावेळी चित्सुखाचार्य व पद्मपादाचार्य आचार्यांना डोळ्यांत तेल घालून जपत असत. त्यांच्या अवती भवती जागता पहारा करीत.

आचार्यांची प्रवचने इथेही अमाप गर्दी खेचू लागली. येणारे शिवभक्त अत्यंत सुखावत. कापालिक पंथाचा त्या भागांत बराच प्रभाव होता. अनेक कापालिकांनीही आचार्यांचे दर्शन घेतले. ह्या कापालीकांच्या वर्दळीमुळे पद्मपाद व चित्सुख आचार्यांना क्षणभरही एकटे राहू देत नव्हते. पद्मापादाचार्यांना कापालिकांच्या बद्दल बरीच माहिती होती. त्यांनी चित्सुखाचार्य व इतर काही निवडक शिष्य ह्यांना ती माहिती सांगून सतर्क करले होते. पद्मपादाचार्य म्हणाले, " हे कापालिक अघोर कृत्ये करतात. शिवाला मानवी

मस्तके वाहण्यांत धन्यता मानतात. एखादा श्रेष्ठ योगी, राजा अथवा श्रीमंत व्यक्ती हेरून आपला कार्यभाग साधण्यात अत्यंत कुशल असतात. ज्याअर्थी हे वारंवार दर्शनाला येऊ लागलेत त्याअर्थी ह्यांत काहीतरी काळेबेरे आहे. आपण सर्वांनीच सावध राहिले पाहिजे. मला तर इथें आचार्यांच्या जिवालाच धोका वाटतो. आचार्य समर्थ आहेत. तथापि अत्यंत विरक्त आहेत. इतके कीं त्याना स्वशरीराची पर्वा नाही. " पद्मापादाचार्यांना काय सांगायचे आहे ते सर्वांच्या ध्यानांत आले. त्यामुळें आचार्य गुहेत ध्यानासाठी बसले कीं ह्यांचा जगता पहारा त्या ठिकाणी सुरु असे.

पद्मपादांची सूचना सर्वच शिष्यांना मनापासून पटली. त्यामुळे आचार्य कापालिकांना एकटे सांपडणे अशक्य झाले. कापालिकांच्या एका म्होरक्याने मनांत निश्चयच केला कीं आचार्यांचे मस्तक शिवाला अर्पण करून शिवाला प्रसन्न करून घ्यायचे. पण हे घडायचे कसें? तसें घडण्याची सुतराम शक्यता दिसेना कारण आचार्य त्याला कधीच एकटे सांपडेनात. म्हणून त्यानें आचार्य ज्या गुहेत ध्यानासाठी बसत असत त्या गुहेत आचार्य व त्यांचे शिष्य मंदिरांत गेल्यावर प्रवेश केला. कारण गुहेंत आचार्य एकटेच ध्यानासाठी बसत असत व शिष्य बाहेर पहारा करीत असत. गुहा बरीच मोठी होती. तो कापालिक हातात नंगी तलवार घेऊनच आत जाऊन बसला होता. त्याला आता खात्री वाटू लागली कीं भगवान् शिवांनीच आपल्याला ही योजना ठरवून दिली. इकडे आचार्य मंदिरातील कार्यक्रम झाल्यावर पुनश्च गुहेकडे निघाले. पद्मापादाचार्य हे बालपणापासून नृसिंहाचे उपासक होते. आचार्यांना इथें कोणत्याही क्षणी धोका होऊ शकतो ह्या जाणीवेने पद्मपादाचार्य अहोरात्र श्रीनृसिंहाचे स्तवन करून आचार्यांचे अज्ञात धोक्यापासून संरक्षण करण्याची प्रार्थना करीत असे. त्या प्रार्थनेत आपल्या सद्गुरूंच्या विषयीचा परमादर व्यक्त करून कळवळून केलेली ती प्रार्थना असे.

त्यादिवशी नित्याप्रमाणें आचार्य गुहेत शिरले व आंत असलेल्या खोल गर्भगुहेत गेले. आसन टाकून त्यावर शांतपणे ध्यानासाठी बसले. कापालिक ह्याच संधीची वाट पहात एका कपारीच्या आडोशाला आंत अंग चोरून उभा होता. आचार्य व कापालिक यांच्यात १०-१२ पावलांचे अंतर होते. आचार्यांनी गुहेंत प्रवेश करतांच पद्मपादाचार्यांनी

नित्याप्रमाणे श्रीनृसिंहाचा धावा केला व ज्ञात अज्ञात अशा कोणत्याही संकटापासून आचार्यांचे रक्षणासाठी डोळेमिटून प्रार्थना केली. क्षणकाल नृसिंहाचे ध्यान धरले. चित्सुखाचार्य व इतर शिष्य हे पद्मपादाचार्यांकडे पाहात होते. इतक्यांत डोळे मिटलेल्या अवस्थेतच पद्मापादाचार्य डोळ्याचे पाते लवते न लवते तोंच गुहेंत गेलेले होते. पद्मपादाचार्य झपाटल्यासारखे आंत गेलेले चित्सुखाचार्य यांना जाणवले. आंत गेलेल्या पद्मपदाचार्यांचे रुपांतर गुहेंत जाता क्षणीच नरसिंहात झाले. ध्यानमग्न झालेल्या आचार्यांच्या रोखाने नंगी तलवार घेऊन निघालेल्या कापालिकावर नरसिंहाने झडप घातली. त्याला खाली पडून आपल्या तीक्ष्ण व अणकुचीदार नखांनी कापालिकाचा कोथळा बाहेर काढला. त्या कापालीकाला ब्रह्मांड आठवले. ज्या शिवाच्या प्राप्तीसाठी तो हे करीत होता त्यांचे त्याला स्मरण झाले त्याची प्राणज्योत त्याचे शरीर सोडून आचार्यांच्या शरीरांत विलीन झाली. नरसिंहाचे दर्शन आचार्यांना झाले. नरसिंह जसे प्रकटले तसे अंतर्धान पावले. पद्मपादाचार्य डोळे मिटलेल्या अवस्थेतच गुहेच्या बाहेर आले व नित्याच्या जागी उभे राहिले. चित्सुखाचार्य आश्चर्यचकित झाले. पण कोणालाच फार काळ वाट पहावी लागली नाही. आचार्य स्वतःच गुहे बाहेर आले व मल्लिकार्जुनाच्या मंदिराकडे निघाले. कोणाशी काहीही न बोलता. सर्वजण त्यांच्या पाठोपाठ निघाले. गुहेत काय घडले हे इतरांना कळले नाही.

प्रकरण २७ वे

# अहोबील येथे नृसिंहचक्राची स्थापना

आचार्यांनी पद्मपादांना अहोबीलला जाण्याचा आपला मानस सांगितला. पद्मपादांना आनंद झाला. त्याचे कारणही तसेच होते. अहोबीलला नृसिंहमंदिर आहे. त्या नृसिंहाची पद्मपाद बालपणापासून उपासना करीत होते. त्या मंदिरांत ‘‘लक्ष्मी नृसिंह’’मूर्ती आहे. त्यामुळें त्या मंदिराला ‘‘लक्ष्मीनृसिंह’’मंदीर असे म्हणत. आतां पद्मपादांना ‘‘लक्ष्मीनृसिंहाची’’ ओढ लागली. आचार्य लगेच निघाले. सर्व शिष्यांसह आचार्य अहोबिलच्या लक्ष्मीनृसिंहाच्या मंदिरांत आले. आचार्यांनी लक्ष्मीनृसिंहाचे दर्शन घेतले. लक्ष्मीनृसिंहासमोर उभे राहून दर्शन घेताना आचार्यांना ‘‘श्रीशैल्य पर्वता’’वरील गुहेत घडलेल्या अघटीत घटनेचे स्मरण झाले. त्यांनी डोळे मिटून प्रार्थना करण्यासाठी ध्यान धरले. आचार्य मनांत प्रार्थना करू लागले,

‘‘संसारघोरगहने चरतो मुरारे मारोग्रभीकरमृगप्रचुरार्दितस्य ।
आर्तस्य मत्सरनिदाघसुदुःखितस्य लक्ष्मीनृसिंह मम देहि करावलम्बम् ॥‘‘

संसाररूपी घनघोर जंगलातून वाटचाल करताना हिंस्त्रश्वापदांच्या तडाख्यांत सांपडून मी भयचकित झालो आहे. त्यांत अधिकभर म्हणजे मत्सरादिक दाहक किरण मस्तकावर पडून मी व्याकूळ झालो आहे. त्यातून बाहेर काढण्यासाठी हे मूरराक्षसांतका मला आपल्या बळकट हातांचा आधार द्या. हे लक्ष्मीनृसिंहा आपणच मला मार्ग दाखवा.

नुकताच घडलेला गुहेतला प्रसंग, आचार्यांना गुहेत दिलेले दर्शन आणि आचार्यांनी व्याकूळ होऊन केलेली प्रार्थना ह्यामुळे आचार्यांनी धरलेल्या ध्यानांत साक्षात् श्रीनृसिंह प्रगट झाले. आचार्यांना म्हणाले, ‘‘मीच पद्मपादाच्या शरीरांत प्रवेश करून प्रगट झालो. त्या कापालिकाला ठार मारून परत अंतर्धान पावलो. पद्मपादाची भक्ती श्रेष्ठ आहे. ’’ आचार्यांना आशीर्वाद देऊन श्रीनृसिंह अंतर्धान पावले. देहभानावर आल्यावर आचार्यांनी नृसिंहचक्र तिथें स्थापन करण्याची आपली इच्छा सांगितली. त्याप्रमाणें सर्व व्यवस्था होऊन नृसिंहचक्राची स्थापना आचार्यांनी पद्मपादांच्या हस्ते

करवून घेतली. आचार्यांच्या ह्या कृतीने पद्मपाद व चित्सुख भारावले गेले असल्यास त्यांत काही नवल नाही. तिथेच आचार्यांनी “श्रीलक्ष्मीनृसिंह पञ्चरत्न” व श्रीलक्ष्मीनृसिंह करुणरस स्तोत्र” ही दोन स्तोत्रे रचली. नृसिंहाचा आशीर्वाद घेऊन आचार्य पद्मपादांना म्हणाले, “ भीमानदीच्या तीरावर असलेले पंढरपूर हे महायोगपीठ आहे. पुंडलिक नामक आपल्या महाभक्तासाठी परब्रह्म इथे अवतरले आहे. मी चित्सुखाला बरोबर घेऊन जातो. आपण इथून पुन्हां पुरीला थापन केलेल्या मठाच्या व्यवस्थेसाठी जावे हे उत्तम!” पद्मपादाचार्य आचार्यांना वंदन करून पुरीकडे जाण्यास निघाले. आचार्य चित्सुख व इतर शिष्यांना बरोबर घेऊन महाराष्ट्रांतल्या वैकुंठाकडे म्हणजेच पंढरपूरकडे निघाले.

प्रकरण २८ वे

# महाराष्ट्र भ्रमण

अष्ठावीस युगे भक्तांसाठी विटेवर उभ्या असलेल्या पांडुरंगांचे दर्शन होताच आचार्यांची वागदेवाता स्फुरण पावली आणि सहजतेने आचार्य प्रार्थना करू लागले.

महायोगपीठे तटे भीमरथ्या वरं पुण्डरीकाय दातुं मुनीन्द्रैः ।
समागत्य निष्ठन्तमानन्दकन्दं परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ १॥
तटिद्वाससं नीलमेघावभासं रमामन्दिरं सुन्दरं चित्प्रकाशम् ।
वरं त्विष्टकायां समन्यस्तपादं परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ २॥
प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां नितम्बः कराभ्यां धृतो येन तस्मात् ।
विधातुर्वसत्यै धृतो नाभिकोशः परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ३॥
स्फुरत्कौस्तुभालङ्कृतं कण्ठदेशे श्रिया जुष्टकेयूरकं श्रीनिवासम् ।
शिवं शान्तमीड्यं वरं लोकपालं परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ४॥
शरच्चन्द्रबिम्बाननं चारुहासं लसत्कुण्डलाक्रान्तगण्डस्थलान्तम् ।
जपारागबिम्बाधरं कऽजनेत्रं परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम्॥ ५॥
किरीटोज्वलत्सर्वदिक्प्रान्तभागं सुरैरर्चितं दिव्यरत्नैरनर्घैः ।
त्रिभङ्गाकृतिं बर्हमाल्यावतंसं परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम्॥ ६॥
विभुं वेणुनादं चरन्तं दुरन्तं स्वयं लीलया गोपवेषं दधानम् ।
गवां बृन्दकानन्ददं चारुहासं परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ७॥
अजं रुक्मिणीप्राणसञ्जीवनं तं परं धाम कैवल्यमेकं तुरीयम् ।
प्रसन्नं प्रपन्नार्तिहं देवदेवं परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ८॥
स्तवं पाण्डुरङ्गस्य वै पुण्यदं ये पठन्त्येकचित्तेन भक्त्या च नित्यम् ।
भवाम्भोनिधिं ते वितीर्त्वान्तकाले हरेरालयं शाश्वतं प्राप्नुवन्ति ॥९॥

- भीमानदीच्या तीरावर पुंडलीकाला वर देण्यासाठी श्रेष्ठ श्रेष्ठ मुनिंसह येऊन महायोगपिठांत राहणाऱ्या आनंदकंद परब्रह्मरूप पांडूरंगास मी वंदन करतो. १

- विजेप्रमाणे चमकणारा पितांबर आपल्या तेजस्वी मेघशाम अंगावर धारण केलेल्या लक्ष्मीचे निवासस्थान असलेल्या, सुंदर चित्प्रकाश व भक्तांना दर्शनदेण्यासाठी आपले समचरण विटेवर ठेऊन उभ्या असलेल्या सर्वश्रेष्ठ परब्रह्मरुपी पांडूरंगास मी वंदन करतो. २.

- अनन्यभावाने मला शरण येणाऱ्या भक्तांना भवसागर फक्त कमरे इतकाच आहे व तो सहज पार करता येतो हे समजण्यासाठी कमरेवर हात ठेऊन व ब्रह्मदेवाचा सत्यलोक कमरे पासून केवळ नाभीस्थाना इतकाच दूर आहे हे दाखवण्यासाठी हाताची बोटे नाभिस्थानाकडे वळवली आहेत अशा परब्रह्मरुपी पांडुरंगाला माझा नमस्कार आहे. ३.

- गळयांत देदीप्यमान कौस्तुभमणी, बाहूंवर सुंदर बाजूबंद, वक्षस्थली श्रीलक्ष्मी निवास, इत्यादी धारण केलेल्या लोकपालनकर्त्या परमशांत, परममंगल, शिवस्वरूप, सर्व श्रेष्ठ व स्तुती करण्यास योग्य अशा परब्रह्मरुपी पांडुरंगाला मी वंदन करतो. ५.

- दिव्यमुकुटामुळे सर्व दिशा उजळून निघाल्यांत, दिव्य व अमूल्य रात्नाभरणाने देवांनी पूजन केले आहे, गळयांत वनमाला व मस्तकी मायुरपिच्छ धारण केले आहे, तीन ठिकाणी किंचित बाक देऊन मोहकतेने उभ्याअसलेल्या परब्रह्मरुपी पांडुरंगाला मी वंदन करतो. ६.

- विश्वव्यापी असूनही वृन्दावनांत मधुर वेणुनाद करीत फिरणाऱ्या, गोपवेष धारण करून गायींना आनद देणाऱ्या, मधुर हास्य करणाऱ्या व ज्याच्या अनंत लीलांचा कुणालाही अंत लागणार नाही अशा परब्रह्मरुपी पांडुरंगाला मी वंदन करतो. ७.

- शुद्ध, कैवल्य, अजन्मा, रुक्मिणीचा प्राण, सर्व अवस्थांच्या पलीकडे असलेल्या, भक्तांचे परमविश्रामधाम, शरणागत वत्सल, देवांचाही देव असलेल्या ह्या परब्रह्मरुपी पांडुरंगाला मी वंदन करतो. ८.

- अत्यंत पुण्यकारक असे हे पांडुरंगाष्टक श्रद्धा, भक्ती व भाव यांच्यासह मन एकाग्र करून म्हणणाऱ्याला भवसागर सहज तरून जाता येईल व अंती श्रीहरीच्या शाश्वतस्वरुपाची प्राप्ती होईल. ९.

आचार्य जेंव्हा ही प्रार्थना करीत होते त्यावेळी त्या ठिकाणी असलेल्या भक्तांची अंत:करणे भावविवश झाली. एका वेगळयाच अनुभूतीचा त्यांना अनुभव मिळाला. शब्दांचे सामर्थ्य केवढे प्रचंड असते ह्याचा त्यांना प्रत्यय आला. पंढरपूरच्या पांडुरंगांचे दर्शन घेऊन आचार्य परळीवैजनाथ येथें आले. त्याकाळी परळीचे नाव परलिका होते. तिथें वैद्यनाथाचे दर्शन घेताना आचार्यांनी वैद्यनाथाची स्तुती केली.

पूर्वोत्तरे पारलिकाभिधाने सदाशिवं तं गिरिजासमेतम् ।
सुरासुराधितपादपद्मं श्रीवैद्यनाथं तमहं नमामि ॥

पूर्वोत्तर परलिकेंत आपण गीरीजेसह वास्तव्य केले आहे. इंद्रादि सुरवर, दैत्य, गंधर्व व मानव हे सर्वच आपली पूजा अर्चा व आराधना करीत असतात, आपल्या चरणकमलांची सेवा करीत असतात. हे वैद्यनाथा आपणास माझे वंदन आहे. ”

परळीहून आचार्य औंढ्यानागनाथ ह्या क्षेत्रास आले. औंढ्यानागनाथ हे जरी आजचे नाव असले तरी त्या काळी ती अमर्दकेश्वराची नगरी अमर्दक नगरी होती. तिथें आचार्यांनी अमर्दकेश्वराची प्रार्थना केली.

आमर्दसंज्ञे नगरेऽतिरम्ये विभूषिताङ्गं विविधैश्च भोगैः ।
सद्भक्तिमुक्तिप्रदमीशमेकं श्रीनागनाथं शरणं प्रपद्ये ॥ ६॥

अमर्दक नामक रम्य नगरीत आपले वास्तव्य आहे. आपल्या अंगावर विविध नाग खेळतात त्याने आपण अत्यंत सुशोभित दिसता. गंधादी विविध भोगांनी आपण अत्यंत

सुंदर दिसता. जीवनातल्या विविध विहित भोगांची आमच्यावर बरसात करता व मोक्षही देता. मी आपणास शरण आहे. " अशी प्रार्थना करून आचार्य अमर्दक नगरीहून एलापूर म्हणजे वेरूळला ज्योतिर्लिंग घृष्णेश्वराचे दर्शन घेण्यास आले. तिथे घृष्णेश्वराची प्रार्थना केली,

एलापुरी रम्यशिवालयेऽस्मिन् समुल्लसन्तं त्रिजगद्वरेण्यम् ।
वन्दे महोदारतरस्वभावं घृष्णेश्वराख्यं शरणम् प्रपद्ये ॥

एलापूर नामक रमणीय क्षेत्रात हे प्रभो आपण घृष्णेश्वर ह्या नावाने राहत आहात. आपण वैभवशाली व उदारांत सर्वश्रेष्ठ, भोळे व दयाळू आहात. मी आपणास शरण आहे.

एलापूरहून आचार्य निघाले. त्यांना आता सह्यगिरी हांका मारीत होता. सह्याद्रीच्या विविध शिखरांनी नटलेल्या ब्रह्मगिरीला जाण्यास आचार्य उत्सुक होते. त्यांची ब्रह्मगिरीला जाण्याची ओढ पाहून चित्सुखांना आश्चर्य वाटले. आचार्यांच्या ते लक्षांत आलेच. आचार्य चित्सुखांना म्हणाले, "ब्रह्मगिरीला फार महत्व आहे. " आचार्यांना जणू आपल्या मूळ स्वरूपाचे स्मरण झाले. आचार्य पुढे म्हणाले, "गौतमांनी घोर तप करून भगवान् शिवांना प्रसन्न करून घेतले. शिवांना त्यांनी प्रार्थना केली कीं गंगा इथे भूमंडळावर उतरवावी. पण गंगा शिवाच्या मस्तकातून खाली उडी घेऊन पुन्हां मस्तकांत विराजमान होई. ब्रह्मगिरिवर असे तीन वेळा झाले. पण ती प्रवाही होईना. म्हणून शिवांनी आपल्या जटा त्या पर्वताच्या एका शिळेवर आपटल्या व गंगेला प्रवाही होण्याची आज्ञा दिली. त्यावेळी त्याच शिळेखालून गंगा प्रवाही होऊन गंगाद्वार येथें प्रगट झाली. त्या गंगेला गौतममुनींनी येथे आणले म्हणून तिला गौतमी असेही नाम मिळाले. गौतम मुनींवर प्रसन्न झालेल्या शिवांनी गौतमांना कुशाचे एक आवर्त करण्यास सांगितले व त्यात गंगेला पाचारण केले. तेच कुशावर्त. ह्या गौतमीचे माहात्म्य असे आहे कीं

"या गतीर्योगयुक्तानां मुनिनामुर्ध्वरेत्साम् ।
सा गति: सर्व जंतुनां गौतमी तीरवासिनाम् ॥"

आणि त्या कुशावर्तात  भगवान् शिव आजही त्र्यम्बकेश्वराच्या रूपाने स्नान करीत असतात.  आचार्यांनी सांगितलेली कथा चित्सुखाचार्य तन्मयतेने ऐकत होते. अशाप्रकारे ज्ञानदान करीत, विविध कथा सांगत सर्वजण ब्रह्मगिरीला आले. भगवान् शिवांना ‘‘संचार: पदयो: प्रदक्षिणविधि: स्तोत्राणि सर्वा गिरो |’’ असे म्हणणारे आचार्य त्या ब्रह्मगिरीला प्रदक्षिणा करून मगच ब्रह्मगिरीच्या शिखरावर आले. सर्व कुंडांमध्ये स्नान करीत करीत ते गंगाद्वार, गंगाद्वारहून कुशावर्त इथें आले. कुशावर्तात स्नान करून मग आचार्य त्र्यंबकेश्वराच्या दर्शनास आले. हात जोडून प्रार्थना करू लागले,

‘‘सह्याद्रिशीर्षे विमले वसन्तं गोदावरितीरपवित्रदेशे ।
यद्दर्शनात्पातकमाशु नाशं प्रयाति तं त्र्यम्बकमीशमीडे ॥’’

आपल्या पदस्पर्शाने पवित्र झालेल्या साह्यपर्वताच्या ब्रह्मगिरीशिखरावर गोदावरी उगम पावली आहे ती आपल्याच कृपेने व तिच्याच तीरावर त्र्यंबकेश्वराच्या रुपानें हे भगवंता आपण वास्त्य करीत आहात. आपल्या दर्शनाने सर्व पातकांचा नाश होतो. हे त्र्यंबकेश्वरा माझा आपणास नमस्कार आहे.

त्र्यंबकेश्वराचा परिसर अत्यंत रम्यवनश्रीने नटलेला आहे त्या परिसरांतून आचार्य श्रीक्षेत्र नासिक येथे आले. आचार्य श्रीक्षेत्र नासिक येथें येताच श्रीराममय झाले. श्रीरामांच्या चरित्राचे स्मरण करीत करीत जेंव्हा पंचवटीत आले तेंव्हा त्यांची वाणी राममय होऊन प्रवाही झाली आचार्य प्रार्थना करू लागले,

राक्षस:क्षोभितो सीतया शोभितो दंडकारण्यभूपुण्यता कारणम् |
लक्ष्मणेनान्वितो वानरैःसेवितोऽगस्त्य संपुजितो राघव: पातुमाम् ||५||
पवित्रं चरित्रं विचित्रं त्वदीयं नरा ये स्मरन्त्यन्वहं रामचन्द्र ।
भवन्तं भवान्तं भरन्तं भजन्तो लभन्ते कृतान्तं न पश्यन्त्यतोऽन्ते ॥ १६ ॥
प्रचण्डप्रतापप्रभावाभिभूतप्रभूतारिवीर प्रभो रामचन्द्र ।
बलं ते कथं वर्ण्यतेऽतीव बाल्ये यतोऽखण्डि चण्डीशकोदण्डदण्डः ॥ १८ ॥

सदा राम रामेति रामामृतं ते सदाराममानन्दनिष्यन्दकन्दम् ।
पिबन्तं नमन्तं सुदन्तं हसन्तं हनूमन्तमन्तर्भजे तं नितान्तम् ॥ २० ॥
प्रसीद प्रसीद प्रचण्ड प्रताप प्रसीद प्रसीद प्रचण्डारिकाल |
प्रसीद प्रसीद प्रपन्नानुकम्पिन् प्रसीद प्रसीद प्रभो रामचंद्र ||२८||

- आचार्य श्रीरामांची मूर्ती जणू अंत:करणात कोरावी तसे म्हणू लागले, "राक्षसांवर भयंकर क्षोभणाऱ्या पण सीतेसह शोभून दिसणाऱ्या, क्षणभरही लक्ष्मणाला नजरे आड होऊ न देणाऱ्या, दंडकारण्य पावन करणाऱ्या, युद्धांत वानरांची मदत घेणाऱ्या, अगस्तीसारख्यांनाही वंदनीय असणाऱ्या हे प्रभू रामचंद्र मजवर प्रसन्न व्हा!

- प्रभो आपले आश्चर्यकारक चरित्र आम्हाला पवित्र करणारे आहे. नित्य स्मरण करणाऱ्यांना जन्ममृत्युच्या चक्रातून सोडवणारे आहे. नित्य स्मरण करणाऱ्यांना यमाची बाधाच होऊ न देता तुझी प्राप्ती करून देणारे आहे.

- हे प्रभो आपल्या प्रचंड पराक्रमाचे व सामर्थ्याचे वर्णन करणे फार कठीण आहे. बलाढ्य राक्षसांचा लीलया पराभव करून तूं त्यांचा नाश केलास. इतकेच काय पण बालवयातच तूं शिवधनुष्य मोडले आहेस.

- हे प्रभो उत्तम दंतपंक्ती असलेला, सुहास्यवदन हनुमंत सदैव "रामनामामृताचे" प्राशन करीत तुला वंदन करीत असतो. अशाप्रकारे तुझ्या सारख्या निर्गुण आनंदकंदांत रमलेल्या हनुमंताला माझे वंदन असो.

- प्रचंड शत्रूंचा काळ असलेल्या हे महापराक्रमी प्रभो माझ्यावर प्रसन्न व्हा, कारण आपण शरणागतावर दया करणारे आहात. हे प्रभुरामचंद्रा, माझ्यावर कृपा करा. मला प्रसन्न व्हा! मला प्रसन्न व्हा! मला प्रसन्न व्हा!

असा त्रिवार उच्चार करून भावपूर्ण प्रार्थना करणारे आचार्य तटस्थ झाले. चित्सुखाचार्य त्यांच्या भावाशी समरस झाले. इतर शिष्यही त्यात सामील झाले. कारण

आचार्यांची प्रार्थना अंत:करणापासून आलेली होती. पांडित्य वा बुद्धिविलासातून उद्भवलेली नव्हती. आचार्यांचा शब्दन् शब्द भक्ति, श्रद्धा व भाव ह्यांनी ओथंबलेला होता. भक्ती अव्यभिचारी होती व श्रद्धा दृढ होती तर भाव समरसतेचा होता. त्यामुळे त्या प्रार्थनेचा परिणाम दर्शनाला आलेल्या इतर नागरिकांवर झालाच. आचार्यांची प्रवचने लोकांना मोहून टाकू लागली. महाराष्ट्रांत आचार्यांची विजय पताका उंचावली. सनातनधर्म लोकांना समजू लागला. शिष्यपरिवार भराभर वाढू लागला. आचार्यांच्या स्तोत्रांच्या नकला भराभर उतरल्या जाऊ लागल्या. वैचारिक संघर्षाला तिलांजली मिळाली. कुतर्काची जागा श्रुती-स्मृतींच्या विचारांनी व आचार्यांच्या शिकवणुकीने घेतली. अनेक गृहस्थी लोक आचार्यांना शरण गेले. आचार्यांनी त्यांना संसारांत राहूनही परमार्थ कसा साधायचा ह्याचे मार्गदर्शन केले. भगवंताची प्राप्ती हीच सर्व सौख्याची गुरुकिल्ली असल्याचे पटवून दिले.

अशा प्रकारे मार्गक्रमणा करीत करीत आचार्य भीमाशंकर ह्या ज्योतीर्लींगाच्या दर्शनास आले. भीमाशंकराचे मंदिर डोंगरांच्या मध्ये पण डोंगराच्या पायथ्याशी असल्यामुळे गर्दवनश्रीने नटलेल्या रम्य वातावरणात असल्याने आचार्य रमले. भगवान् शिवांचा अवतार असलेल्या आचार्यांचे भीमाशंकरच्या लोकांनी अभूतपूर्व स्वागत केले. अनेकांनी आचार्यांचा अनुग्रह घेतला. आचार्यांची अत्यंत सोपी पण परमेश्वराशी जवळीक साधणारी जिव्हाळ्याची भाषा आचार्य भीमाशंकराची प्रार्थना करताना लोकांनी प्रत्यक्ष ऐकली, भीमाशंकरापुढें हात जोडून आचार्य म्हणत होते,

यं डाकिनिशाकिनिकासमाजे निषेव्यमाणं पिशिताशनैश्च ।

सदैव भीमादिपदप्रसिद्धं तं शङ्करं भक्तहितं नमामि ॥

- डाकिनी व शाकिनी ह्या स्त्री पिशाच्चांच्या कोंडावळयात असलेल्या व पुरुषपिशाच्च्यांसह राक्षसांची सेवा घेणाऱ्या, भक्तांचे सदैव कल्याण करण्यांत तत्पर असणाऱ्या, महाकाय म्हणून संबोधल्या जाणाऱ्या हे भगवान् शंकरा मी आपणास नमस्कार करतो.

आचार्यांनी केलेल्या भगवान् शिवांच्या सर्व स्तोत्रांच्या नकला चित्सुखाचार्य यांच्या जवळच्या स्तोत्रसंग्रहातून लोकांनी उतरून घेतल्या. आचार्यांचा भावपूर्ण व सशास्त्र भक्तिमार्ग त्या भागात झपाट्याने पसरू लागला. आचार्य कृतार्थतेने तेथून निघाले.



प्रकरण २९ वे

# हरीहरचा प्रसंग

आचार्यांच्या चालण्याचा वेग आश्चर्यचकित करणारा होता. महाराष्ट्रातील तीर्थे करीत करीत ते करवीरला आले. करवीरला अंबाबाईचे दर्शन घेऊन कर्नाटकात प्रवेशले. बेळगाव वरून थेट हरीहरला आले. हरीहरला प्रसिद्ध असलेल्या श्रीविष्णु मंदिरांत आले. बरोबर भरपूर मोठा शिष्य परिवार होता. रुद्राक्ष धारण केलेल्या भस्मांकित त्रिपुंड्र मस्तकी असलेल्या तेज:पुंज आचार्यांना पाहून मंदिराचे व्यवस्थापक पुजारी गडबडले. त्यांनी गर्भागाराचा दरवाजा अडवून धरला. भस्मांकित तनु व रुद्राक्ष धारण केलेले हे शैव इथें कुठें आले? आचार्य जवळ येतांच व्यवस्थापक पुजाऱ्याने आचार्यांना सांगितले हे “शिवमंदिर “नाही ! आपणास प्रवेश मिळणार नाही. ” आचार्य म्हणाले, “हरी आणि हर दोन्ही ईश्वराचेच अवतार आहेत. मग आपण प्रतिबंध कां बरे करता?” इतक्यांत तिथे आजूबाजूला जे स्थानिक विद्वान होते ते पुढें सरसावले. त्यांतील एकजण पुजारी व्यवस्थापकाची बाजू घेत म्हणाला, “अहो! पूर्वापार फक्त आम्ही वैष्णवलोकच इथे येतो. हरी आणि हर हे जर दोन्ही ईश्वराचेच अवतार आहेत तर मग इथें येण्याचा आग्रह कशाला? दुसऱ्या म्हणजे हराच्या मंदिरांत जा!” आचार्य सुहास्य पण गंभीर वदनाने म्हणाले, “आपल्याला जर हरी-हर यांच्यात भेद नाही हे मान्य आहे तर मग विरोध कशाला? मला इथें दर्शन मिळावे अशी इच्छा आहे. मंदिर कोणतेही असो ते ईश्वराचेच नां? अहो, “ नभूमीर्नचापो न वह्निर्न चकाशमास्ते न तन्द्रा न निद्रा | न चोष्णं न शीतं न देशो न वेषो न यस्यास्ति मूर्तिस्त्रिमूर्ति त मिडे |” अर्थात “पृथ्वी, आप, तेज,वायू व भूमी हि पंचमहाभूते नाहीत, जागृती अथवा निद्रा नाही, शीत-उष्ण हे द्वंद्व नाही, व्यापकत्वामुळे देश नाही व निराकार असल्यामुळें वेषही नाही. जो निरावयव असल्यामुळें मूर्त नसला तरी ब्रह्मा, विष्णू व महेश अशा ईश्वरीय रूपाने त्रिमूर्ती अशा शंकराची मी स्तुति करतो. आपण

ज्यांना विष्णू म्हणता त्यांना वंदन करण्यास आपण मला कां प्रतिबंध करता आहात? मला वाटते आपण हा भेद मनातून काढून टाकावा. ”

आचार्यांच्या मधुर वाणीचा व विनयशील ज्ञानाचा प्रभाव त्यांच्यावर निश्चितच पडला. पण त्यांना त्यांची रूढी व परंपरा ह्यांचा अभिमान काही स्वस्थ बसू देईना. आचार्यांची कीर्ती त्यांच्याही कानावर गेलेली होतीच. आज प्रत्यक्ष भेट झाल्यावर त्या विद्वान ब्राह्मणांना गोंधळल्यासारखे झाले खरे. व्यवस्थापक पुजाऱ्याने चक्क दार लावून घेतले. इतर ब्राह्मणांबरोबर तो वादासाठी पुढे सरसावला आणि म्हणाला, “ अहो जर शिव आणि विष्णू एकच असते तर शिवमंदिर वेगळे आणि विष्णुमंदिर वेगळे स्थापन करण्याचे कारणच आपल्या पूर्वजांना पडले नसते! हे आहे विष्णुमंदिर, इथें शिवपंथाच्या लोकांचे काय काम? त्यांनी शिवमंदिरांत जावे. त्यांना तिथें विष्णुच नाही कां दिसणार? उगाच आमच्या परंपरा मोडण्याचा हा आग्रह कशाला?” थोडे थांबून पुढें म्हणाला, “जर तुम्ही आम्हाल असे पटवून दिलेत कीं भगवान् विष्णू व शिव ह्यांच्यांत भेद नाही तर आम्ही आपणास सन्मानाने आंत दर्शनास घेऊन जाऊ!” इतके बोलून इतर विद्वानांच्याकडे त्याने दृष्टीक्षेप टाकला. पुजारी ब्राह्मणाच्या ह्या बोलण्याला सर्वांनी मानेने दुजोरा दिला. त्याची कल्पना अशी कीं विष्णू हे विष्णूच ते शिव कसे असू शकतील? भेद नाही हे पटवणे सोपे थोडेच आहे? आणि त्यांतून आपल्या ज्ञानांत भर पडली तर पुजारी म्हणतात ते सरळ मान्य करायचे. म्हणजे आपल्यावर काहीच जबाबदारी नाही. एवढा तेजस्वी पुरुष आपण तरी कुठे बघायला जाणार होतो? अनायासे ते स्वत:च इथे आलेले आहेत. आपणच आधी बोलावे मग त्यांनी सांगावे अशा विचाराने एका ज्येष्ठ ब्राह्मणाने बोलायला सुरुवात केली. तो अत्यंत विनयाने आचार्यांना म्हणाला, “आचार्य आम्ही विष्णूभक्त आहोत. भगवान् व्यासांचे असे म्हणणे आहे कीं ‘एको विष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्यनेकशः ।

त्रींल्लोकान्व्याप्य भूतात्मा भुङ्क्ते विश्वभुगव्ययः ॥“एकमात्र भगवान् विष्णू हे महत्स्वरूप आहेत. तिन्ही लोक त्यांनीच व्यापले आहेत. विविध भुते त्यांनीच व्यापलेली आहेत. म्हणून शिव हे त्यांच्या पासूनच उत्पन्न झाले आहेत मग विष्णू व शिव ह्यांच्यात अनुक्रम भेद हा राहणारच नां? तो कसा बरे अमान्य करता येईल?” इतके बोलून तोज्येष्ठ

ब्राह्मण थांबला. आतां आचार्य काय बोलतात हे ऐकण्याची उत्सुकता सर्वांनाच निर्माण झाली.

आचार्य प्रसन्न व मधुर वाणीने म्हणाले, “हे द्विजश्रेष्ठा आपले म्हणणे मला आवडले. आपली श्रीव्यासमहर्षींवर असलेली अपूर्व निष्ठा पाहून मला आनंदच झाला आहे. ह्याचा अर्थ श्रीविष्णुसहस्रनाम आपण प्रमाण मानता असे मी समजतो. ते बरोबर आहे नां?”

आचार्यांच्या ह्या प्रश्नावर पुजाऱ्यानेच पुढाकार घेऊन “हो! हो! अगदी प्रमाण मानतो. सकाळ, दुपार व संध्याकाळ असा त्रिकाळ “श्रीविष्णुसहस्रनाम” म्हणण्याचा आमचा परिपाठ आहे. ”

आचार्य म्हणाले, “आपण जर श्रीविष्णुसहस्रनाम प्रमाण मानता तर भगवान् श्रीविष्णुंनाच शिव, महादेव व रुद्र असे म्हणतात असे आपण कां बरे मान्य करीत नाही? विबुध हो भगवान् महर्षी व्यासांनीच आपणास हा अभेद शिकवला आहे. भगवान् व्यासच श्रीविष्णुसहस्रनामात भगवान् विष्णु म्हणजेच शिव, रुद्र व महादेव असल्याचे म्हणतात. ऐका,

सर्वः शर्वः शिवः स्थाणुर्भूतादिर्निधिरव्ययः ।
सम्भवो भावनो भर्ता प्रभवः प्रभुरीश्वरः ॥
रुद्रो बहुशिरा बभ्रुर्विश्वयोनिः शुचिश्रवाः ।
अमृतः शाश्वत स्थाणुर्वरारोहो महातपाः ॥
गभस्तिनेमिः सत्त्वस्थः सिंहो भूतमहेश्वरः ।
आदिदेवो महादेवो देवेशो देवभृद्गुरुः ॥

विबुध हो! आतां आपल्या लक्षांत येईल कीं ही दोन्ही रूपे एका ईश्वराचीच असल्याचे भगवान् श्रीव्यासांचे सांगणे आहे. मग अनुक्रम भेद तरी कसा मानावा? विबुध हो, आपणच “एको विष्णुर्महद्भूतं” असे म्हणताना संपूर्ण विश्वच अखंडतेने व अभेदाने मान्य करता हे कसे बरे विसरता. हे मंत्र, हे शास्त्र, हे वेद हे सर्व ईश्वराचे अभेदत्व, अखंडत्व जाणण्यासाठीच निर्माण केले गेले आहेत. ते पण ईश्वराच्याच प्रेरणेने. ” इतके बोलून

आचार्य थांबले. आचार्यांनी क्षणभरांत विविध श्लोकांचा जो संदर्भ दिला त्यामुळें आचार्यांच्या तीव्र स्मरण शक्तीची व तल्लख बुद्धिमत्तेची जाणीव त्या सर्व विद्वानांना झाली. पण म्हणून काही त्यांनी लगेच दरवाजा उघडला नाही. त्यांतल्या एका सूज्ञ ब्राह्मणाने विनयाने विचारले, “मग प्रश्न असा येतो कीं पूर्वापार ज्या प्रथा आजतागायत चालत आल्या त्या चुकीच्या आहेत कां?”

आचार्य म्हणाले, “प्रथा आहे ती फार वेगळी आहे. प्रथा अशी आहे कीं विष्णुभक्त विष्णुमंदिरांत जाऊ लागले. शिवभक्त शिवमंदिरांत जाऊ लागले. जो तो आपले आराध्यदैवत श्रेष्ठ मानून उपासना करू लागला. दोघांचे मार्ग उपचारभेदाने वेगळे झाले. त्यांत ज्यावेळी ज्याला कोणाला अनुभूती आली तो श्रेष्ठ वैष्णव अथवा श्रेष्ठ शैव मानला गेला. मग तीच परंपरा जोपासण्यात पिढ्यानपिढ्या जाऊ लागल्या. त्यामुळें अकारणच वैष्णव शिवमंदिरांत न जाण्यानें व शैव विष्णुमंदिरांत न जाण्याने प्रथा पडली. त्याचेच हे आज मला विरोध करून प्रवेश नाकारण्यात रुपांतर झालेले आहे. ह्यांत चूक अथवा बरोबर असे काही नाही. सर्वात महत्वाचे असे कीं रूढीप्रीयतेमुळे व परंपरा जोपासण्याच्या मानवी संवयीमुळे घडणाऱ्या घटनांच्या आधारे काही प्रथा पडल्या तर त्याचा विचार श्रुति, स्मृति इत्यादी मार्गदर्शक तत्त्वदर्शी वाङ्मयाद्वारे, स्तोत्राद्वारे जरूर करावा. सामुहिक सहजीवन सुखावह, सहकारमय, द्वेष व मत्सर रहित जीवनासाठी त्याची नितांत आवश्यकता आहे. ” इतके बोलून आचार्य थांबले. लोक त्यांच्या ह्या प्रभावी भाषणाने चांगलेच आकर्षित झाले होते. ह्या दिशेने त्यांनी कधी विचारच केला नव्हता. त्यांतही आचार्यांच्या बोलण्यातले वैशिष्ट्य विद्वानांना विशेष जाणवले ते म्हणजे आचार्य कुणालाच दोष न देता विचारांची दिशा दाखवत आहेत. सर्वांनाच त्यांची विचारसारणी निर्दोष वाटत होती. काहीच कारण नसताना आपण केवळ आपल्या पूर्वग्रहांच्या ‘शैव इकडे न फिरकण्यामुळे’ काहीशा तेढी मुळे जो विरोध प्रदर्शित केला तो चुकीचाच आहे हे नक्की. तसा त्या विरोधाला काहीच अर्थ नाही. हे त्यांच्या ध्यानात येताच मुख्य पुजाऱ्याने सरळ दरवाजा उघडला आणि त्यांच्या व इतरांच्या आश्चर्याला पारावर उरला नाही. कारण इतके दिवस व काही वेळापूर्वी पर्यंत असलेली भगवान्

श्रीविष्णूंची मूर्ती चक्क अर्धी भगवान् श्रीविष्णूंची व अर्धी भगवान् श्रीशिवशंकरांची झालेली होती. इकडे पाहतात तों आचार्यांनी शांतपणे डोळे मिटून ध्यान धरल्याचे दिसले. मुख्य पुजाऱ्याने आचार्यांची तंद्री भंग करण्यासाठी मृदूस्वरांत 'आचार्य' म्हणून हाक मारली. आचार्यांनी आपले कमलनयन उघडले. मुख्यपुजाऱ्यासह इतर ब्राह्मणांनी आचार्यांना वंदन केले. म्हणाले, 'चला! अत्यंत सन्मानाने चला! प्रभो, आपले सामर्थ्य, आपली भक्ती व आपले ज्ञान अमोघ आहे. आम्ही अजाण व अज्ञानी आहोत. कोणत्यातरी काल्पनिक पूर्वग्रहदूषिततेमुळे आमच्याकडून अपराध घडला आहे. आपण आम्हाला क्षमा करावी. आपला तो अधिकार आहे. आम्ही स्वत:च्या अहंकारामुळे आपला अधिकार जाणू शकलो नाही. प्रत्यक्ष भगवान् श्रीविष्णूंनीच आतां हरीहराचे रूप धारण करून आपले बोलणे सत्य केले आहे. आपण इथें आलात हे आमचे परमभाग्य म्हणावे लागेल. आपला जयजयकार असो. " आचार्य प्रसन्नच होते. त्यांना कोणताच राग नव्हता. मानवी स्वभावाची त्यांना पूर्ण कल्पना होती. जनातले अज्ञान व कार्मठ्य दूर करण्यासाठीच तर ते परिभ्रमण करीत होते. त्यांनी अत्यंत प्रेमाने सर्व ब्रह्मवृन्दावर नजर फिरवली. हात उंचावून आशीर्वाद दिला. ब्रह्मवृंद आनंदाने 'स्वस्तिमंत्रा'चा घोष करू लागले. वातावरण बदलले. निर्मल व पवित्र मनाने ईश्वराभिमुख झालेल्या अनेकांनी त्याच वेळी आचार्यांचा अनुग्रह प्राप्त करून घेतला. तो सगळा सोहळा पार पडल्यावर आचार्यांनी भगवान् श्रीहरीची स्तुती केली.

स्तोष्ये भक्त्या विष्णुमनादिं जगदादिं यस्मिन्नेतत्संसृतिचक्रं भ्रमतीत्थम् ।
यस्मिन् दृष्टे नश्यति तत्संसृतिचक्रं तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १॥

यस्यैकांशादित्थमशेषं जगदेतत् प्रादुर्भूतं येन पिनद्धं पुनरित्थम् ।
येन व्याप्तं येन विबुद्धं सुखदुःखैस्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २॥

सर्वज्ञो यो यश्च हि सर्वः सकलो यो यश्चानन्दोऽनन्तगुणो यो गुणधामा ।

यश्चाऽव्यक्तो व्यस्तसमस्तः सदसद्यस्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३॥

पश्यत्र शुद्धोऽप्यक्षर एको गुणभेदान् नानाकारान् स्फाटिकवद्भाति विचित्रः ।
भिन्नश्छिन्नश्चायमजः कर्मफलैर्यस्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १७॥

ब्रह्मा विष्णू रुद्रहुताशौ रविचन्द्राविन्द्रो वायुर्यत्र इतीत्थं परिकल्प्य ।
एकं सन्तं यं बहुधाहुर्मतिभेदात् तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १८॥

आचार्यांनी केलेल्या श्रीहरीच्या स्तुतित आचार्यांच्या बोलण्यातलेच सर्व सार रूपाने प्रकटलेले पाहून सर्व विद्वान वैदिकांना अपूर्व आनंद झाला. एक नवीन दृष्टी त्यांना मिळाली. त्यांनी भराभर आचार्यांच्या हरिमिडे स्तोत्राच्या नकला करून घेतल्या. त्या त्यांनी विष्णुसहस्त्रनामा इतक्याच पवित्र मानल्या. त्या नंतर आचार्यांनी तिथेच म्हटलेल्या भगवान् श्रीविष्णुभुजंग स्तोत्राच्याही नकला उतरून घेतल्या. आचार्यांच्या प्रखर वैराग्याचा सर्वांवर जबरदस्त प्रभाव पडला. नित्याच्या प्रार्थनेत विष्णुभुजंग स्तोत्र गायले जाऊ लागले. भुजंगप्रयातात असलेली ही रचना अत्यंत हृद्य आहे. त्यांत भगवान् श्रीविष्णूंच्या सूक्ष्म व सर्वव्यापकत्वाची कल्पना अत्यंत सहजतेने आचार्यांनी लोकांच्या मनावर बिंबवली आहे.

॥ श्रीविष्णुभुजङ्गप्रयातस्तोत्रम् ॥
चिदंशं विभुं निर्मलं निर्विकल्पं निरीहं निराकारमोङ्कारगम्यम् ।
गुणातीतमव्यक्तमेकं तुरीयं परं ब्रह्म यं वेद तस्मै नमस्ते ॥ १॥
विशुद्धं शिवं शान्तमाद्यन्तशून्यं जगज्जीवनं ज्योतिरानन्दरूपम् ।
अदिग्देशकालव्यवच्छेदनीयं त्रयी वक्ति यं वेद तस्मै नमस्ते ॥ २॥

महायोगपीठे परिभ्राजमाने धरण्यादितत्त्वात्मके शक्तियुक्ते ।
गुणाहस्करे वह्निबिम्बार्धमध्ये समासीनमोङ्कर्णिकेऽष्टाक्षराब्जे ॥ ३॥

समानोदितानेकसूर्येन्दुलोटि- प्रभापूरतुल्यद्युतिं दुर्निरीक्षम् ।

न शीतं न चोष्णं सुवर्णावदात- प्रसन्नं सदानन्दसंवित्स्वरूपम् ॥ ४॥

सुनासापुटं सुन्दरभ्रूललाटं किरीटोचिताकुञ्चितस्निग्धकेशम् ।
स्फुरत्पुण्डरीकाभिरामायताक्षं समुत्फुल्लरत्नप्रसूनावतंसम् ॥ ५॥

लसत्कुण्डलामृष्टगण्डस्थलान्तं जपारागचोराधरं चारुहासम् ।
अलिव्याकुलामोलिमन्दारमालं महोरस्फुरत्कौस्तुभोदारहारम् ॥ ६॥

सुरत्नाङ्गदैरन्वितं बाहुदण्डै- श्चतुर्भिश्चलत्कङ्कणालङ्कृताग्रैः ।
उदारोदरालङ्कृतं पीतवस्त्रं पदद्वन्द्वनिर्धूतपद्माभिरामम् ॥ ७॥

स्वभक्तेषु सन्दर्शिताकारमेवं सदा भावयन्संनिरुद्धेन्द्रियाश्वः ।
दुरापं नरो याति संसारपारं परस्मै परेभ्योऽपि तस्मै नमस्ते ॥ ८॥

श्रिया शातकुम्भद्युतिस्निग्धकान्त्या धरण्या च दूर्वादलश्यामलाङ्ग्या ।
कलत्रद्वयेनामुना तोषिताय त्रिलोकीगृहस्थाय विष्णो नमस्ते ॥ ९॥

शरीरं कलत्रं सुतं बन्धुवर्गं वयस्यं धनं सद्म भृत्यं भुवं च ।
समस्तं परित्यज्य हा कष्टमेको गमिष्यामि दुःखेन दूरं किलाहम् ॥ १०॥

जरेयं पिशाचीव हा जीवतो मे वसामक्ति रक्तं च मांसं बलं च ।
अहो देव सीदामि दीनानुकम्पि- न्किमद्यापि हन्त त्वयोदासितव्यम् ॥ ११॥

कफव्याहतोष्णोल्बणश्वासवेग- व्यथाविस्फुरत्सर्वमर्मास्थिबन्धाम् ।
विचिन्त्याहमन्त्यामसङ्ख्यामवस्थां बिभेमि प्रभो किं करोमि प्रसीद ॥ १२॥

लपन्नच्युतानन्त गोविन्द विष्णो मुरारे हरे नाथ नारायणेति ।
यथानुस्मरिष्यामि भक्त्या भवन्तं तथा मे दयाशील देव प्रसीद ॥ १३॥

भुजङ्गप्रयातं पठेद्यस्तु भक्त्या समाधाय चित्ते भवन्तं मुरारे ।
स मोहं विहायाशु युष्मत्प्रसादा- त्समाश्रित्य योगं व्रजत्यच्युतं त्वाम् ॥ १४॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यस्य श्रीगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य श्रीमच्छङ्करभगवतः कृतौ श्रीविष्णुभुजङ्गप्रयातस्तोत्रं सम्पूर्णम् ॥

आचार्य म्हणतात,

- निर्गुण, सर्वव्यापी, पवित्र, भेदशून्य, निरिच्छ, निराकार तरीही ॐकाराच्या यथार्थ चिंतनाने अनुभवास येणाऱ्या, गुणांच्या अतित व अव्यक्त असूनही जागृती, स्वप्न व सुषुप्ती, ह्या जीवांच्या अवस्थांचे साक्षी (तुरीयं) असणाऱ्या भगवान् श्रीविष्णूंना मी जाणीवपूर्वक नमस्कार करतो. १.

- परमशुद्ध, शिवस्वरूप, शांत, आदी व अंत नसणाऱ्या, जगज्जीवन असणाऱ्या सत्, चित्, आनंदरूपाने देश,काल, दिशा व वस्तूसह सर्वव्यापी अखंड, सर्वकाली (म्हणजे भूत-भविष्य नसलेला) सूर्यसापेक्ष दिशांचे बंधन नसलेला असे वेदांनी वर्णन केलेल्या भगवान् श्रीविष्णूंना मी वंदन करतो. २.

- (बद्रीनाथ, बद्रिकेदार, पंढरपूर इत्यादी) महायोगपिठांत आपल्या उज्वल तेजाने राहाणाऱ्या, अपन्चीकृत पंचमहाभूतांसह सर्व शक्तींसह असणाऱ्या महाविष्णुंचे नाभीपासून हृदयापर्यंतच्या (वह्निमंडळात) प्रदेशांत अष्टदलयुक्त कमलासनांत त्रिगुण प्रकाशात्मक ध्यान करू या. ३.

- एकाच वेळी उदय पावलेल्या कोट्यावधी सूर्यांच्या तेजासम व कोटी चंद्रासम शीतल कांती भगवान् श्रीविष्णूंची आहे. तिथें नजर स्थर होणे फार कठीण आहे असे असूनही त्यांचे तेज ना उष्ण ना थंड असे आहे. जणू शुद्ध बावनकशी सोनेच. खरे तर प्रसन्न व तेजस्वी, आनंद व ज्ञान हेच त्यांचे स्वरूप आहे. ४.

- अत्यंत देखणे नाक व नाकपुड्या, रेखीव भुवया, भव्यकपाळ, मस्तकावर तेजस्वी मुकुट, त्याखाली रुळणारे स्निग्ध काळेकुरळे केस, उमलत्या कमलासम नेत्र, कानांत व गळयांत तेज:पुंज रत्नाभरणे इत्यादींनी भगवान् श्रीविष्णू अत्यंत मनोहर दिसत आहेत. ५.

- कर्णकुंडलांची प्रभा दोन्ही गालावर पसरली आहे. जास्वंदीच्या फुलात असलेल्या आरक्तवर्णाचे ओठ मंदस्मिताने अत्यंत मनोहर दिसत आहेत. गळयांत धारण केलेल्या कल्पवृक्षाच्या फुलांच्या सुगंधाने वेडावलेले भ्रमरांचे थवे त्या हारा भोवती रुंजी घालीत आहेत. कंठात कौस्तुभमणी व छातीवर दिव्य रत्नहार शोभत आहेत. ६.

- भगवान् श्रीविष्णूंच्या दंडावर अंगद नामक बाहू भूषण असून त्यांत विविध दिव्य रत्ने जडलेली आहेत. मनगटावर सतत चमकणारी चार सुवर्ण कंकणे आहेत. त्यांचे पोट त्रीवळींनी अत्यंत आकर्षक दिसत असून त्यांनी दिव्य पितांबर धारण केलेला आहे. उभय चरण इतके कोमल आहेत कीं कमळालाही इतकी कोमलता नाही. ७.

- श्रद्धा व भाव यांसह निरपेक्ष उपासना करणाऱ्या स्वत:च्या भक्तांसाठी ते कधीच विन्मुख नसतात. शमाने मन व दमाने इंद्रिये ज्यांनी विषयदूर सारून त्यांच्या चरणी भाव धारण केला आहे त्यांना दुस्तर भवसागर हसत खेळत पार करून देणारे सूक्ष्मातील सूक्ष्म व विशालातील विशाल असणाऱ्या भगवान् श्रीविष्णुंना माझा नमस्कार असो. ८.

- हे महाविष्णो! आपणास लक्ष्मी सारखी मऊमुलायम कांती असलेली शांत पत्नी व पृथ्वी सारखी दुर्वांकुरांनी सुशोभित काळी-सावळी दुसरी पत्नी आहे. या दोघींमुळे आपण सदैव संतुष्ट असता. अशा त्रैलोक्यांतल्या सर्वश्रेष्ठ गृहस्थाला माझे सदैव नमस्कार असोत. ९.

- हे प्रभो! हे महाविष्णो, मी गृहस्थ आहे खरा पण माझी स्थती आपल्यासारखी नाही. मला माझे शरीर, माझी पत्नी, माझी मुले, नातलग, मित्र, संपत्ती, घर-दार, नोकर-चाकर व हे जग खरे वाटते व त्यांतच मन गुंतले आहे. ते सर्व सोडण्याची कल्पनाही दुःख देते, पण मृत्यूनंतर दूर कुठेतरी अज्ञातात जाण्यापूर्वीच हे प्रभो मला आपला आश्रय द्या व या मोहातून माझी सुटका करा. १०.

- जरा नामक पिशाच्च माझ्या मागे लागलेले आहे. हे पिशाच्च रोजच माझ्या शरीरातील धातू, रक्त, मांस इत्यादी थोडे थोडे करून खात आहे. माझी शक्ती नष्ट करीत आहे. हे प्रभो आपण दीनांचे दयाळू आहात. मी दैन्यामुळे थरथरा कांपत असून आपण माझ्याकडे दुर्लक्ष करू नका. ११.

- हे प्रभो! मला मृत्यू समीप आल्याचे चांगलेच जाणवू लागले आहे. कफ वाढला आहे. त्याने नाड्या व्यापून पित्ताचा प्रवाहच खुंटला आहे. त्यामुळे दमा लागल्यासारखे झाले आहे. मर्मस्थाने व अस्थीबंधने वेदनांनी व्याप्त झाली आहेत. ह्या व्याधींच्या भयाने मी त्रस्त झालो आहे. हे प्रभो! ह्या देह-तादात्म्यापासून कृपाकरून तूच मला मुक्त कर. एवढी कृपा मजवर करच. १२.

- हे महाविष्णो! हे अनंता, हे गोविंदा, हे मुरारे, नाथ, नारायणा, अशा मी तुला सारख्या हांका मारीत आहे. मुखांत येईल ते नाम उच्चारीत आहे. तूं अत्यंत दयाळू आहेस रे! तूं माझ्यावर अशी कृपा कर कीं तुझे मला सतत स्मरण राहील. माज्यावर प्रसन्न हो. १३.

- भुजंगप्रयातांत रचलेले हे स्तोत्र जो आपले चित्त भगवान् श्रीविष्णु ह्यांच्याशी एकरस करून भक्तिभावाने म्हणेल तो देहतादात्म्यते पासून सुटेल. जगाच्या सत्यतवापासून, स्वकर्तृत्वा पासून व भोक्तृत्वापासून सुटेल. तुझ्या प्रसादाने तुझ्याशी तो एकरूप होऊन मुक्त होईल. १४.

आचार्य ज्याप्रकारे एकाग्र होऊन भगवान् श्रीविष्णुंना आळवीत होते ते पाहून अनेकांचे नेत्र पाणावले. त्यांना ही प्रार्थना म्हणजे स्वतःच केलेली प्रार्थना वाटली. आचार्य कर्मठ नसून कर्मनिष्ठ भक्तीमार्गी असून भक्तिमार्गाचा पुरस्कार करीत आहेत हे त्यांनी जाणले. त्यांनीही तोच मार्ग आचरण्याचा निश्चय करून आचार्यांचा अभूतपूर्व असा सत्कार केला. सर्वांचा प्रेमळ निरोप घेऊन आचार्य हरिहरहून निघाले.



प्रकरण ३० वे

# श्रृंगेरीस मठ स्थापना

आचार्यांना आतां तुंगभद्राकाठी उभारलेल्या सरस्वती मंदिराची ओढ लागली. ज्या स्थानी शारदामाता गुप्त झाली होती त्या शृंगेरीला आचार्य आले. आपल्या शिष्यपरिवारासह आचार्य शृंगेरीस राहिले. ‘शारदा मंदिर’ इथेच स्थापन केले होते. त्याचे सुशोभिकरण आचार्यांच्या देखरेखीखाली झाले. तुंगभद्रा म्हणजे तुंगा आणि भद्रा या दोन नद्यांचा संगम होऊन त्या दोघी एकत्र आल्या म्हणून पुढे तिला तुंगभद्रा असे म्हणू लागले. शृंगेरीचा हा संगम अपूर्व निसर्ग सान्निध्यामुळे फारच रम्य आहे. सरस्वतीच्या वास्तव्यामुळे अध्यात्मिक तेज त्यांत भरले गेले आहे. त्यामुळें रम्य निसर्ग, शारदा मंदिर व अध्यात्मिक तेज ह्या त्रिवेणी संगमाच्या पार्श्वभूमीवर आचार्यांना चौथा माठ स्थापन करण्याची प्रेरणा झाली. त्यांनी चवथ्या धर्मपिठाची इथे स्थापना केली. त्याचप्रमाणें भगवान् शिवांकडून प्राप्त झालेल्या ५ शिवलिंगांपैकी ‘भोग’ लिंगाची स्थापना शृंगेरीत केली. शृंगेरीमठाचे प्रमुख म्हणून आचार्यांनी हस्तामलकाचार्यांची नेमणूक केली. आचार्य शृंगेरीला बराच काल थांबले. आचार्यांनी इथल्या वास्तव्यात आजवर स्थापन केलेल्या धर्मपिठांचा आढावा घेतला.

आचार्यांची दृष्टी अत्यंत विशाल होती. वैदिक परंपरा जोपासताना सर्व सामान्य गृहस्थापासून ते वेदज्ञ व तंत्रज्ञ ह्या सर्वांचा अत्यंत सखोल विचार त्यांनी केला. प्रखर बुद्धिवादीसुद्धां त्यांच्या भाव व भक्ती ह्यांच्याकडे आकर्षित झाले. ह्याचे मुख्य कारण म्हणजे आचार्यांची अहंकारशून्य वृत्ती. स्वत: पूर्ण विरक्त. त्यांचा संग्रह म्हणाल तर फक्त ईश्वरप्रेमाचा. भौतिकातल्या कोणत्याच वस्तूची त्यांना कधीच आसक्ती नव्हती. वृत्तीत क्षमाशीलता इतकी खोलवर रुजलेली होती कीं प्रत्येक कृती केवळ मूलभूत ईश्वरीय तत्त्व अंगीकारूनच ते करीत असत. त्यांत प्रतिक्रियेला जराही वाव नव्हता. आचार्यांच्या ह्या वास्तव्यात अहोबिलहून जगन्नाथपुरीला आपल्या मठांत गेलेले पद्मपदाचार्य शृंगेरीला आचार्यांना भेटायला आले. आचार्यांना वंदन करून पुरीच्या कार्याचा अहवाल त्यांना

सांगितला. वंग व कलिंग ह्या देशांत असलेल्या राजांनी व राज्यातील प्रतिष्ठित समाज घुरीणींनी वैदिक सनातनधर्माच्या अद्वैत मताचा स्वीकार केला आहे व धर्मपिठाला राजमान्यता प्राप्त झाली आहे. ह्याच मुक्कामात तोटकाचार्य व सुरेश्वराचार्य हे दोघेही आचार्यांच्या दर्शनास आले. त्या दोघांनी आपल्या माठातल्या कार्याबाबत आचार्यांना समग्र माहिती दिली. त्या माहितीच्या आधारे आचार्यांनी त्यांना विशाल दृष्टीकोन दिला. सामंजस्य, तारतम्य व सहानुभूती ह्यांच्या सहाय्यानेच सर्वसामान्यांना झेपेल, आचरण करता येईल अशा सोप्या भक्तिमार्गाचा उपदेश करण्या विषयी बहुमोल सूचना दिल्या. त्या नंतर आचार्य त्यांच्या जन्मगावाहून म्हणजे कालटीहून आलेल्या भक्तांची इच्छा जाणून कालटीला आपल्या मातेच्या समाधी दर्शनासाठी निघाले.



प्रकरण ३१ वे

# कालटी व त्रिवेन्द्रमला भेट

आचार्य मातेच्या निधना नंतर प्रथमच कालटीला जाण्यास निघाले होते. अनेक गावकरी शृंगेरीला आचार्यांच्या दर्शनासाठी आलेले होते. आचार्यांच्या मातेच्या निधन समयी गावकऱ्यांच्या कडून घडलेल्या वर्तनाबद्दल त्यांना आतां पश्चात्ताप होत होता व तो त्यांनी व्यक्तही केला होता. पण आचार्य परत कालटीला आपल्याकडे येतील किंवा नाही ह्या बद्दल त्यांच्या मनांत धाकधूकच होती. कारण कालटी सोडताना आचार्य चित्सुखासह जेंव्हा निघाले होते तेंव्हा गावकऱ्यांनी त्यांची दखलही घेतली नव्हती. पण आचार्यांनी ह्या भेटीत कोणत्याच गावकऱ्याला दुरान्वयानेही त्याची जाविव दिलेली नव्हती. आचार्यांनी त्यांचे अत्यंत प्रेमानेच स्वागत केले होते. त्यामुळें आपल्या वर्तनाने निर्माण झालेला कलंक धुऊन काढायचा असे मनाशी ठरवूनच आचार्यांच्या स्वागताची तयारी धुमधडाक्यात करायची त्यांनी ठरवले.

सर्वच गावकरी ह्या महात्म्याच्या दर्शनासाठी उत्सुक होते. आचार्य चार कोसावर

येतांच त्यांचे स्वागत अत्यंत भव्य जनसमुदायाने प्रचंड जयघोषात व विविध वाद्यांच्या गजरांत केले. अत्यंत शिस्तबद्ध मिरवणुकीने मंगलवाद्यांच्या गजरांत आचार्यांना फुलांनी सजवलेल्या पालखी जवळ आणले. कालटीच्या विद्वान पंडितांनी आचार्यांची पाद्यपूजा केली. सुवासिनींनी पंचारती ओवाळली. ग्रामाधिकाऱ्यानें आचार्यांना पालखीत बसण्याची विनंती केली. आचार्यांनी त्याच क्षणी एक विलक्षण कृती केली. त्यांनी पालखीत आपल्या जवळचे मोक्ष लिंग व कैलासावर प्राप्त झालेले सौंदर्यलहरीची वंदनीय पोथी ठेवली. अत्यंत विनयाने त्यावर त्यांनी पुष्पांजली अर्पण केली व भक्तिभावाने नमस्कार केला. काहीही न बोलता कोणाच्याही भावना न दुखावता आचार्यांनी पालखीचा असा सन्मान केला. ते पाहून चित्सुखाचार्य ह्यांच्या सह सर्वच गहिवरले. आचार्यांची पराकाष्ठेची विरक्ती, विनय, निरभिमानवृत्ती त्यांना आदर्श व अनुकरणीय वाटली. कालटीत आचार्य प्रथम आपल्यां मातेच्या समाधी जवळ आले.

आचार्यांच्या भावना तरल झाल्या. त्यांनी सद्गदित होऊन वंदन केले. त्यांच्या अंत:करणात जरी पूर्ण जाणीव होती कीं आपण स्वेच्छेने तिच्या उदरी अवतरलो असलो तरी आपल्या प्राप्तीसाठी व प्राप्ती नंतरही तिने केलेल्या अपार कष्टला व त्यागाला तोड नव्हती. सर्वात मोठा आघात तिने पतीनिधनाचा सोसला व नंतर आपल्या विरहाचा सोसला. पुत्राबद्दल आईच्या काय भावना असतात हे आचार्य पूर्ण जाणत होते. विद्वान वैदिक-याज्ञिक इत्यादींकांनी हळूच आपल्या उपवस्त्राने आपले डोळे टिपले.

कालटीतल्या वैदिक ब्राह्मणांनी अत्यंत सन्मानाने आचार्यांचा सत्कार केला. अनेक गृहस्थांनी आचार्यांचा अनुग्रह घेतला. आचार्य सर्वांना संतोष देत होते. एका विद्वान गृहस्थाने अनुग्रह घेतला व अत्यंत नम्रतेने विचारले , “प्रभो! मी आपल्या अनुग्रहाने धन्य झालो खरा पण मला हा योग प्राप्त झाला कीं नाही हे कसे कळेल?” ह्यावर आचार्य पटकन् आपल्या मधुरवाणीने म्हणाले, “भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाला ह्याच प्रश्नाचे उत्तर देताना उत्तरगीतेत जे सांगितले तेच आपण ध्यानात ठेवा! भगवान् श्रीकृष्ण म्हणतात.

“ज्ञानामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनः ।
न चास्ति किञ्चित्कर्तव्यमस्ति चेन्न स तत्त्ववित् ॥ २३॥”

“ज्ञानामृत प्राशनाने तृप्त होऊन आपली कर्तव्ये पार पाडण्यांत ज्याने धन्यता मिळवली आहे, त्याला ह्या विश्वांत स्वार्थ साधण्याचे काहीही कार्य उरलेले नाही. पण तसे झाले नसेल तर तो तत्त्व जाणलेला योगी नव्हे!” ह्या कालावधीत आचार्यांनी सर्वसामान्य गृहस्थी लोकांना भजनमार्ग सोपा करून सांगितला. त्यांच्या सांगण्यातल्या आत्मीयतेमुळे लोकांवर त्याचा चांगलाच प्रभाव पडला व लोक भक्तिमार्ग चोखाळू लागले. कालटीहून आचार्य वृषेश्वराच्या दर्शनासाठी वृषाचल येथे आले. शिवगुरु व आर्यांबा ह्यांनी इथेच तप करून आचार्यांची प्राप्ती करून घेतली होती. आचार्यांनी नंदिकेश्वराचे पूजन केले. भगवान् शिवांचे पूजन केले. नंतर आचार्य तिरूअनंतपुरला म्हणजेच त्रिवेंद्रम येथे आले. त्रिवेंद्रमला शेषशायी भगवान् श्रीविष्णुंचे मंदिर आहे. त्या मंदिरांत आचार्य आले. मंदिराच्या व्यवस्थापकांनी आचार्य व त्यांचा शिष्यपरिवार

यांच्या निवासाची उत्कृष्ट व्यवस्था केली. त्या भव्य मंदिरांत त्रिकालपूजे खेरीज काहीच कार्यक्रम होत नव्हते. त्यामुळें आचार्यांनी त्या व्यवस्थापकांना प्रवचनादी मार्गाने जनसामान्यांना भक्तिमार्ग समजून सांगण्याचा परिपाठ ठेवण्याचा आदेश दिला. त्यानुसार व्यवस्था झाली. धर्मजागृतीसाठी अशा गोष्टींची नितांत गरज आचार्यांनी व्यवस्थापकांना पटवून दिली. कारण मंदिराच्या व्यवस्थापकांची अशी समजूत होती कीं मंदिराचा परिसर स्वच्छ ठेवला, त्रिकाळ पूजा-अर्चा केली कीं आपली जबाबदारी संपली. त्यामुळें आचार्यांना आश्चर्यच वाटले. त्यांनी त्या व्यवस्थापकांचे स्वच्छता, नीटनेटकेपणा व पूजाअर्चा ह्या गोष्टींचे मनापासून कौतुक केले पण ह्या सर्व गोष्टी तशाच चालू ठेवण्यास सांगून त्याला अध्यात्मिक विचारांची बैठक प्राप्त करून दिली. त्यासाठी 'मनुस्मृतीतला' एक श्लोक सांगितला,

"ब्राह्मणेषु विद्वांस:विद्वसु: कृतबुद्धय: | कृतबुद्धिषु कर्तार: कर्तृष ब्रह्मवादिन: ||"

आचार्य म्हणाले, "ब्राह्मणांमध्ये विद्वान श्रेष्ठ, विद्वानांमध्ये कार्य करण्याची बुद्धि असणारे श्रेष्ठ, कार्यकरणाऱ्यांमध्यें ब्रह्मज्ञान असणारे सर्वश्रेष्ठ!" हे मनुचे मार्गदर्शक तत्त्व आपण कधी विसरता कामा नये. ह्या तत्त्वानुसार सर्वसामान्य लोकांच्या जीवनांत धर्मपालन करताना अनेक लहान मोठ्या अडचणी निर्माण होतात. त्या प्रसंगी त्यांना मार्गदर्शन हवे असते. तारतम्य वापरून शास्त्राधारे त्यांना जर मार्गदर्शन मिळाले तर धर्म जागा राहतो. धर्माची सुटसुटीत व्याख्या सांगताना आचार्य म्हणाले, "यत: अभ्युदयनि: श्रेयससिद्धि: स: धर्म: |" म्हणजे ज्या वागणुकीने इहलोकांत भौतिक समृद्धी व परलोकांत मोक्ष प्राप्त होतो त्याला धर्म म्हणावे. मंदिराच्या व्यवस्थापकांना ते मनापासून पटले.



प्रकरण ३२ वे

# कांची येथें मठस्थापना व नंतर निर्याण

त्रिवेंद्रमहून आचार्य कन्याकुमारीला आले. नंतर तीरुपल्ली, रामेश्वर इत्यादी तीर्थक्षेत्रांत दर्शन घेऊन कांचीला आले. कांचीला सर्वतीर्थ नामक सुंदर जलाशय आहे. त्याच्या तीरावर विश्वेश्वराचे भव्य मंदिर आहे. सात मोक्षदायक पुऱ्यांपैकीच हे एक क्षेत्र आहे. यथासांग पूजा करून आचार्य मुक्तीमंडपांत आले. विश्वेश्वर देवालयाचा हा मुक्तीमंडप भव्य व विस्तीर्ण आहे. कांचीच्या मुक्कामांत आचार्य आपल्या शिष्यपरिवाराला चित्तशुद्धीसाठी दररोज कामाक्षीदेवीची विधीपूर्वक पूजा करण्यास सांगत व स्वत: पूजा करीत. त्यांच्या ह्या वास्तव्यांत अनेक जणांनी अनुग्रह घेतला. त्याचवेळी कांचीचा राजा राजसेन आचार्यांच्या दर्शनास आला. त्यानें आचार्यांच्या सहवासांत काहीकाळ सत्संग केला. त्याच्यावर आचार्यांचा इतका प्रभाव पडला कीं त्याने आचार्यांचे शिष्यत्व करण्यास प्रारंभ करून त्यांना प्रसन्न करून घेतले. राजसेन राजाला आचार्यांनी अनुग्रह देऊन आपला शिष्य केले. त्यावेळी राजाने कांचीत शिव आणि विष्णू ह्यांची मंदिरे उभारण्याचा संकल्प केला. त्याप्रमाणे राजाने मंदिरे उभारून आपली नगरी मंदिरमय केली. कांचीला दक्षिणेंतील ज्ञानपीठ मानले जात असे. त्या पिठाच्या व्यवस्थापकांनी कांचीत एक सर्वज्ञपीठ स्थापन केले होते. ते फार पुरातन काळापासून होते. त्या पिठाचे पंडित आचार्यांच्या अद्वैत मतप्रतिपादनाच्या तेजाने भारावले गेले. त्यांनी आचार्यांना ‘‘जगद्गुरू’’ हा सन्मान देऊन ‘‘सर्वज्ञपिठावर’’ आरोहण करण्याची प्रार्थना केली. आचार्यांनी ती प्रार्थना स्वीकारली.

कांचीत आचार्यांचा अवर्णनीय प्रभाव पडला. शिष्यपरिवारही खूप मोठा झाला. संघटनाकुशल आचार्यांनी कांचीत धर्मपीठ स्थापन करण्याचा संकल्प केला. राजाला तर त्यामुळें आकाश ठेंगणे वाटले. समृद्ध अशा धर्मपिठाची स्थापना झाली. आचार्यांनी आपल्या जवळ असलेल्या दोन लिंगापैकी ‘योग’ लिंगाची स्थापना कांचीत केली.

आचार्यांनी वयाच्या नवव्या वर्षापासून ते वयाच्या एकतिसाव्या वर्षापर्यंत तब्बल बावीसवर्षे सर्व भारतभर तीन वेळा अथक परिभ्रमण केले. वैदिक सनातनधर्म सामान्य लोकांना सहजतेने कसा आचरणांत आणता येईल ह्याचे निःसंदिग्ध मार्गदर्शन केले. दक्षिणोत्तर सर्वज्ञपिठावर आरूढ होऊन “जगद्गुरू” झाले. खंडप्राय भारतासाठी चार दिशांना चार धर्मपिठांची स्थापना केली. गेयता, मधुरता, सुलभता, भाव, भक्ती, वैराग्य, ज्ञान इत्यादींनी ओथंबलेल्या अगणित स्तोत्र रचना केल्या. प्रस्थानत्रयीवर भाष्ये केली. इतरही अनेक ग्रंथांवर भाष्य केले. अगणित प्रवचने दिली. अगणित शिष्य भारतभर विखुरले. संन्यासधर्माचे पुनरुज्जीवन केले. निस्पृहातेचा व प्रखर वैराग्याचा परम आदर्श म्हणजे आचार्य.

कांचीतल्या वास्तव्यांत आचार्यांना आपल्या परमगुरुंचे स्मरण होत होतेच. त्यामुळें कांची धर्मपिठाची व्यवस्था लाऊन आचार्य मदुराई येथे आले. तिथें मीनाक्षी मंदिरांत श्रीचक्राची स्थापना करून परतले. कांचीत काही महिने वास्तव्य करून तिरुपती येथे आले. ह्याच ठिकाणी त्यांनी “श्रीविष्णु पादादिकेशांत” हे ५२ श्लोकांचे स्तोत्र रचले. मंदिराच्या व्यवस्थापकांच्या विनंती वरून त्यांनी तिरुपतीला “धनाकर्षण” यंत्र स्थापून दिले. त्यामुळे तिरुपती बालाजी मंदिर सर्वांत श्रीमंत मंदिर म्हणून आजही प्रसिद्ध आहे. तिरुपतीहून आचार्य कलहस्ती येथील शिवमंदिरांत आले. त्यानंतर चिदम्बरम् ह्या गुरुगौडपादांच्या गुरुस्थानी आले. जगप्रसिद्ध नटराजाचे मंदिर येथें आहे. ह्या नटराजाच्या मंदिरातल्या सभामंडपातच पतंजली आपल्या शिष्यांना व्याकरण शिकवीत असत. गौडपादही आधी इथेच शिकत होते. आचार्यांनी ह्या सर्व घटना मनांत ठेऊन पाचव्या शिवलिंगाची स्थापना म्हणजे मोक्ष लिंगाची स्थापना इथे केली. कैलास पर्वतावर भगवान् शिवांकडून प्राप्त झालेल्या पांचही स्फटिक लिंगांचे अशा प्रकारे स्थापना कार्य पार पडले. भगवान् शिवांच्या आशीर्वादामुळे संपूर्ण भारतभर विजय प्राप्त होत गेला. त्यानंतर आचार्य मध्यार्जुनाला असलेल्या महालींगेश्वाराच्या मंदिरांत आले. दक्षिण भारताच्या तीर्थयात्रेतले हे आचार्यांचे अखेरचे दर्शन होते. कारण आचार्यांना कांचीहून बोलावणे आले होते. आचार्य महालींगेश्वराचे दर्शन घेत असता एक अपूर्व घटना घडली.

आचार्यांनी दर्शनाचेवेळी मस्तक टेकवतांच आकशवाणी प्रकटली "सत्यं अद्वैतम्" अद्वैत वेदांत सत्य आहे. ती वाणी ऐकून आचार्यांना कृतार्थ झाल्यासारखे वाटले. झालेला आनद त्यांनी "नमस्ते गिरिजाकांत नमो नम: त्रैलोक्यपूजित | हरीनेत्राब्ज संपूज्य निजपादकरोरुहम् ||" ह्या श्बदात प्रकट केला. "हे पार्वतीपते! हे त्रैलोक्यपूजित शिवशंकरा तुला नमस्कार असोत. भगवान् श्रीहरीच्या नेत्रांचा विषय तुझी चरणकमल पूजा हाच आहे." मनोमन भगवान् शिवशंकरांना वंदन करून आचार्य कांचीला परतले.

आचार्यांनी चारही धर्मपिठाच्या आचार्यांना आधीच बोलावणे धाडले होते. त्याप्रमाणें सुरेश्वराचार्य, पद्मपादाचार्य, तोटकाचार्य व हस्तामलकाचार्य कांचीला आले होते. आचार्यांना थकवा नव्हता कीं कधी त्यांना विश्रांतीची गरज भासली नाही. अपूर्व कर्मयोगीच होते ते. त्यांनी सुरेश्वराचार्यांना द्वारकेच्या धर्मपिठाची सर्व व्यवस्था विचारली. तशीच ती इतरहि पिठांच्या आचार्यांना विचारली. कांचीच्या धर्मपिठांत चारही पिठांचे आचार्य आल्यामुळे कांची धर्मपीठ सर्व नागरिकांच्या कुतूहलाचा विषय बनला.

आचार्यांनी ह्यावेळी मठाधिपतींना काही विशेष नियम सांगितले. आचर्य आपले मनोगत सांगत होते आणि तेच नियम होत होते. चारही पीठाधिशांच्या उपस्थितीत आचार्य म्हणाले, "सर्व मठप्रमुखांनी आपली कार्ये पार पाडताना वृत्ती निस्पृह ठेवावी. इतरांच्या कार्यात ढवळाढवळ करू नये. मानवाच्या कल्याणाचे मूळ धर्म हेच आहे. अद्वैत वेदांताला अत्यंत जपा. कारण हा विदांत शिकवताना व्यवहारभेदाचा अभ्यास अत्यंत महत्वाचा आहे. अद्वैत तत्त्वज्ञान जनसामान्यांना हरिकथेच्या माध्यमातून सांगा. पंडितांच्या सभांमधून मांडुक्यकारिका, ब्रह्मसूत्र इत्यादींच्या अभ्यासातून सांगा. तरतमभाव जागा ठेवा. अहंकार रहित शुद्ध वागणूक ठेवा. वृत्ती सदैव क्षमाशील ठेवा. काळानुसार संदर्भ बदलेले असतात व त्यामुळे बदलत्या संदर्भानुसार शब्दांचे अर्थ बदलू शकतात ह्याचे भान ठेवा. वर्णाश्रमधर्माचा निर्णय करताना मनुस्मृती व भाष्ये ह्यांच्या माध्यमातून तर्क घ्या पण उदारदृष्टी ठेऊन तारतम्य वापरा. ऐतिहासिक घटनांना मार्गदर्शक तत्त्व समजून व्यवहारांत शास्त्राधारे सुलभता आणण्याचा प्रयत्न करा. हेकांड मांडू नका. दर कुंभमेळ्याच्या निमित्ताने एकत्र येऊन विचारांची देवाणघेवाण करा. त्याच वेळी रूढी,

परंपरा, शास्त्र, अध्यात्म, भक्ती व कर्म ह्या विषयांवर सर्वसामान्यांच्या आवाक्याचा विचार करून आवश्यक त्या सुधारणा करा. धारणाशक्तीचा हळूहळू क्षय होत असल्याचे लक्षांत घेऊन दैनंदिन पाठ मंदिरासारख्या ठिकाणी आवश्यक त्या फेरफारांनी सुलभ करून द्या. वेदाध्ययनाच्या पाठशालांमध्ये भक्तिमार्गाचे महत्व समजण्याची व्यवस्था करा. आचार-विचारांशी प्रामाणिक राहा. पाखंड व कार्मठ्य माजवू नका. ईश्वराभिमुख राहा व इतरांनाही करा. पुराणांच्या व त्यातल्या तत्त्वज्ञानाच्या शिक्षणाची सोय करा. कारण पुराणे ईश्वराच्या सगुण व्यक्तिमत्वाची भांडारगृहे आहेत. पुराणे योग्य व शुद्ध आचरणावर भर देणारी आहेत. त्यांत अनेक कथा तर्काच्या पलीकडल्या आहेत. त्या सर्वसामान्यांना त्यांच्या दिसते तेवढेच सत्य मानण्याच्या कल्पनांना धक्का देऊन आत्मतत्त्वांत डोकावण्याची जिज्ञासा उत्पन्न करण्यासाठी योजलेल्या आहेत हे सर्वतोपरी ध्यानात ठेऊन त्याप्रकारचे शिक्षक  तयार करण्यावर भर असू द्या. पुराणातल्या गोष्टीना सर्वतोपरी वेदांचा आधार आहे हे ध्यानात असू द्या.

"इतिहासपुराणानामपि मंत्रवेदमूलत्वात व्याख्यात मार्गैः संभावयेत् ॥"

इतिहास व पुराणे ह्यांच्या कथांना वैदिकमंत्र व अर्थ ह्यांचा आधार आहे व त्यांत ऐतिहासिक सत्याचा बोध करून देताना त्यांच्याच व्याख्यांच्या अनुषंगाने विचार करणे गरजेचे आहे. वैदिक सत्ये ही वैदिक ऋषींच्या वाक्यातील सत्ये आहेत. जी सूक्ष्म सत्ये सामान्यांच्या आकलनांत येऊ शकणार नाहीत ती आपल्या कथांच्या द्वारे सामान्यांपर्यंत पोहोचवण्याचे कार्य पुराणे करीत असतात. (ब्रह्मसूत्र भाष्य ३. ३) जे आपल्याला दिसत नाही ते वैदिक ऋषींच्या निर्मळ प्रज्ञेला यौगिक शक्तीने दिसत असते.

सामान्य माणसे संख्येने अधिक असतात. त्यांना डोळयांनी दिसेल तेच खरे वाटते. त्यामुळें त्यांच्यासाठी सशास्त्रमूर्ती पूजेचा आदर्श निर्माण करा. त्यांत सुलभता आणा. त्यांचा भक्तीभाव दृढ होईल अशाच प्रवचनांची निवड करा. नित्यपाठासाठी श्रीमद्भगवद्गीता, श्रीविष्णुसहस्रनाम, गुरुगीता व स्फुटस्तोत्रे दैनंदिन व्यवसाय सांभाळून म्हणता येतील अशा बेताने योजा. अनेक लोकांच्या अनेकविध उपासना असतात. चूक अथवा बरोबर असा विचार करू नका तर त्या उपासना ईश्वराभिमुख करणाऱ्या आहेत

किंवा नाहीत हे बघा. कर्म करणे सामान्यांना सहज जमते म्हणून त्यांना आत्मविश्वास उत्पन्न होईल अशा पद्धतीने अर्चना भक्तीचा उपदेश करा. कोणत्याही पंथाचा अभिनिवेश ठेऊ नका. कोणताही नवीन पंथ निर्माण करण्याच्या फंदात पडू नका. भारतभर सर्वत्र एकात्मता उत्पन्न होईल असे आचरण परस्परांच्या अनुसंधानातून ठेवा. आपलाच मठ श्रेष्ठ अशी भावना कधीही ठेऊ नका. मठांत भोग्यवस्तूंचा संग्रह अजिबात करू नका. मठांत येणाऱ्या कोणत्याही वर्णाच्या व्यक्तीला कोणत्याही प्रकारे तुच्छ करू नका. मठांत सदैव पावित्र्य राहण्यासाठी हरिभजनावर भर द्या! लोककल्याणासाठीच आपण संन्यास घेतला आहे याचे भान ठेवा. लोकांनी घरदार त्यागून संन्यासी बनावे असे चुकूनही मनांत आणू नका. त्यांत नेहमी दक्षता घ्या! वृत्ती संन्यस्त झाल्या खेरीज घेतलेल्या संन्यासामुळे होणारी अधोगती ध्यानांत ठेवा. संन्यासी हा इतरांच्या जीवनावर जगणारा आहे अशी समाजाची भावना कदापि होणार नाही अशा पद्धतीने व्यवहार करा. "विदुषां क्रियमाणं कर्म परमार्थत: अकर्म एव |" ज्ञानी संन्यासी समाजजीवनाची रहाटी सुरळीत चालावी म्हणून तो जरी कार्यरत दिसला तरी प्रत्यक्षांत तो कार्य करीत नसतो.

सत्य, प्रेम व शांती ह्यांच्या शिकवणुकीसाठी तर्कशुद्ध व बुद्धिग्राह्य तत्त्वज्ञानाची आवश्यकता असते. त्यासाठीं ईशस्तवने आहेत. विवेकचूडामणीचा उपयोग त्यासाठी करा. इतर ईशस्तवने त्यासाठीच आहेत. आपल्या तत्त्वज्ञानाने मानवांमध्ये बंधुभाव वाढेल इकडे लक्ष ठेवा. सर्वच जीवांना ईश्वरप्राप्तीचा अधिकार असल्याचे समाजाला समजून सांगा. प्रत्येक जीवाला से वाटत असते कीं मी इतरांपेक्षा वेगळा आहे, माझी आवड निवड वेगळी आहे, माझा स्वभाव वेगळा आहे. पण ही भिन्नता वरवरची असते ती खरी नसते. एका परब्रह्माचेच हे विविध अविष्कार असतात. पण त्यांना ते ज्ञात नसते. ती अविद्या माया असते हे जाणून त्यांना समजून घ्या. त्यांच्या स्वभाव वैशिष्ठ्यानुरूप त्यांना ईश्वराभिमुख करा. आजचे नवे उद्या जुने होणारे असते. त्यामुळे कालमानानुसार मठाच्या व्यवस्थेत काही बदल अपरिहार्य होतील ते बदल वैराग्यपूर्ण करा. अशावेळी एकत्र येऊन बदलत्या परिस्थितीवर सांगोपांग चर्चा करून एकमताने निर्णय करण्यास कचरू नका. " आचार्य आपले मनोगत प्रकट करीत होते प्रचंड शिष्य समुदाय काना-

मनाला एक करून त्यांचे मनोगत आत्मसात् करण्याचा प्रयत्न करीत होता. पुढें आचार्यांनी एक महत्वपूर्ण घोषणा केली.

ते गंभीर वाणीने म्हणाले, “ उत्कृष्ट नेत्याची लक्षणे सुरेश्वराचार्यांमध्ये आहेत. ते कुशलव्यवस्थापक आहेत. निर्णय घेण्याची त्यांची क्षमता अपूर्व आहे. मी आज आत्ता आहे कदाचीत् काही काळानंतर नसेन. त्यामुळें आज या क्षणापासून कांचीच्या पिठावर सुरेश्वराचार्य आरूढ होत आहेत. सर्व विषयांत त्यांचे अनुशासन सर्वांनी मान्य करावे. आजपर्यंत द्वारकेच्या ज्या धर्मपीठाचे ते भूषण होते त्या द्वारकेच्या धर्मपिठावर चित्सुखाचार्य आरूढ होतील. ह्या चित्सुखाचार्यांनी माझ्या सद्गुरूशोधन कार्यापासून आयुष्यभर मला सांवलीसारखी साथ दिली आहे. त्यांची विरक्ती, भक्ती व माझ्यावरील निष्ठा अपूर्व आहे. मी धारण केलेला हा दंड व नर्मदामातेने पावन केलेला हा कमंडलू इथेच सुरेश्वराचार्यांसाठी राहील. पादुकांवर चित्सुखा खेरीज कोण हक्क सांगेल? माझा बहिश्चर प्राण म्हणजे कैलासावर भगवान् शिवांकडून प्राप्त झालेल्या ह्या “सौंदर्य लहरी” माझ्या “शिवानंदलहरींसह” प्राणरूपाने आपणा सर्वांसाठी ठेऊन जात आहे. हे ऐकून सर्व शिष्य झटकन उठून उभे राहिले. आचार्य हे काय बोलत आहेत? त्याच्या मनांत भावनांचा काल्लोळ उडाला, इतक्यांत आचार्यांनी आपल्या मधुर वाणीने “भज गोविंदम् भज गोविंदम् “ हे आपल्या गुरूंच्या नावाचा उल्लेख असलेले व गुरुगोविंद यतींना प्रिय असलेले भजन म्हणायला सुरुवांत केली. “भज गोविंदम्” ची गंभीर धून संपूर्ण शिष्यांनी मधुर स्वरांत आचार्यांच्या सुरांत सूर मिळवून म्हणायला सुरुवांत केली. सर्व शिष्यांच्या एका सुराने कांचीमठाचा आसमंत भरून गेला.

असे काही क्षण गेले आणि एकाच वेळी एकाच क्षणी धून थांबली! नीरव शांतता पसरली. कारण . . . . . आचार्य आसनावर नव्हते! दंड तेजाळला होता. कमंडलू प्रभावी दिसत होता. पादुका तेज:पुंज दिसत होत्या आणि सौंदर्यलहरीच्या पोथीतून व त्याखाली असलेल्या शिवानंदलहरींच्या पोथीमधून शीतलप्रकाश बाहेर पसरत होता. आचार्यांचे आसन रिकामे होते. सुरेश्वराचार्य डबडबलेल्या नेत्रांनी व विस्फारलेल्या नजरेने आसनाकडे एकटक पहात राहिले. चित्सुखांनी पुढें होऊन पादुका हृदयाशी कवटाळल्या!

तोटकाचार्यांनी पुढे होऊन आचार्यांच्या रिकाम्या आसनाला आपल्या दोन्ही भुजांनी मिठी मारत, " अतिदीनमिमं परिपालय मां भव शंकर देशिक मे शरणम् ॥" म्हणून आर्त प्रार्थना आरंभिली. संपूर्ण सभा तटस्थतेने हे पहात होती. त्यावेळी चित्सुखाचार्य कातर स्वरांत म्हणत होते,

" मनोबुद्ध्यहङ्कारचित्तानि नाहं न च श्रोत्रजिह्वे न च घ्राणनेत्रे ।
न च व्योमभूमिः न तेजो न वायुः चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥ १॥"

तेज तेजांत विलीन झाले होते. सुरेश्वराचार्य भावविभोर आवाजांत म्हणाले
ॐईशान:सर्वविद्यानामीश्वर:सर्व भूतनाम् |
ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोधिपतिर्ब्रह्मा शिवो मे अस्तु सदाशिवोम् ||

आणि अश्रुपूर्ण नेत्रांनी सुरेशराचार्यांनी आसनाला साष्टांग नमस्कार घातला व नि:शब्द झाले.

# || लेखन सीमा ||




संदर्भ ग्रंथांची यादी

ग्रंथ प्रकाशक

- १ . श्रीमद्भगवद्गीता शांकरभाष्य गोविंद भवन-कार्यालय, गीता प्रेस.
- गोरखपूर (सं. २०५५)

- २. विवेकचूडामणि अद्वैताश्रम पिठोरगड.
- ३. आत्मबोध श्रीमच्छंकराचार्य विरचित खेमराज
- कृष्णदास.
- ४. सिद्धयोग्यांच्या सहवासांत अ. ल. गाडगीळ, वोरा अंड कं.

मुंबई .

- ५. श्रीगुरुचरित्र चित्रशाळा प्रेस पुणे
- ६. प्रार्थना प्रीती सद्विचार दर्शन ट्रस्ट
- ७. पारमहंस्य मिमांसा श्रुति शंकर संस्कृत संशोधक
- प्रतिष्ठान. मत्तुर .
- ८. बृहद्स्तोत्र रत्नाकर खेमराज श्रीकृष्णदास
- ९. मांडुक्योपनिषद व कारिका श. गो. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ
- भांडार कोल्हापूर .
- १०. ब्रह्मसूत्र शांकरभाष्य चौखंबा विद्याभवन वाराणसी
- ११. अद्वितीय कर्मयोगी श्री आद्य शंकराचार्य श्री भगवान वेदव्यास इतिहास

- सेवा मंदिर. ठाणे.
- १२ . दासबोध के. भि. ढवळे शके १८७९
- १३ श्रीज्ञानेश्वरी यशोधन प्रकाशन देवाची आळंदी
- १४ श्रीमद्भागवत मूल गीता प्रेस. गोरखपूर
- या व्यतिरिक्त अनेक स्तोत्रे व ग्रंथ अभ्यासावे लागले आहेत. ते सर्व दिलेले नाहीत.

